# हृदयतरंग



लेखक

दत्तात्रेय अनंत आपटे

---

प्रकाशक

अच्युत चिंतामण भट

४९७ बुधवार पेठ, पुणें शहर.

---



आवृत्ति पहिली

---

शा. शके १८३७.

---

किंमत दहा आणे

# चार प्रास्ताविक शब्द.

महाराष्ट्रावर इंग्रेजी अंमल सुरू होऊन आज जवळजवळ एक शतक लोटलें. इतक्या अवधींत बरेंचसें मराठी वाङ्मय निर्माण झालें. त्यामध्यें विविधता व व्यापकता हीं हळूहळू अधिकाधिक येत चाललीं आहेत; आणि कालांतरानें तें अभियुक्त, प्रगल्भ, सम्पन्न आणि सर्वाङ्गसुन्दर होण्याचीं सुचिह्नें दिसत आहेत. 'आधुनिक मराठी कविता' या वाङ्मयाचें एक प्रमुख अंग आहे. 'आधुनिक मराठी कविता' म्हणजे प्रायः विद्यमान महाराष्ट्रकवींची कृति होय. 'प्रायः' असें म्हणण्याचें कारण विद्यमान कालाशीं सन्निकट असणारे परंतु गत झालेले असे केशवसुत, मोगरे, ओक इत्यादि कवि यांच्या काव्यमय कृतींचा अन्तर्भावही आधुनिक काव्यांतच होतो. या आधुनिक काव्यसमूहाविषयीं टीकाकारांत विलक्षण मतभेद दिसून येतो. या मतभेदाच्या मूळाशीं अनेक भावना आहेत. त्यांची मीमांसा करण्याचें हें स्थल नव्हे. परंतु काव्याच्या स्वरूपाविषयींची अयथार्थ कल्पना या मतभेदाला कांहीं अंशीं कारणीभूत झाली आहे. तिचा मात्र येथें थोडा विचार करणें अवश्य आहे.

काव्याची खरी किंमत त्यांतील कल्पनावैचित्र्य व रचनाचातुर्य यांवर अवलंबून असते; मग त्याचा विषय कोणताही असो. काव्याचें साक्षात् फळ केवळ आनंद होय. उपदेशादि कार्यें त्याचीं परोक्ष फलें होत. महाराष्ट्र काव्याचें लक्षण वेगळें, संस्कृत काव्याचें लक्षण वेगळें, इंग्रेजी काव्याचें लक्षण वेगळें, अशा वेडगळ कल्पना कोठें अज्ञानानें तर कोठें दुराग्रहानें प्रचलित आहेत. मानवी पुरुषाचें किंवा स्त्रीचें लक्षण सगळ्या जगतांत एक. मग ती व्यक्ति महाराष्ट्रांतील असो, शर्मण्यदेशांतील असो, आफ्रिकेंतील असो, किंवा जपानांतील असो. बाह्यवेष, आभरणें इत्यादिकांमुळें जरी असल्या व्यक्तींना वैशिष्ट्य आलें, तरी तें त्या व्यक्तीचें पुरुषत्व किंवा स्त्रीत्व स्थापित करण्याच्या बिलकुल उपयोगीं पडत नाहीं. महाराष्ट्रांतील पुरुष पागोटें घालतो व त्यांतील स्त्री कुंकुमतिलक लाविते, यावरून पागोटें घालणें हें पुरुष-

त्वाचें किंवा कुंकुमतिलक स्त्रीत्वाचें एक लक्षण आहे, असें कोणी प्रतिपादन करूं लागला, तर समंजस व मार्मिक लोक त्याची गणना निखालस वेड्यांतच करितील. काव्याची गोष्ट अशीच आहे. खरे रसिक वरच्यासारख्या वेडगळ, विक्षिप्त अथवा असमंजस कल्पनांना आपल्या अंतःकरणांत थारा देत नाहींत. महाराष्ट्र-कवितावधू कांहीं काल बराच वेदान्त बोलली; आतां ती बरेचसे दुसरे विषय बोलत आहे. तिला यमकानुप्रासादि बाह्य अलंकारांची कांहीं दिवस बरीच आवड दिसली; आतां तिची ती आवड बरीच कमी झाल्याचा प्रत्यय येतो. हें सर्व खरें आहे. परंतु पूर्वोक्त काव्यवधूच्या स्वरूपाचा, म्हणजे अर्थात् आत्म्याचा, विचार करितांना वरील गोष्टी केवळ अप्रस्तुत आहेत. तिच्यांतील प्रतिभाविलास हा तिचा आत्मा; व यावरच तिची प्रतिष्ठा अवलंबून आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांना आपण कविश्रेष्ठ मानतों, तें त्यांच्या साधुत्वावरून किंवा तत्त्वज्ञतेवरून नव्हे; तर त्यांच्या विलक्षण प्रतिभासम्पन्नतेवरून. मुक्तेश्वरांनीं महाभारतासारखा अलौकिक ग्रंथ आपल्या कृतीला आधार घेतला म्हणून आपण त्यांस मोठेपणा देत नाहीं; तर तो विषय प्रतिपादितांना त्यांनीं जो रस ओतला, त्याबद्दल आपण त्यांना कवि ही महनीय पदवी देतों. असो, सरस कल्पनाच काव्याचा आत्मा असल्यानें वृत्तादिकांचें बंधन, यमकानुप्रासादि बाह्य आभरणें, किंबहुना विषय-माहात्म्य, यांविषयीं काव्य अगदीं निरपेक्ष असतें. म्हणूनच गद्यरचनाही सरस असल्यास काव्यसंज्ञेस पात्र होऊं शकते; आणि यमकानुप्रासमण्डित सुवृत्तानिबद्ध, निर्दोष रचनाही नीरस असल्यास त्या संज्ञेस मुकते. विषयावर काव्याची प्रतिष्ठा नसल्यामुळें परमेश्वरविषयक रचनाही नीरस असल्यास ती काव्यस्वरूप न पावतां क्षुद्र पतंगावरीलही एकादी सरस रचना काव्यपदवीला पात्र होते हें उघड आहे.

---

टी० १. गेल्या वर्षीच्या विविधज्ञानविस्ताराच्या दिसेंबर महिन्याच्या अंकांत श्रीमती सौ० कमळाबाईसाहेब किबे, इंदूर, यांचा 'माझें बाळ' हा नितांत सुंदर काव्यमय गद्यलेख प्रसिद्ध झाला आहे तो पहा. २. 'गणितादर्श' या नांवाचें एक आधुनिक पद्यात्मक पुस्तक आहे तें पहा. ३. "देवा, तूं बाप, हां आम्ही लेंकरें यांस भाकरी; देऊनीयां पोटभरी, घे त्यांकडुनि चाकरी ॥ हें आधुनिक पद्य वाचा. ४. सुमंतकविकृत पतंगविषयक काव्य अवलोकन करा.

अनेक संस्कृत आणि आंग्ल साहित्यशास्त्रकारांचीं या विषयावरील मतें आम्हांस अनुकूल आहेत. तीं येथें देण्याची तादृश आवश्यकता दिसत नाहीं. तथापि केवळ मराठी वाचकांकरितां, एका सुप्रसिद्ध रसिक पंडितांचा काव्य-विषयक अभिप्राय, आमच्या मताच्या पुष्ट्यर्थ, आम्ही येथें सादर करितों. कै० पंडित कृष्णशास्त्री चिपळूणकर आपल्या शालापत्रकाच्या चवथ्या वर्षाच्या तिसऱ्या अंकांत काव्यविषयाचा उपन्यास याप्रमाणें करितातः—

"कोणत्याही भाषेंत अत्यंत उत्तम व सरस ग्रंथ म्हटले म्हणजे तींतील कविता होत; व त्या कविताग्रंथांचें उत्तम ज्ञान झाल्यावांचून त्या भाषेचें मार्मिक ज्ञान शिकणारास होत नाहीं. दुधास जसें लोणी, झाडास जसें फूल, तशी भाषेस कविता होय. मनोरंजन करण्याचें जे भाषेंत सामर्थ्य असतें तें तिच्या कवितारूप ग्रंथांत मुख्यत्वेंकरून असतें."

"आतां कविता म्हणजे काय? तिचें लक्षण कोणतें? ती ओळखावी कशी? आतां दुसऱ्या प्रकारच्या लेखापासून किंवा रचनेपासून कवितारूप लेख किंवा ग्रंथ ज्या गुणांनीं भेद पावतो त्या गुणांचें वर्णन करून कवितेचें स्पष्टपणें लक्षण बांधणें ही गोष्ट किती कठीण आहे, हें आम्हीं जाणत आहों. कवितेचें मुख्य स्वरूप सौंदर्य होय, व कोणत्याही सौंदर्याचें स्पष्टपणें वर्णन करून, तें म्हणजे काय पदार्थ आहे, हें सांगणें किती कठीण आहे, हें सुज्ञ वाचणारांनीं विचार केला असतां सहज ध्यानांत येईल. फुलें, इमारती, तजबिरी, मूर्ति, इत्यादिकांचा सुरेखपणा; द्राक्षें, आंबे, इत्यादिकांची उत्तम रुचिः राग व रागिण्या यांचें माधुर्य, इत्यादिकांचें वर्णन जसें पूर्णपणें व उघडपणें होत नाहीं, तसाच कवितेचाही प्रकार आहे. तथापि तिचे कांही गुण उघड करून दाखण्याविषयीं यत्न करणें अवश्य आहे."

"साधारण लोकांच्या समजुतीनें छंदोबद्ध जो ग्रंथ तो कविता होय. म्हणजे जो ग्रंथ आर्या, श्लोक, साक्या, दिंड्या, ओंव्या इत्यादि कोणत्या तरी वृत्तानें लिहिला असतो त्यास ते कविता समजतात. परंतु ही त्यांची समजूत खरी नाहीं. कविता बहुतकरून छन्दोबद्धच असते खरी, तथापि ग्रंथास काव्य-पणा येण्यास तो छन्दोबद्धच असला पाहिजे, असा नियम नाहीं; व जो छन्दो-बद्ध ग्रंथ असतो, तो म्हणजे काव्यरूपच असतो, असाही नियम समजूं नये.

संस्कृतांत बाणकविकृत कादंबरी, दण्डी नामक कवीनें रचिलेलें दशकुमारचरित्र इत्यादि ग्रंथ छन्दोबद्ध नसतांही काव्यें आहेत. तसेंच मनुसंहिता वगैरे धर्मशास्त्रांतील व सिद्धांतशिरोमणि, वाग्भट वगैरे ज्योतिषाचे व वैद्यकाचे ग्रंथ हे छन्दोबद्ध असतांहि काव्यें नव्हेत."

"यावरून केवळ छंदोबद्ध असल्यानें ग्रंथास काव्यपणा येत नाहीं, हें उघड झालें. तर तो येतो कशानें? असा प्रश्न वाचणारानें केल्यास त्यास आम्हीं असें उत्तर देतों कीं, ग्रंथास कविता हा शब्द शोभण्यास त्या ग्रंथांतील अर्थ सुंदर म्हणजे मनोरंजक, चमत्कारिक असा असला पाहिजे. ग्रंथ कितीही उपयोगी असला व त्याच्या ज्ञानानें वाचणारास कितीही फायदा किंवा उपदेश होत असला, तरी तेवढ्याच कारणानें तो ग्रंथ कवितारूप होत नाहीं. त्यास कविता हें नांव साजण्यास तो ग्रंथ मनोरंजक असला पाहिजे: म्हणजे तो वाचून वाचणाराच्या चित्ताला उल्हास किंवा चमत्कार वाटला पाहिजे. उपयोगाचा जिन्नस व शोभेचा जिन्नस (दागिना) यांत जशी तफावत आहे, तशी उपयुक्त ग्रंथ व मनोरंजक ग्रंथ (काव्यें) यांत तफावत आहे. चाकू, कातर, कुदळ, पहार इत्यादि उपयोगाच्या वस्तु आहेत. परंतु त्यांस कोणी भूषणें म्हणत नाहींत. तसे गणित, भूमिति, अर्थशास्त्र, व्याकरण इत्यादिकांवरील ग्रंथ अत्यंत उपयुक्त खरे, परंतु तीं काव्यें नव्हेत. यावरून हें स्पष्ट आहे कीं, काव्यांतील अर्थ उपयुक्त किंवा बोधपर असला तर असेल, परंतु तो तसा असलाच पाहिजे असा नियम नाहीं; व तो तसा नसला तरी काव्यांत कांहीं न्यूनता आली, असें होत नाहीं. तो अर्थ मनोरंजक व चमत्कारिक असला म्हणजे पुरे. सारांश, कवितेचें मुख्य लक्षण म्हटलें म्हणजे तींतील अर्थ मनोरंजक, रसिक, चमत्कारिक असा असला पाहिजे, असें सिद्ध होतें. हें वरील सांगितलेलें लक्षण आमच्याच मतानें आम्हीं लिहिलें आहे असें नाहीं; तर संस्कृत भाषेंतील व इंग्रेजी वगैरेंतील प्राचीन व अर्वाचीन मोठमोठ्या ग्रंथकर्त्यांचेंही मत असेंच आहे."

शास्त्रीबोवांचा हा काव्यलक्षणाविषयींचा अभिप्राय अगदीं स्पष्ट व बिनचूक आहे; आणि तो त्यांनीं आपल्या नेहमींच्या प्रसन्न व मधुर भाषेंत, साधारण मराठी वाचकाला, किंबहुना विद्यार्थ्यालाही, समजेल अशा रीतीनें लिहिला आहे. शास्त्रीबोवांच्यासारख्या काव्यरसज्ञपंडिताच्या या अभिप्रायाची शिफारस

करण्याचें कारणच नाहीं. तो प्रमाण म्हणूनच ग्रहण करणें आवश्यक व योग्य आहे.

काव्याचें बीज कल्पनाचमत्कृतींत आहे आणि त्या कल्पनाचमत्कृतींचा निकष रसिकाचें हृदय होय. तेव्हां 'रसिकाचें हृदय हलविणारी शब्दरचना' असें काव्याचें थोडक्यांत लक्षण मानतां येईल. जी शब्दरचना जितक्या प्रमाणानें सहृदयाचें अंतःकरण हलवून सोडील, त्या रचनेला तितक्या प्रमाणानें काव्य ही संज्ञा अधिक साजणार हें उघड आहे.

रा० रा० दत्तात्रेय अनंत आपटे यांनी, अनेक प्रसंगीं आणि अनेक स्थलीं मुद्रित झालेल्या, आपल्या लहान मोठ्या काव्यांचा संग्रह करण्याचें मनांत आणून त्यांचा हा पहिला भाग छापून तयार केला. त्यावर प्रस्तावना लिहिण्याविषयीं रा. आपटे यांनीं विनंती केल्यावरून आम्ही हे चार शब्द येथें लिहीत आहों. आम्ही प्रस्तुत संग्रहाकडे मुख्यत्वेंकरून काव्यदृष्टीनें पाहणार आहों; म्हणून आम्ही आमची काव्यविषयक कल्पना या लेखाच्या आरंभीं विशेष स्पष्ट केली आहे. सन १९०९ च्या काव्यरत्नावलीच्या ५ व्या व ६ व्या अंकांत, कवि व काव्यें यांसंबंधाचे, रा. आपटे यांचे पद्यमय विचार प्रकट झाले होते. पण त्यांवरून त्यांच्या काव्य-कल्पनेचा आम्हांस नीटसा बोध झाला नव्हता. प्रस्तुत संग्रहांत ८३ व्या पृष्ठा• वर २९ व्या पद्यांत 'नव कल्पना' काव्याला शोभा आणितात, अशा आशयाचें विधान आहे. या विधानाला पुष्टि देणारीं इतर कांहीं विधानेंही प्रस्तुत संग्रहांत आहेत. त्यांवरून काव्यलक्षणासंबंधानें रा. आपटे यांचा आमच्याशीं विरोध आहे असें म्हणवत नाहीं.

रा. दत्तात्रेय अनंत आपटे हे गृहस्थ 'अनंततनय' या टोपणनांवानें आज कित्येक वर्षे महाराष्ट्रकाव्यवाचकांस चांगले परिचित झालेले आहेत. अनेक मराठी मासिकें व वृत्तपत्रें यांत त्यांच्या लहान मोठ्या कविता प्रसिद्ध झाल्या आहेत व होतही आहेत. आपल्या अंगीं असणाऱ्या कवित्वगुणानें ते अनेक काव्यरसिकांच्या आदरास व प्रेमास पात्र झाले आहेत. 'महाराष्ट्र भगव-द्गीता' हा त्यांचा अभिनव रूपांतरप्रयत्न नुकताच महाराष्ट्रापुढें आला आहे. शिवाय थोरले माधवरावसाहेब पेशवे यांजवर लिहिलेलें त्यांचें महाकाव्यही उदयोन्मुख झालें आहे. अशा प्रकारें स्वतांच्याच करामतीनें काव्यवाचकांपुढें

आलेल्या व कवि म्हणून संभावित झालेल्या गृहस्थांचा वाचकांशी अधिक परिचय करून देण्याचें प्रयोजन नाहीं.

या पुस्तकाला कवीनें 'हृदयतरङ्ग' हें नांव दिलें आहे. या नामकरणांत कवीचें सहृदयत्व दिसून येतें. या नांवाला अन्वर्थक करून सोडणाऱ्या प्रकरणांचा उल्लेख या पुढें आम्ही करणार आहों. कवीची अवलोकनशक्ति सूक्ष्म असावी लागते; त्याचा पूर्वकवींच्या ग्रंथांशीं मार्मिक परिचय असावा लागतो; त्याच्या ठायीं बहुश्रुतता व अनुभवजन्य ज्ञान असावें लागतें; दीनांविषयीं अनुकम्पा, सत्यावर प्रेम, सकल विश्वाविषयीं बंधुभाव, कर्तव्याविषयीं जागृति, सौन्दर्याविषयीं रति, परमेश्वराविषयीं निष्ठा, साधुजनांविषयीं आदर, इत्यादि उदात्त व कोमल भावना त्याच्या हृदयांत उद्दीपित व्हाव्या लागतात; आपल्या उत्कट मनोवृत्तींना रम्य शब्दस्वरूप देण्याचें सामर्थ्य त्याच्यांत असावें लागतें; नवीन नवीन कल्पना प्रसवण्याची शक्ति म्हणजे प्रतिभा ही त्याच्या अंगीं अवश्य असावी लागते. कवि व्हावयाला लागणाऱ्या या साहित्यापैकीं बरेंचसे प्रस्तुत कवीमध्यें वास करीत आहे, ही गोष्ट त्याच्या प्रस्तुतच्या संग्रहावरून सुव्यक्त होत आहे. काव्यगुणांपैकीं माधुर्य हा गुण या पुस्तकांत विशेष अनुभवाला येतो. त्याच्या खालोखाल त्यांत प्रसाद गोचर होतो. ओजोगुणाला यांत अवकाशच मिळाला नाहीं कारण प्रस्तुत संग्रहांत मुख्यत्वेंकरून शांत आणि करुण हे दोनच रस विकसित झाले आहेत. वीररौद्रादि रस यांत मुळीच नाहींत. धर्मवीराची छटामात्र कांहीं ठिकाणीं दिसते. इंग्रेजी काव्यवाङ्मयांत 'लिरिक्स' या नांवाचा एक काव्यसमूह आहे. प्रायः त्यासारखीच कविता या संग्रहांत ग्रथित केली आहे. इंग्रेजी लिरिक्सच्या पद्धतीवर सुंदर मराठी काव्यें रचणारे जे कित्येक आधुनिक कवि आहेत, त्यांत प्रस्तुत कवीला बरेंच उच्चस्थान द्यावें लागेल. प्रतिभेचीं अत्यंत हृदयंगम विहारस्थलें या कलापांत रसिकांस आढळणार नाहींत असें नाहीं. तथापि अनेक पुराणकल्पनांचा रूपांतरानें होणारा मनोरम विलासच यांत विशेष कुतूहल उत्पन्न करणारा आहे. कारणावरून कार्याकडे, दृश्यावरून अदृश्याकडे, बाह्य सृष्टीवरून परमेश्वराकडे धांव घेण्याची कवीची प्रवृत्ति अनेक ठिकाणीं दिसून येते. विषयवैचित्र्यानें व विविधवृत्तयोजनेनेंही

प्रस्तुत काव्यकलापाला बरेंच रमणीयत्व आलें आहे. याप्रमाणें प्रस्तुत संग्रहाचें अन्तर्बाह्य स्थूल स्वरूप आहे.

आतां प्रस्तुत ग्रंथांतील कित्येक स्थलांचा विशेष उल्लेख करणें आवश्यक आहे. यांतील ईशवन्दनपर तरङ्गांत कवीची भक्तिप्रवणता व्यक्त झाली आहे. 'प्रणतप्रणति'-प्रकरणांत सेव्यसेवकभाव विविधरूपांनीं उत्कृष्टपणें व्यञ्जित झाला आहे. भक्तिपर प्रकरणांत रूपकादिकांची योजना ठिकठिकाणीं आढळते, ती अलंकारांच्या दृष्टीनें मनोरंजक असली तरी भक्तिमूलक प्रेमप्रवाहालाखंडित करणारी होते व त्यामुळें व्हावा तसा रसपोष होत नाहीं. कवि मनोभावनांचें क्षेत्र सोडून तात्त्विक विचारांचीं जाळीं विणूं लागला म्हणजे रसापकर्ष केवळ अपरिहार्य होय. मोरोपंतांची आर्याकेकावली श्लोककेकावलीपेक्षां सरस उतरली आहे यांतलें बीज हेंच आहे.

प्रस्तुत काव्यकलापांतील 'राधाजीवन,' 'तिमिराप्रत,' 'नवलची,' 'प्रीति कां भीति?' 'दुष्काळांतील मायलेंक,' 'शरदिन्दु,' आणि 'चिलयाकण्डन' हीं प्रकरणें फार सरस व हृदयंगम आहेत. यांत कवीची उत्कट मनोवृत्ति व त्याचें शब्दसृष्टीवरील प्रभुत्व यांचा नितांतरमणीय संगम झाला आहे. हीं स्थळें पुनः-पुनः वाचावींशीं वाटतात; व तीं वाचतांना प्रत्येक वेळीं नवा आनंद अनुभवाला येतो. हीं बहारीचीं स्थलें वाचिलीं म्हणजे प्रस्तुतचा सगळा काव्यकलाप वाचल्याचें श्रेय वाचकांस मिळेल, असा आमचा समज आहे. 'दुःखांतच सुख,' 'रसाल व तरुच्छेदक,' 'अंगाई,' 'सतार,' 'माझें फूल कुस्करलें,' 'कमी मेली,' 'माझी कन्या,' 'जग कोणाकरतां,' 'चित्रास,' 'क्षयी चंद्रास,' इत्यादि स्थळेंही बरींच मनोहर उतरलीं आहेत. काव्याच्या दृष्टीनें उपर्युक्त स्थळें रसिकांस अभिनंदनीय वाटतील असा भरंवसा वाटतो.

आपल्या राष्ट्राविषयीं कवीला योग्य अभिमान आहे ही संतोषाची गोष्ट आहे. तसेंच आपल्या राष्ट्राच्या अवनत स्थितीविषयीं त्यास फार खेद होत आहे ही गोष्टही प्रशंसनीय आहे. अखिल राष्ट्राचा उद्धार करण्याविषयीं कवीनें परमेश्वराला, प्रस्तुत संग्रहाच्या दाहाव्या पृष्ठावर, राष्ट्रीय प्रार्थनारूपानें आळविलें आहे, ही गोष्ट समुचित नाहीं असें कोण म्हणेल?

सांसारिक कटु अनुभवांनीं कवि कोठें कोठें व्याकुळ व निराश झालेला

दिसला, तरी एकंदरींत तो आशावादी आहे; आणि निष्काम-कर्मोपासनेचा पक्ष-पाती आहे, असें या संग्रहांतील अनेक प्रकरणांवरून दिसतें. 'चिंताज्वर' हें एकच प्रकरण या आमच्या विधानाची साक्ष देण्यास पुरे आहे. संसारांतील प्रेमप्रसंगांचें रहस्यही कवीला अवगत नाहीं असें नाहीं. 'एक कोडें,' 'तर मी देवाची!' इत्यादि प्रकरणांत वत्सल रसाचा परिपाक चांगला उतरला आहे. 'दर्पण' 'सीमोल्लंघन' 'हट्टी मुलांची दिवाळी,' 'अर्धचन्द्र,' इत्यादि काव्यांत चंचल विनोदलहरींचा विलास दिसून येतो. त्यांतील उपदेश व प्रेम-प्रसंग केवळ सुखग्राह्य आहेत.

'हे डाग कसे निघतील?' 'नीतिसुधा,' इत्यादि गीतिवृत्तनिबद्ध बोधपर प्रकरणें त्यांतील उपदेशाच्या दृष्टीनें मोलवान् आहेत. या प्रकरणांत कवीची अंत्ययमकशक्ति दृष्टोत्पत्तीस येते. या स्थलीं पुष्कळसे यमक सहज समजण्या-सारखे असल्यामुळें ते वाचतांना मौज वाटते व कविश्रेष्ठ मयूराच्या लोकमान्य कृतीशीं प्रस्तुत कवीचा दृढ परिचय झालेला पाहून एक प्रकारचें कुतूहल वाटतें. एकाद्या ठिकाणीं यमकाला अर्थाचें स्वामित्व दिलेलें पाहून मात्र खेद उत्पन्न होतो! संसारांतल्याप्रमाणें काव्यप्रपंचांतही अर्थाकडे नेहमीं प्रभुत्व असतें, ही गोष्ट निरंकुश कवीलाही अनुल्लंघनीय आहे.

प्रस्तुत ग्रंथांत आणखी एक विशेष आहे. यांत अनेक स्थळीं सुभाषितें आढळतात. त्यामुळें काव्यास फार माधुर्य व प्रौढी आलेली आहे. कांहीं ठिकाणीं प्राचीन कवींचीं वचनें जवळजवळ जशींचीं तशींच अनुवादरूपानें दिलीं आहेत, त्याबद्दल मात्र कवीचें अभिनंदन करतां येत नाहीं.

आपणांस परमेश्वरानें नरतनु देऊन अनन्यसुलभ वाणी दिली याबद्दल कवीनें परमेश्वराविषयीं कृतज्ञता दर्शवून त्या वाणीचा नेहमीं योग्य तोच उपयोग आपण करावा, हें सुंदर व उदार तत्त्व या ग्रंथांत प्रेमळपणें प्रतिपादिलें आहे. याचा अवलंब सर्वांनीं केल्यास भगवद्गीतोक्त वाङ्मय तप आचरिल्याचें श्रेय त्यांस प्राप्त होईल यांत संशय नाहीं.

एकंदरींत प्रस्तुत काव्यकलाप वाचनीय व संग्राह्य आहे, असें आमचें मत आहे. महाराष्ट्रीय काव्यवाचकांनीं यास उदार आश्रय देऊन आपलें आधु-निक काव्यावरील प्रेम व्यक्त करावें अशी आमची त्यांस सप्रेम सूचना आहे.

श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर हे श्री आणि सरस्वती यांचा मधुर प्रीतिसंगम आहेत. कवीनें प्रस्तुत काव्यसंग्रह श्रीमंतांस अर्पण केला, यांत औचित्य आहे. श्रीमंतांनींही कवीच्या प्रेमळ अर्पणाचा प्रेमपुरःसर स्वीकार करून आधुनिक मराठी सत्काव्यावरील आपला अनुकूल अभिप्राय जाहीर केला आहे, याबद्दल आम्हांस फार संतोष वाटत आहे. आधुनिक मराठी काव्याची वेळीं अवेळीं निंदा करण्याच्या विडा ज्यांनीं उचलला आहे, त्यांना ही श्रीमंतांची कृति फारशी मानवणार नाहीं हें खरें आहे; तथापि निर्मत्सर काव्यरसिकांस या बाबतींत श्रीमंतांचें अभिनंदनच करावेंसें वाटेल यांत संशय नाहीं. अज्ञानामुळें, परप्रत्ययनेयत्वामुळें, किंवा पूर्णपरिचयाभावामुळें आधुनिक मराठी काव्यावर येणाऱ्या आक्षेपांना प्रस्तुतचा काव्यकलाप हें बरेंच समर्पक उत्तर आहे, अशी आमची समजूत आहे.

पुणें.<br>विजयादशमी, शके १८३७.

**लक्ष्मणशास्त्री लेले.**



# हृदयनिवेदन.

**काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें,**
**परी त्या विश्वंभरें बोलविलें ॥ १ ॥**

—श्रीतुकाराम.

काव्यकला व चित्रकला या दोघी सख्ख्या किंबहुना जुळ्या बहिणी आहेत, असें म्हटल्यास फारसा प्रत्यवाय येईल असें वाटत नाहीं. दोघींची कार्यकारण-मीमांसा जवळजवळ सारखीच आहे. अभिज्ञानशाकुंतलाच्या सहाव्या अंकांत शकुंतलेचें चित्र काढीत असतां महाभाग राजा दुष्यन्त म्हणतो:—

**यद्यत्साधु न चित्रे स्यात्क्रियते तत्तदन्यथा ।**
**तथापि तस्या लावण्य रेखया किंचिदन्वितम् ॥ १ ॥**

प्रस्तुत श्लोकांत महाकवि कालिदासांनीं चित्रकलेचें रहस्यच विशद केलें आहे. चित्रांत रेखा जी कामगिरी बजावितात तीच कामगिरी काव्यांत शब्द बजावितात. रेखांकित चित्र हें ज्याप्रमाणें मूळ स्वरूपाची पुसट पुसट ओळख करून देतें त्याचप्रमाणें शब्दही मूळकाव्याची किंचित् ओळख पटवितात. म्हणजे रेखांकित चित्र हें जसें मूळ स्वरूपाची कल्पनेनें व स्मरणशक्तीच्या शलाकेनें काढलेली प्रतिकृति आहे, तसेंच काव्य (ज्याला आपण काव्य म्हणतों तें) हें स्मरणशक्तीच्या साह्यानें काढलेलें शब्दचित्र आहे. कसें तें पाहूं.

विश्वांतील अनंत दृश्य व अदृश्य व्यापार कमीअधिक प्रमाणांत हृत्पटल अहोरात्र उल्लिखित करीत असतात. त्यांतील कांहीं व्यापारांचे आघात विशेष जोराचे झाल्यामुळें अंतरंगास आंदोलन मिळून तें प्रथम अस्थिर व चंचल होतें, व कांहीं वेळानें त्याच्यांत अवर्णनीय पण केवळ अनुभाव्य असा आनंद उत्पन्न होतो. याच आनंदाची परमावधि झाली म्हणजे उपरिनिर्दिष्टप्रकारें झालेली संवेदना स्मरणशक्तीस चालना देते, व स्मरणशक्ति जागृत होतांच ती तो मागून आलेला आघात (धक्का) वाणीवर करते. एथपर्यंत शब्दाची अवश्यकता नसल्यामुळें संवेदना जशीच्या तशीच अंतरंगापासून तों वाणीपर्यंत प्रतीत होते. परंतु पुढें मात्र पारतंत्र्याला आरंभ होतो. शब्द उच्चारण्याची पाळी आली

कीं, 'हा शब्द घालूं कीं तो घालूं'; 'तो बरा दिसेल कीं हा दिसेल,' या विचारमालिकेस अतएव शब्दचहाटळीस आरंभ होतो. ही विचारमालिका म्हणजेच पारतंत्र्याची शृंखळा. शब्दांत खोडाखोड, शोध, शोधांत शोध, अतएव जांवई शोध घालतांना लेखकाची जी तारंबळ व दैना उडते तिची ज्याला चांगली जाणीव असेल त्यालाच वरील म्हणण्याचें खरें रहस्य समजणार आहे. अंतरंगांतील भावना शब्दांनीं बरोबर व्यक्त करितां येईनासें झालें म्हणजेच ही शब्दांची धरपकड सुरू होते. 'वाचमर्थोऽनुधावति' या सुभाषितांचा रूढ अर्थ कांही असला तरी त्याचें खरें इंगित वरील विधानांतच आहे. तात्पर्य, वाणी ही अंतर्भुवनाची देहली आहे, किंवा असेंही म्हणतां येईल कीं, ती अंतःसृष्टि व शब्दसृष्टि यांस जोडणारी एक संयोगीभूमि आहे. आतां वरील विवेचनावरून हें उघड उघड सिद्ध आहे कीं, आपण ज्या छंदोबद्ध शब्दसमूहाला काव्य असें संबोधितों तें खरें काव्य नसून केवळ अंतरंगांत उदित झालेल्या खऱ्या काव्याची पुसट पुसट नक्कल आहे, अंधुक प्रतिमा आहे, वाणीचा पारतंत्र्यांतील विलास आहे, बुद्धीनें रंगविलेलें शब्दचित्र आहे. 'मूळ' व 'चित्र' यांतील भेद ज्याला उत्तम कळला त्याला वरील म्हणणें पचविण्यास कठीण जाणार नाहीं. वरील विधानाचा प्रत्यय आपल्यास दुसऱ्याही तऱ्हेनें आणून देतां येईल. शब्दकाव्य हें अंतःकरणांत उदित झालेल्या खऱ्या काव्याची केवळ ओळख करून देणारें अस्पष्ट चित्र असल्यामुळें त्याच्यापासून ज्याच्या हृदयावर मूळचें काव्य उदित झालें असेल त्याला जितका व जसा आनंद होतो तितका व तसा आनंद इतरास होणें दुरापास्त आहे; व म्हणूनच कित्येक वेळा 'कवीचा आनंद कविच जाणे' असें म्हणावें लागतें. 'भिन्नरुचिर्हि लोकः' हें तत्त्व जरी खरें असलें तरी त्याचेंही बीज वरील म्हणण्यांतच आहे हें सूक्ष्म विचारान्तीं कळून येईल. असो.

अशा प्रकारचीं जीं शब्दचित्रें प्रस्तुत लेखकाकरवीं निर्माण झालीं, त्यांतील कांहीं निवडक एकत्र करून तीं आज तो 'हृदयतरंग' या नांवानें महाराष्ट्ररसिकांस सप्रेम सादर करीत आहे. जनतेस, कोणत्याना कोणत्या तरी मिषानें, जीं शब्दचित्रें आवडलीं तींच प्रायः यांत ग्रथित केलीं आहेत.

या शब्दचित्रांपैकीं 'नीतिसुधा' हें अपूर्ण आहे. प्रकरण फार मोठें व

जागा शेवटीं अगदी मर्यादित राहिलेली. त्यामुळें तें पूर्ण समाविष्ट करतां आलें नाहीं. नीतिसुधेंतील प्रत्येक गीति आपापल्यापरी स्वतंत्र असल्यामुळें वाचतांना रसहानि होण्याचा मुळींच संभव नाहीं. प्रत्येक चित्राचा लेखनकाल व ज्या नियतकालिकांतून तें प्रसिद्ध झालें त्यांचीं नांवें अनुक्रमणिकेंत दिलीं आहेत. नियतकालिकांच्या संपादकांनीं लेखकास सदर चित्रें पुस्तकरूपांत काढण्याची परवानगी दिली याबद्दल तो त्यांचा आभारी आहे. चित्रांची जुळणी विषयानुरोधानें केली असल्यामुळें कालानुक्रम पाळतां आला नाही. या पुस्तकांत एकंदर ७८ चित्रांचा समावेश केला असून त्यांचीं ८ मंडलें केली आहेत व त्यास तरंग अशी संज्ञा दिली आहे. पहिल्या तरंगांत ईश्वरपर कविता आहे. दुसऱ्या तरंगांत क्षुल्लक विषय घेऊन ज्याची परिसमाप्ति ईश्वरांतच झाली आहे, अशी कविता ग्रथित केली आहे. तिसऱ्या तरंगांत साध्या विषयावरील व चवथ्यांत भाषांतरित कविता देऊन पांचव्यांत महाजनप्रसंशापर समाविष्ट केली आहे. सहाव्यांत विनोदपर, सातव्यांत कथानकपर व आठव्यांत उपदेशपर, नीतिविषयक कविता घातली आहे.

प्रस्तुत पुस्तकांतील दुसरी निर्देश्य गोष्ट म्हणजे त्यास वे. शा. सं. लक्ष्मण गणेशशास्त्री लेले यांनीं लिहिलेली विद्वत्ताप्रचुर, सुंदर व मार्मिक प्रस्तावना ही होय. शास्त्रीबोवांनीं थोरपणानें व थोरमनानें प्रस्तुत पुस्तकास सुंदर प्रस्तावनेची जोड दिली, याबद्दल हा जन त्यांचा फार फार आभारी आहे.

असो. प्रस्तुत पुस्तकासंबंधानें लेखकास याहून जास्त सांगतां येण्याजोगें कांहींच नाहीं व यदाकदाचित् असलें तरी तसें करणें त्याच्या अधिकाराबाहेरचें आहे.

ज्यांनीं आपल्याला यथाशक्ति साहाय्य केलें त्यांचे आभार मानतांना उपकृत मनुष्याला केव्हांही आनंदच वाटणार. इतर मंडळींना हा आभारप्रदर्शनाचा विधि औपचारिक वाटतो. पण त्याचें खरें रहस्य उपकारी व उपकृत यांसच ठाऊक. इतरांना तें अनुभाव्य नाहीं. श्रीमंत नारायणराव बाबासाहेब घोरपडे सरकार इचलकरंजी, यांनी त्यांस हा ग्रंथ अर्पण करण्याची परवानगी दिली व ग्रंथप्रकाशनाचे कामीं आर्थिक साहाय्य केलें, याबद्दल लेखक श्रीमंतांचा अत्यंत ऋणी आहे.

ज्यांस ईश्वरानें आनुकूल्य दिलें अशा गृहस्थांनीं यथाशक्ति साहाय्य केल्यास त्यांत विशेष नवल नाहीं. पण ऐपत नसतांही जो पुरुष केवळ यदृच्छेनें साहाय्य करावयास पुढे सरसावतो त्याचें कौतुक करावें तितकें थोडेंच आहे. या न्यायानें श्रीमन्मयूरभक्त रा. रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए., संपादक मुमुक्षु, यांनीं यास जें साहाय्य केलें त्याजबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत.

ज्यांनीं आपल्या अपूर्व विद्वत्तेनें, अलौकिक सौजन्यानें व लोकोत्तर प्रेमळपणानें प्रस्तुत लेखकास अगदीं आत्मीय केलें आहे त्या रसिकवर रा. रा. श्रीकृष्ण नीलकंठ चाफेकर एम्. ए. एल्. एल बी. हायकोर्ट वकील, एलिचपूर यांचे आभार मानावयाचे म्हणजे लेखकानें स्वतःचेच आभार मानावयाचे! त्यांचे आभार मानतांना 'शब्दसिंधु हा सारा आटे' अशी स्थिति झाल्यास त्यांत तरी कसचें आश्चर्य?

प्रस्तुत पुस्तकांतील पाठभेद कायम करण्याचे कामीं, व्याकरणदोष टाळण्याचे कामीं व मुद्रितें शुद्ध करण्याचे कामीं लेखकाचे परमस्नेही सुप्रसिद्ध धार्मिक लेखक रा. रा. कृष्णाजी गोविंद किनरे, एकनाथ पांडुरंग रेंदाळकर व माधव गोविंद भिडे यांनीं, पद्यांतील तालसुरासंबंधीचे दोष काढून टाकण्याचे कामीं कवि गिरीश व अरविंद यांनीं व पुस्तकप्रकाशनाचे कामीं रा. रा. अच्युत चिंतामण भट यांनीं लेखकास जें साहाय्य केलें त्याबद्दल तो त्यांचाही फार आभारी आहे.

शेवटीं ज्या हृदयस्थ जनार्दनानें, परम मंगल परमात्म्यानें प्रस्तुत पुस्तकांतील शब्दचित्रें काढविलीं, त्याला अनन्यभावें शतशः प्रणाम करून व श्रीज्ञानेश्वरांच्या शब्दांनींच त्याजपाशीं खालील वरदान मागून सदर निवेदन आटोपतो.

**आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ॥**
**तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥ १ ॥**
**जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मीं रति वाढो ॥**
**भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥ २ ॥**
**दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ॥**
**जो जें वांच्छील तो तें लाहो । प्राणिजात ॥ ३ ॥**

**वर्षते सकलमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ॥**
**अनवरत भूतळीं । भेटो तयां भूतां ॥ ४ ॥**

१९३, बुधवार पेठ, पुणें.
आश्विन शु० १५ शके १८३७

सर्वांचा कृपाभिलाषी,
**अनंततनय.**

---

# शुद्धिपत्र.

[अर्थविपर्यास करतील अशाच अशुद्धांचें शुद्धीकरण खालीं दिलें आहे.]

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १६ | २ | कल्पना | कामना |
| ३७ | १० | कुमुदुनी | कुमुदिनी |
| ४० | १२ | किर्ती | किति |
| ४१ | ४ | गताद्धिं | गताब्दिं |
| ६२ | २ | नज | नच |
| ८७ | १३ | भूजकोणीं | भुजकोणीं |
| १३३ | ११ | जरी | जर |
| १३८ | १ | वाईट | वाइट |
| ,, | २ | भरवाहक | भारवाहक |

---

# श्रीमंत
## नारायणराव बाबासाहेब घोरपडे, इचलकरंजी.



### आर्या ( गीति ).

श्रीरंग युद्धरंगीं विभूतियोगीं कथी ‘ नरांमाजीं ।
पार्था ! जाण नराधिप विशेष विलसे विभूति ही माझी ’ ॥ १ ॥
विश्वासपुरःसर ही भगवद्वाणी रुचे नृपा ! मजशी ।
हृदयतरंग म्हणोनी हे मी सादर समर्पितों तुजशी ॥ २ ॥

# अनुक्रमणिका.

# हृदयतरंग.

## तरंग १ ला.

### १. ईशवंदन.

(शार्दूलविक्रीडित.)

सर्वेशा! रमती सदा सुजन जे त्वन्नामगानामृतीं ।
त्यांना तूं कथिसी सुधामय वचें, 'स्पर्शे अगा! ना मृती' ॥
आलें हे तव शब्द बा! अनुभवा माझ्या रमानायका! ।
'खोटे' हे वदवूनि सांग अपणा घेतील आम्नाय का? ॥ १ ॥
कष्टानें जनरंजनीं खरचुनी चोवीस संवत्सरें ।
येतां त्वच्चरणीं पुन्हा परत हा तूं प्रेषिसी वत्स रे ॥
गातों मी तुझिया कथा सुरस या प्रेमें सुधावर्षिणी ।
दावो कीं तव यावयास भवनीं सद्वीथिका तारिणी ॥ २ ॥
लागावी जनता तुझ्या पदिं, तिनें गावा तुझा कीं स्तव ।
गातों यास्तव जें विवेकें वदला प्रेमें सदा वास्तव ॥
गीताही कथितों तुझ्या चरणिं जी याया नरा वाट ते ।
होवो ही सुतरा प्रपंचसरिता जी दुस्तरा वाटते ॥ ३ ॥

---

१. मराठींतील प्रसिद्ध मासिक पुस्तक केरळ कोकिळ हें बंद पडून पुन्हा सुरू झालें त्या वेळीं कोकिळाचे मुखावाटे असे उद्गार निघावे हें साहजिक आहे. २. वद. ३. चांगली वाट. ४. श्रीस्वामी विवेकानंद. ५. खरें.

नादब्राह्मिं तुझ्याच लीन सखया! होणार जो सर्वदा ।
त्या माझ्या नवकंठनादिं भरुनी सामर्थ्य तूं सर्व-दा ॥
मातें शक्त करीं जनास तव हा संदेश सांगावया ।
ज्यासाठीं मज लाविलेंस फिरुनी हा जन्म तूं घ्यावया ॥ ४ ॥
सुग्रीवा[1], ध्वनिही तसा अतुल हा देवोनि देवा! मला ।
संचारार्थ दिलेंस विश्व अवघें विस्तीर्ण हें निर्मला! ॥
केलें त्वांच खरें मनोहर असें मद्गान सेवावया ।
सर्वां सोत्सुक सर्वदा सकरुणा! सोत्कंठ सर्वाश्रया! ॥ ५ ॥
खाया गोड फलें, सुधाजल तसें मातें सदा प्यावया ।
साधू सज्जन सज्ज आम्रतरु हे द्याया मला आश्रया ॥
नानारम्यलतानिकुंजयुत हे आरोम[2] आरामें[3] या ।
लाभावे म्हणुनी जगीं विरचिले सर्वत्र तूं चिन्मया! ॥ ६ ॥
तद्वत् तूं पढवावया अनुदिनीं वा रंजवाया मला ।
प्रेमें प्रेरिसि गद्यलेखक कवी भाषापटु प्रेमला! ॥
श्रोते थोर विशालधी सहृदयी माझ्या सदा जीवना ।
नेमें चालविती धना वितरुनी, हीही तुझी प्रेरणा ॥ ७ ॥
ठेव' हा इतुका दिला मज तुवां देवा दयासागरा! ।
मागोनी तुज आणखी वरिवरी संस्तूय सर्वेश्वरा! ॥
होऊं काय कृतघ्न मी तुज विभो! छे छे! अशी वासना ।
होवो ती न कधीं मला; सुखद कीं होईल जीवास ना ॥ ८ ॥
वर्णो नित्य गुणानुवाद तव हा देवा! तुझा कोकिल ।
होवो त्यास तुझी न विस्मृति कधीं होवोनि मोहाकुल ॥
देवो तो सकलांस सौख्य तव जे पादांबुजीं वागती ।
लाधो जे भवतप्त त्यां तव हरे! पादांबु जीवां गती ॥ ९ ॥

---

१. चांगला गळा. २. उपवनें. ३. विश्रांति.

## २. प्रणतप्रणति.

(पृथ्वी.)

तुझीच सदया! दया, सुदिन आजि हा पाहिला ।
प्रफुल्ल मन जाहलें, हरिख अंतरीं दाटला ॥
तनू पुलकिता किती, नयन पूर्ण मोदाश्रुंनीं ।
न शब्द वदनीं फुटे गहिंवरें गळा दाटुनी ॥ १ ॥
अतर्क्य महिमा तुझा, अमति मी, कसा वानवे ? ।
अपार नभ तूं प्रभो! विहग मी कसें लंघवे ॥
हिमाद्रि नगराज तूं विकल मी कसा वेंघवे ।
अगाध जलराशि तूं अबल मी कसा पोहवे ॥ २ ॥
मदीय जननीच तूं करुणचित्तकादंबिनी ।
मयूर तव मी तुला स्तवि करोनि केकाध्वनी ॥
दयाब्द जगदीश तूं, भजक मी तुझा चातक ।
समाश्रय मदीय तूं ऋतु वसंत मी त्वत्पिक ॥ ३ ॥
पयोनिधि विशाल तूं तुजमधील मी वीचिका ।
सहस्रदल पद्म तूं तुजमधील मी रेणुका ॥
महोच्च नगराज तूं तुझिच मी परी अंशिका ।
महा प्रबल काल तूं तव घडीच मी चालका! ॥ ४ ॥
शशी ग्रहवरेण्य तूं विमल मी तुझी चंद्रिका ।
महा विटप तूं तुझी ललित मी लता मोहिका ॥
सहस्रकर तूं तुझी रुचिर मी विभा साजिरी ।
प्रबुद्ध कविहंस तूं सुकविता तुझी मी खरी ॥ ५ ॥
असोनि तव मी असा तुजसवें जरी खेळतों ।
तरी प्रभुवरा! तुझा उमगतो मला खेळ तो ॥
जिथे तुजसि जाणतां भृगुवसिष्ठसे भागती ।
मदीय जगदीश्वरा! वद तिथे कथा काय ती ? ॥ ६ ॥
अनुग्रह परी घडे जर तुझा, मुका बोलतो ।

सुभव्य गिरिसानुही सहज पांगळा लंघतो ॥
असे मग जरी तुझी मजवरी कृपापाखर ।
कसा न तारि गाइं मी तव यशा सदा सादर ॥ ७ ॥

समग्र जनता तुझी विमल मूर्ति मी मानुनी ।
क्षणक्षणहि वेंचिला तदनुरंजनीं सेवनीं ॥
न भेद रिपुमित्र हा कधिंच म्यां प्रभो! पाळिला ।
धनास वितरो न वा मज सुखें निकें मंगला! ॥ ८ ॥

गतादिंद भजका तुझ्या सुख कसें बसें लाधलें ।
परंतु पुढती मिळो अधिक त्याहुनी चांगलें ॥
सदैव इतुकीच ही मम असे तुला याचना ।
घडो सफल ती तरी स्तुतपदा दयावीक्षणा! ॥ ९ ॥

विचार करितां न, मी अहह! काय हें मागतों!।
कळे न घडला कसा मम करीं असा दोष तो ॥
सुनीति तव ही विभो! सकलविश्रुता या जनीं ।
कृपा न फळते तुझी तुज समर्पिल्यावांचुनी ॥ १० ॥

पवित्र तुलसीदल प्रणमुनी अगा अच्युता!।
सभक्ति जइं अर्पिलें तुजसि रुक्मिणीनें स्वतां ॥
तसेंचि तुज शाक जैं द्रुपदकन्यकेनें दिलें ।
तइंच विपदीं तयां प्रभुवरा! तुवां रक्षिलें ॥ ११ ॥

सगद्गद रवें यदा स्मरुनियां तुझीं पावलें ।
अनन्यगतिकें तुला कमल त्या गजेन्द्रें दिलें ॥
स्वकीय बिरुदास तूं नुतपदा तदा जागुनी ।
त्वरें प्रकट होउनी अवनिलें तयालागुनी ॥ १२ ॥

न शब्द मम हे प्रभो! तुझिच वैखरी ही भली ।
स्वयेंचि विजयास तूं समरभूवरी बोधिली ॥
'अनन्यगति होउनी जलदलें सुमें वा फलें ।
समर्पि मज त्यास मी म्हणतसें पहा 'आपुलें" ॥ १३ ॥

जडाजड समग्र हें तव असे जगत् मंगला! ।
न पत्र, फल, पुष्पही मम असें म्हणाया मला ॥
समर्पुं तरि काय मी मज कळे न बापा! वदें ।
विशेष फल कोणतें तुज तुझेंच देण्यामधें? ॥ १४ ॥
कृपा करुनि अल्प तूं मज दिलेंस जें काय तें ।
करूं परत मी जरी तुजसि तेंच हे श्रीपते! ॥
रुचेल तुजला कसें भय मदीय वाटे मना ।
कृतघ्न वदशील कीं मजसि तूंचि नारायणा! ॥ १५ ॥
नको मजसि कांहिंही विसर जें तुला याचिलें ।
रुचेल तुजला जसें करिं तसेंच इच्छाबलें ॥
तरीहि तुज एक ही विनति कीं जगन्नायका! ।
असें तव जसा असो नित तसाचि मी लाडका ॥ १६ ॥

---

## ३. ईशस्तवन.

(पृथ्वी.)

अगा खलविदारका! सुरवरा जगच्चालका! ।
पदाब्जनततारका! सकलकामसंपूरका! ॥
प्रकामसुखदायका! असुरवृंदसंहारका! ।
प्रभो! सुजनरंजका! भजकविघ्नविध्वंसका! ॥ १ ॥
पदप्रणतवत्सला! कलिमलांतका! प्रेमला! ।
भला सुदिन हा मला तव कृपाबलें लाभला ॥
हृदाशय सुशांत हो बहु, जसें प्रभातीं सर ।
प्रफुल्ल मन, पद्म तें उगवतां जसा भास्कर ॥ २ ॥
गताब्दिं बहु सोशिल्या सतत यातना मीं यदा ।
तईंच शुभकाळ हा मजसि दाविला शर्मदा! ॥
महाभयद रात्रिचे प्रहर चार झाल्यावरी ।
प्रसन्न रवि ये नभीं तिमिरराशि जो संहरी ॥ ३ ॥

शरण्यसुहृदा! सदा नुतपदा! जुळोनी करां ।
त्वदीयपदपंकजीं शरण दीन मी श्रीकरा! ॥
असो तव कृपा अशी विमल नम्र दासावरी ।
भवज्जनगणास जी सतत संकटीं सांवरी ॥ ४ ॥
तुझीं विमल कीर्तनें दुरित वारिती सुंदरा! ।
उगीच मग मी तरी स्वमनिं कां धरावें दरा? ॥
विपत्तिजलधीमधें अवश्यसोग्य कैवर्तक ।
तुझ्याविण दुजा नसे मज गमे नतोद्धारक ॥ ५ ॥
भयाण भव हा दिसे अडकलोंचि मायातमीं ।
कितीक बुडले अजून बुडती जसा त्यांत मी ॥
महाभवदवांतुनी गुणगणाश्रिता काम-दा! ।
असंख्य जन तारिले, विदित हें न का दुर्मदां? ॥ ६ ॥
खलज्वलनताप हा लवभरी न भो! सोसतो ।
म्हणोनि पदिंचा तुझ्या धरित मी प्रभो! सोस तो ॥
नसेल अशि तीव्रता जलधिजन्य हालाहलीं ।
मदीय तनु पोळली न तुलनाहि हालां हलीं[१] ॥ ७ ॥
तितीर्षु शिरलों तुला समजुनी मनीं नाव रे ।
भवांबुधिंत मी परी उदक तें मला नावरे ॥
कसा गरगरा मला फिरवितो भवावर्त तो ।
तुझें भय धरून मी जरि भवीं भवा! वर्ततों ॥ ८ ॥
कळे न करूं कोणती तुजसि आजि मी याचना ।
सुचे न, मति बावरे स्तिमित होय नारायणा! ॥
प्रभो! सकल जाणसी स्वमनिं भाव जो जो धरीं ।
कशास मग लाविसी मजसि तूं वदाया तरी? ॥ ९ ॥
करीं तारि रुचे जसें, तुज दिसेल जें योग्य तें ।
न काय वद जाणसी प्रभु! मदीय तूं योग्यते ॥

---

१. सांप्रत.

कृपाचि करणें तरी करिं समर्थ दासास या ।
तुझ्या सुरवरा! सदा अतुल वैभवा गावया ।। १० ॥

## ४. ईशलीला.

( शिखरिणी. )

सुरेशा! गातां त्वत्सुयश थकले बा! निगम ते ।
तसा झाला पाहीं हतबल महाशेष गमतें ॥
दयाळा गोपाळा! म्हणुनि सखया बा! सुरतती ।
सुखानें वांच्छोनी तवपदिं कृपापांसु रतती ॥ १ ॥
तुझ्या पायीं मुक्ति प्रिय बहुत जी संत-ततिला ।
नतीवांचूनी जी कधिं नच मिळे संतत तिला--॥
मनीं वांच्छीं देवा! प्रभुवर! नता या मज न कां ।
मिळावी सांगा ती मुनिहृदयविश्रामजनका! ॥ २ ॥
कृपासिंधो! बंधो! करुनि करुणा बा मज पहा ।
अनाथांचे नाथा! सतत करितों नामजप हा ॥
जगन्नाथा! माथा धरुनि चरणीं हा विनत मी ।
रमो ना दुःसंगीं मम मति बुडो तेविं न तमीं ॥ ३ ॥
फिरे व्योमीं नेमें सतत विधु तो तेविं तरणी ।
चुकेना धाकानें तव, घन जलाचे वितरणीं ॥
बघोनी ऐशी ही अचल तव सत्ता परम ती ।
तुझे नामीं प्रेमें खलजनहि आपाप रमती ॥ ४ ॥
तपीं बाष्पाकारें रविखरकरें वारि जलद ।
नभीं जाई निर्मी अधवलतनूधारि जल-द ॥
पुन्हा वर्षाकालीं गळुनि जल होई विभव हा ।
बघोनी ध्यातीना तुज, तरति ते केविं भव हा ? ॥ ५ ॥
प्रभो! तोयाग्नीचें उपजत असे वैर न मिती ।
समुद्रीं दोघेही वसति; बघुनी लोक नमिती ॥

जिरे प्रौढी सारी मुळिं न गणिती चित्तिं तनुता[1] ।
तुला वंदायातें; सतत म्हणुनी ते नत नुता! ॥ ६ ॥
वसंतीं वृक्षाली दलसुमभरानें नवि तरी ।
दिसे तुंगस्थानीं[2] उदक जरि कोणी न वितरी ॥
विचारांतीं वाटे कृति तुझिच बा! ही सकरुणा ! ।
अनंता! दावीं कीं अशिच मज दीनास करुणा ॥ ७ ॥
प्रभातीं मध्यान्हीं कुसुमचय कांहीं विकसला ।
निशीथींही कांहीं उपवनिं वनीं तेविं, कसला–॥
चमत्कारी देवा प्रभव तव हा; तो जन-मना--।
करी आश्चर्यानें स्तिमित, करवी नित्य नमना ॥ ८ ॥
खरें पाहूं जातां असुखद गणी हें भव मन ।
दयाळा! तैसे त्या गमति दुसरे लाभ वमन ॥
तुझ्या पायावीणें अखिल जगती भंगुर मला ।
दिसे यासाठीं त्वच्चरणिं जन हा पंगु रमला ॥ ९ ॥
तुझी गाथा ऐको श्रवणयुग हें तेविं रसना ।
तुला गावो; दे हें मजसि, मम होवो विरस ना ॥
चुरो पादातें हें करयुगुल, डोळे हरि! तसे ।
बघोत त्वद्रूपा, अघनग सदा जें हरितसे ॥ १० ॥
अवघ्राणो नासा समुद तव निर्माल्यसुमन ।
तुझ्या ध्यानीं लागो त्यजुनि विषयांतें मम मन ॥
रिघोत त्वद्देवायतनिं[3] पद, अन्यत्र न तसे ।
प्रभो! होवो माझें शिर तव पदीं मात्र नतसें ॥ ११ ॥

## ५. आर्ततेचे कढ!

पद ( चाल—तस्करा हार्ता द्विज ... ...)

परीक्षा याची । याची भगवंता । किती ही बघसी बलवंता ॥ ध्रु० ॥
अजुनि हा कैसा । कैसा उतरेना । कसा तव दिव्य पद्मनयना! ॥

१. लघुपणा. २. उंचस्थानी ( पर्वताच्या शिखरावर.) ३. तुझ्या मंदिरांत.

काय गा हनि । हीन दयासिंधो । ब्याधापरिस? दीनबंधो! ॥
जनूपासोनी । पासुनि विपदा या । सोसिल्या स्मरुनि तुझ्या पाया ॥
वस्तु या सकळ । सकल नाशवंत । ऐकिलें वदनीं तव नाथ! ॥
पदींपदिं याचा । यास केशिराजा! । अनुभव येइ महाराजा! ॥
कालचें आज । आज दिसे गेलें । आजचें कांहिं उद्यां नुरलें ॥
केविं तरि वद बा । या न जाति अंता । गूढ हें गूढाचि गुणवंता! ॥१॥
सुखाचा क्षण रे । क्षण रे एकादा । चमकला जरी पूज्यपादा! ॥
तरी तो विलया । विलया निमिषांत । नेसि तूं काय तुझा हेत ॥
'भिन्न मम खेळ । खेळ' कथिसि वाचे । कपाळीं एकचि परि याचे ॥
काय हा न्याय । न्याय नयाधीशा! । कळे ना यासि परमपुरुषा ॥
अज्ञ हा जीव । जीव रमाकांता! । कळे त्या केंवि तुझी समता ॥ २ ॥
असा जरि होता । होता नियतीं या । मांडिला खेळ रमानिलया! ॥
कशाला यातें । यातें नरजन्म । दिला रे सांग पुण्यधाम! ॥
वृक्ष पाषाण-। आदि जन्मकोटी । बऱ्या त्या याहुनि जगजेठी! ॥
नसे कीं भान । भान त्यांत साचें । जगाच्या दुष्ट विषमतेचें ॥
यशोऽयश सौख्य । दुःख लाभ हानी । वाटती समचि चक्रपाणी! ॥
म्हणुनि तुज अंतीं । अंतिं विनंती ही । नुरविं या जाणिव लवभरिही॥
"कांहिं तरी मागे । मागे मतिमंद । घेउनी कांहीं तरि छंद ॥"
नको हें वदुनी । वदुनि दीननाथा!। मोकलूं दीना श्रीकांता! ॥
देइं जें मागे । मागे या भ्रांता । दूर बा न करीं श्रीमंता! ॥ ३ ॥

---

## ६. राष्ट्रीय प्रार्थना.

(शार्दूलविक्रीडित.)

विश्वेशा भगवन् पुराणपुरुषा भक्तप्रिया मंगला ।
प्रेमें भक्तिभरें तुला करित मी भो! वंदन प्रेमळा! ॥

---

१. विपदा.

निद्रा घेसि किती अनंतशयना बा! होइं जागा त्वरें ।
बापा! ब्रीद तुझें 'नतोद्धरण' हें पाळावया ऊठ रे! ॥ १ ॥
कर्तव्यीं रति दे कृपा करुनियां हें एक मागें तुला ।
झाला आळस हा पुरे प्रभुवरा दे जागृती उज्ज्वला ॥
राहे जें अवशेष आयु मम तें सत्कारणीं लागुं दे ।
दे दे दे वरदान हेंचि मजला डोलेन त्यानें मुदें ॥ २ ॥
नाना वन्यलता विशाल विटपी तुंगाद्रि भीमाकृती ।
पक्षिश्वापदसंघ पुण्यसरिता ज्या वर्तती भारतीं ॥
तीं सारीं सुकृती सदैव दिसती कीं अन्यकार्यीं रत ।
बापा! काय वृथाच तें वदति जे 'सत्वाढ्य हें भारत'!॥ ३ ॥
ऐसें भारतवस्तुजात अवघें धन्यत्व पावे जनीं ।
जो तो प्रेमभरें शिरावरि धरी अत्यंत वाखाणुनी ॥
ज्ञानी भारतजन्म मानव अम्ही हा! हा! वदूं काय गा! ।
भासूं कीं उपयोगहीन अगदीं निर्माल्य साऱ्या जगा! ॥ ४ ॥
याचा दोष वृथा कशास इतरां आम्हीच आहों तसे ।
नाहीं देव दया न धर्म नयही कांहींच आम्हां नसे ॥
नाहीं धैर्य तसें न शौर्य लवही आम्ही नृरूपी पशू ।
ठावा द्वेष तसाच मत्सर पुरा अन्योन्य शत्रू असूं! ॥ ५ ॥
धैर्ये जो सरसावतो मनुज तो आम्हांचपैकीं जरी ।
आम्हां तें बघवे न लेशभरही द्वेषें जळूं अंतरीं ॥
नाना यत्न करूं करूं मसलती ओढूं तया खालतीं ।
पाडूं दांत, तया धुळीस मिळवूं मानूं न कांहीं क्षिती! ॥ ६ ॥
वेदांती म्हणवूं न एक जरिही ठावा अम्हां वेद तो ।
श्रद्धा भक्ति तशी जरी न लवही 'साधू' असे गाजतों ॥
गाठोडें अमुचें 'ट'[१] चें मिळवुनी जें पूर्वजीं ठेविलें, ।

---

१. पूर्वजांनी 'भट्ट' यांतील 'ट' टाकून देऊन ते 'भट' झाले होते आणि आम्ही तो 'ट' पुन्हा मिळवून 'भट' होतों ते 'भट्ट' झालों हा भावार्थ.

त्यानें भोजनभट्ट मात्र बनलों निःसंग झालों भले! ॥ ७ ॥
देवा! या स्थितिमाजिं दुःसह अशा आम्हां पहासी जरी।
याची लाज तुलाच, तूं असासि कीं अस्मन्नियंता हरी! ॥
पुत्रोत्पादन हेंच एक करुनी कर्तव्य ना संपतें–।
बापाचें; जगदीश्वरा सकरुणा! बोलों तुला काय तें! ॥ ८ ॥
व्हावें वंशललामभूत तनयें सत्वाढ्य तैसें जनीं।
सत्यप्रज्ञ युधिष्ठिर प्रथित कीं दाताहि शूराग्रणी ॥
ऐसी केवळ आस चित्तिं धरुनी होईं तसें काय तें?।
लागे कीं जनका स्वकार्य करणें त्या हेतुच्या सिद्धते ॥ ९ ॥
'व्हावे सुंदर कुंभ रम्य अपुले' ऐसें मनीं वांच्छुनी।
देई लक्ष तयाकडेचि नियमें कुंभार रात्रंदिनीं ॥
आम्हां भारतवर्षियांप्रति तुवां निर्मीयलें जेधवां।
होतें लक्ष कुठे? कुठे मति तशी? सर्वकषा यादवा! ॥ १० ॥
आणोनी मनिं हें 'ययास जगतीं कीं मींच पैं धाडिलें'।
जेणें येइल ना अधोगति अम्हां तें पाहिजे पाहिलें ॥
आम्हां यास्तव दे सुरम्य घटना हें मागतों वत्सला!।
देशी ना इतुकें तरी तुझिच ती लज्जा असो गा तुला! ॥ ११ ॥

---

## नंदयशोदानंद!

**पद** (**चाल**–या विरहा कां भीर्सा ... ...)

वंदिं यशोदानंद। मना॥ सज्जनरंजन, भवभयभंजन,
नंदनंद गोविंद ॥ मना ॥ ध्रु० ॥

बारा धंदे सोडुनि अवघे, घेईं हरिपदछंद ॥ १ ॥
टाकुनि सारे रस अलि जैसा, सेवी कमलमरंद ॥ २ ॥
व्यर्थ कशाला चिंता करिसी, स्मर दुबळया सुखकंद ॥ ३ ॥
करिति बिचारीं काय पांखरें शेति कधीं मतिमंद ॥ ४ ॥
परि न तयांसीं ठेवि उपाशी, पोषि विहंगमवृंद ॥ ५ ॥

दुर्भिक्षाचीं ग्रंथिगदाचीं, कृष्णाग्रें अति कुंद--॥ ६ ॥
दाट पसरलीं जेविं गजावलि जलिं विहरे स्वच्छंद ॥ ७ ॥
जातिल विलया येतां उदया, हरि करुणामार्तंड ॥ ८ ॥
कमलानिलया अनंततनया, आस न अन्य मुकुंद! ॥ ९ ॥

---

# तरंग २ रा.

## १. आग!

(शार्दूलविक्रीडित.)

रात्रीं रम्य नितांत शांत समयीं सानंद हृन्मंदिरीं ।
होतों लोळत मी सुखें पहुडलों त्या शांतिशय्येवरी ॥
द्यावा त्रास न रात्रिंचा तरि मला स्वार्थैकदृग्दुर्जनें ।
द्वारें यास्तव लाविलीं सकलही म्यां ऊर्ध्व वातायनें ॥ १ ॥
कृत्यें जीं बहु सुष्ट दुष्ट घडलीं माझ्या करीं ते दिनीं ।
एकामागुनि एक सर्व जमलीं माझ्यापुढें येउनी ॥
विद्यार्थी जमती भराभर जसे बोलावितां प्राश्निकें ।
सेवार्थी अथवा विनंतिलिखितें घेवोनि जेवीं निकें ॥ २ ॥
कोणी भीषण भाविनी परिणती केल्या उभ्या लोचनीं ।
नैराश्योदधि घोर दुस्तर पहा दावी मला तें कुणी ॥
कोणी देउनियां रजास गजता दावी असंभाविका ।
तुंगोत्तुंग विशाल संकटगिरीराजी धृतिध्वंसिका ॥ ३ ॥
नैराश्योधदिच्या तटीं पलिकडे कोठें तरी तों मला ।
आनंदाकृति लोभनीय दिसली भूमी महा निर्मला ॥
तैं मातें दिसली चमत्कृति नवी नैराश्यसंहारिका ।
विघ्नाद्रिक्षितिजावरी चमकली तेजस्विनी तारका ॥ ४ ॥
कासारोत्थित वीचिका परतटा जाऊनि पूर्वस्थला ।

येती जाति पुन:पुनः परतती त्या स्वैरिणी चंचला ॥
होती लुप्त जलीं जशा सकलही चित्रें तशीं सर्व ती ।
झालीं लीन मनांतलीं मनिं पुन्हा आलीं न तीं मागुतीं ॥ ५ ॥
झालें लीन असें न जों घडिभरी तों त्या मनोमर्कटें ।
केला खेळ सुरू पुन्हा विरचुनी नानाविधी तर्कटें ॥
नेवोनी मज मुंबईस अथवा कोल्हापुरीं माहुरीं ।
आणी तें दुसऱ्या क्षणीं फिरवुनी काशी अयोध्यापुरी ॥ ६ ॥
झालें श्रांत असें उड्यावरि उड्या मारोनि जों मन्मन ।
लागे बोध करावया मज पुन्हा माझें गुरू होऊन ॥
हेवा, मत्सर, दंभ, दर्प अपुलीं जागीं करोनी मुलें ।
भावी सौख्यद मंदिरें विरचुनी जों त्या प्रमोदीं झुले ॥ ७ ॥
लागे झोंप तयास त्याच निमिषीं मी मोकळा होउनी ।
अंत:सृष्टिमधें क्षणैक शिरुनी गेलों सुखीं रंगुनी ।।
झाली भेट शिवासमेत परि ती हा! हा! कुठोनी टिके? ।
जीवात्मा निजकर्मबद्ध म्हणती ज्ञाते कसें तें चुके? ॥ ८ ॥
'लागे आग, चला! पळा!' ध्वनि असा जों बाह्य सृष्टींतुनी ।
आला कर्णपथीं मनें उठविलें मातें समाधींतुनी ॥
आधीं मर्कट त्यांत धुंद पिउनी इच्छासवा जाहलें ।
चावे त्यांतहि भीतिवृश्चिक तया सैराट तें धावलें ॥ ९ ॥
होतें आतुर जाहलें मन किती ती आग पाहावया ।
सांगूं काय तरी न शब्द जवळी तें वृत्त वर्णावया ॥
घेवोनी मज मट्टहासहित तें वेगें पथीं धावलें ।
गेलें त्या सदनासमीप जळत्या, पाहोनि भांबावलें ॥ १० ॥
होते लोक अनेक हेतु धरुनी आले तिथे धावुनी ।
कोणी मौज पहावयास सहसा चोरी कराया कुणी ।।
अग्नी तो विझवावयास कुणिही, कोणी फुकी चौकशी ।
'लागे आग कशी? कुठोनि? कुणि? ही लावीयली हो अशी?' ११

'पेटे हा प्रलयाग्नि काय! धडकी चित्तीं भरे पाहुनी।
होते काय करीत लोक तरि हे?' उद्गार काढी कुणी ॥
'ही का नींज म्हणूं! किती निसुर हे! ही काळनिद्रा खरी'।
ऐसे तर्कवितर्क मात्र करिती जाती न साह्या परी! ॥ १२ ॥
होते जे असहिष्णु कोणि वदले 'झालें बरें जाहलें।
गर्वोन्मत्त नरास शासन दिलें देवें भलें चांगलें ॥
नाहीं देव, तसा न धर्म, नयही तैशी न माया दया।
नाहीं दूर परंतु देव, समजो आतां तरी हें तया' ॥ १३ ॥
कोणी लांबुनि ओरडे धडपडे ' तोडा अडे हो तिथे।
आणा पाणि, पळाच काय बघतां? ओता झणीं या इथे ॥
गाडा भिंत अशी, कसें न कळतें सारे कसे हे रडे!'।
तोंडाची टकळी दुरून नुसती कार्या न कोणी पुढें! ॥ १४ ॥
'झालें काय पहा कसा प्रभु तरी राहूं न देई सुखें।
होतें केविं परी घडे अजि कसें'? हा! हा! करोनी मुखें ॥
कोणी लांबुनि अंतरा पिळवटी टाकी उसासे महा।
दावी शब्दसहानुभूति वचनीं नक्राश्रु ढाळी अहा! ॥ १५ ॥
पूर्वींचे त्यजुनी खुळे नियम ते निर्बंध सारे तसे।
वाणी व्यक्ति विचार बुद्धि मन वा आचार यांचे असें-॥
स्वातंत्र्योद्भूत गोड सौख्य जनता भोगी बघोनी मला-।
लाधे सौख्य नितांत शांति विमला आनंदही जाहला! ॥ १७ ॥
'जाऊं आपणही चला स्वसदनीं' इच्छूनि हें मानसें।
आज्ञापी चरणा परी न चलती इच्छा मदीया नसे ॥
माझें गेह असोनिही मजसवें नेई कुठे हें खुळें।
याचा बोधचि अल्पही मज न हो शांती समग्रा ढळे ॥ १८ ॥
तेव्हां मी वदलों, 'खुळया मम मना वेड्या कसा तूं असा?।
माझें तूं म्हणण्यास लाज मजला वाटे पिसा मानसा! ॥
काडीच्यावर काडि तूं विरचुनी माडी रूख्या! निर्मिली।

कैशी जीभ वदावया लवविसी 'आहेच ती आपुली?' ॥ १९ ॥
वेड्या! वावदुका! विचारविकला! वात्याजवा वामना!।
पाहोनी नव अग्निदग्ध गृह तें आतांच आलास ना?॥
बापा! बोल बृहस्पते! बवितलें तेथें तुवां काय तें।
पायांचें दिधलेंस मात्र नुसतें भाडें मला वाटतें! ॥ २० ॥
नाहीं ज्ञात तुला वृथा मज किती संताप देवोनियां।
माझा सौख्यसमाधि कामविवशा! त्वां भंगिला निर्दया!॥
लागे खास घरास आग तुझिया नाहीं तुला दादही।
जासी काय बघावयास दुसरी! नामी तुझी रीति ही! ॥२१॥
देई ताप उमाप पापजन हा कृष्णाहि फूत्कारुनी।
विंधी दुष्ट दुरुत्तरें किति तरी रात्रंदिनी बोलुनी॥
निंदा द्वेष विकल्प वैर अथवा व्याजस्तुती मोहिनी।
अस्त्रें हीं विषदिग्ध बा! तुजवरी सोडी सदा कोपुनी॥ २२ ॥
पापी एक पचे सदैव नरकीं त्यानें दुजा पापिया।
हासावें मुख वासुनी खदखदां तैसी तुझी ही क्रिया!॥
संसारार्णवनक्रदुष्टषडरिग्रस्तें नरें वा जसें।
आत्मानात्मविचारबोध करणें चित्ता! घडे हें तसें॥ २३ ॥
मद्यागारिं उभा करीं धरुनियां जो वारुणीभाजन।
प्राशी आंबट तोंड फार करुनी कांहीं तया लाज न॥
जों जों कैफ चढे पडे धडपडे मार्गांतही लोळतो।
हा! हा! तोहि परी परा हसतसे तैसा तुझा योग तो॥ २४ ॥
चिंतेचा वडवाग्नि घोर धुमसे हृत्सागरीं या तुझ्या।
अग्नीवांचुनि पेटवी घर तुझें तूं पाहसि बा! मजा॥
गेलें होरपळूनि गेह अवघें निःसत्त्व कीं जाहलें।
नाहीं राम तयांत अल्प उरला तें वारियानें हले!॥ २५ ॥
जोरानें बघ मारि जों खवळुनी भाता असूया मना।
क्रोधाच्या उडती असंख्य ठिणग्या होती किती यातना!॥

होती त्यांत सहाय वायुलहरी या अद्भुता कल्पना ।
ज्वाला हृद्गगनास तोंचि भिडती हो भस्मसात् कल्पना ॥ २६ ॥
काळाकुट्ट विचारधूर उफळे दाटोनि अंतःपुरीं ।
लोटांचे वर लोट हे उसळती त्रेधा उडोनी पुरी ॥
होतों मी किति घाबरा घडिघडी, मातें जणूं कीं गमे ।
डोळा हा बसतो नळीं, न तगतो मी मूढ या संभ्रमें ॥ २७ ॥
माझें काय म्हणा! नसे भय मला, कोणीं कसेंही छळा ।
राहो हें गृह वा जळोचि अथवा, मी सर्वदा मोकळा ॥
जातां हें सखया! नवीन दुसरें घेईन मी सुंदर ।
जेवीं जीर्ण पटा त्यजूनि दुसरें सानंद घेतो नर ॥ २८ ॥
आहे हें जरि सत्य तथ्य तरि जें वाईट वाटे मला ।
त्याचें कारण सांगतों परिस बा! शांती धरीं प्रेमला! ॥
ज्यासाठीं जगदीश्वरें नटवरें प्रेषीयलें आपणां ।
विश्वाच्या नवरंग भूमिवरि या, तें पूर्ण झाल्याविना- ॥ २९ ॥
जाणें येथुनि नाहिं बा! निजकरीं जातां हटानें परी ।
आज्ञोल्लंघनदंड थोर करुनी प्रेषील मागें हरी ॥
टाळावा कठिण प्रवास पुढचा ऐसी जरी कामना ।
व्हावा पूर्ण करावयास हरिचा आदेश बापा मना! ॥ ३० ॥
यासाठीं प्रभुनें प्रसन्नमनसा सामुग्रि जी अर्पिली ।
यत्नें सादर पाहिजे सकल ती सप्रेम सांभाळिली ॥
लागे दुर्वह अग्नि जो निजगृहा तो शांतवायास्तव ।
शांतीची क्षम एक शीतल शुभा वृष्टी गमे वास्तव ॥ ३१ ॥
द्वंद्वें सर्व समान मान म्हणुनी माझी तुला प्रार्थना ।
शांतीच्या अवलंबनें सकलही दुःसाध्य साधे मना! ॥
शांतिप्राप्ति जया घडे मनुज तो देवत्व पावे जनीं ।
शांती काय करी न? ती मज गमे प्रत्यक्ष संजीवनी' ॥ ३२ ॥

---

## २. चुकलेलें मूल.

(मंदाक्रांता.)

बालत्वीं जो निजमृदुकरें रंजवी या जगाला।
स्वोग्रत्वानें तरुणपणिं जो तापदायी जहाला॥
वार्धक्यीं तो परि रवि दिसे बापुडा शक्तिहीन।
सत्ता जातां कवण पुसतो? देवही वृद्ध दीन!॥ १॥

मार्गीं जैसा उदकनिकटीं अध्वखिन्न प्रवासी।
विश्रांतीतें सहज बसतो टेंकुनी पादपासीं॥
व्योमीं तैसा दिनमणि बसे पश्चिमाब्धीतटाकीं।
टेंकोनी त्या असित जलदा कांतियष्टीहि टाकी॥ २॥

आलस्यानें तनु पिळवटी अल्प विश्रांति घ्याया।
दाबी हस्त स्वपद चुरुनी लांबवी श्रांत काया॥
खाया कांहीं पथिक मग तो जेविं पाथेय सोडी।
वृक्षाग्रींचीं तशि रवि फळें उत्कराग्रांहिं ओढी॥ ३॥

जैसा कांडी फिरवुनि जवें मंत्रविद्याप्रवीण।
देखावे हो प्रतिपळिं नवे दाखवी भिन्नभिन्न॥
मार्तंडाचे कर जइं तसे राहिले उंच शाखीं।
एकाएकीं सकल बुडला प्रांत तो इंद्रजालीं!॥ ४॥

पाहोनी ते तरु विनटले पीतवर्णीं विशाल।
भ्यालों, घर्मीं तनु डवडवे, जाहलें सिक्त भाल॥
हस्तीं पादीं लव न उरली शक्ति निःसत्त्व झाले।
जिव्हा शुष्क, श्रुति बधिर, त्या दृष्टिला मांद्य आलें!॥ ५॥

ज्यांचें नाम श्रवणिं रिघतां सर्व पाश्चात्यखंड।
भ्यालें चित्तीं जरि न वदलें धैर्य झालें दुखंड॥
तें हें आलें अवचित इथे कोठुनी पीतविघ्न।
ज्यातें लोकीं सकळ वदती पीतवर्णाख्य चीन॥ ६॥

किंवा आतां अचल धृतिचे मानुं मी चोर यांशीं ।
नेती शीर्षीं लुटुनि अमुचे सर्वही स्वर्णराशी ॥
कांहीं केल्या उमज न पडे चित्त झालें विदीर्ण ।
भांबावोनी सपदि धरिलीं लोचनें मीं मिटून ॥ ७ ॥

झाले अंतर्मुख नयन जों लोलदोलायमान ।
अंतःसृष्टी मजसि दिसली पूर्ण कंपायमान ॥
होती तेथें विकट विवशी राक्षसी भीति ठेली ।
भ्याली दृष्टी परत फिरली बाह्य सृष्टींत आली ॥ ८ ॥

तेव्हां मातें नवल दिसलें लोपुनी पीत कांती ।
रक्तें वर्णें अवचित नटे रम्य वृक्षाग्रपंक्ती ॥
धालों चित्तीं हृदयिं निवलों भीति गेली अशेष ।
काव्यस्फूर्ती मुदित हृदयीं प्रज्वळे तैं विशेष ॥ ९ ॥

वृक्षाग्रींची अनुपम नवी रम्य उत्क्रांत कांती ।
पाहोनी ती तरुतति मला भासली विप्रपंक्ती ॥
पुण्यात्मे ते द्विजवर जणूं रक्तचीनांशुकांतें ।
नेसोनीयां स्तविति हरिखें आजि सर्वोत्तमातें ॥ १० ॥

पर्णांमाजी मृदु मधुर जो मर्मर ध्वान चाले ।
तो हा नोहे द्विजगण गमे सुस्वरें वेद बोले ॥
सायंसंध्या करुनि अथवा भास्करा अर्घ्यदान ।
द्याया शाखाकर नमवि हा होउनी ध्यानलीन ॥ ११ ॥

पारावारीं जरठ रविचें बिंब दोलायमान ।
घेई झोले जणुं हरपलें पाहतां सर्व भान ॥
ऊर्मीगोपींसह मज गमे बिंबगोपालमूर्ती ।
रासक्रीडा करुनि करि कीं पूर्वींची कामपूर्ती ॥ १२ ॥

किंवा 'कर्षी रवि निजकरें नित्य हा आपुल्याशीं' ।
येऊनी हें सहज मनिं या वीचिका क्रोधराशी ॥

'आला मेला अवचित भला सूर्य हा आज हातीं'।
धिग्वाणी ही वदुनि जणुं त्या त्यावरी धांवताती! ॥ १३ ॥

किंवा 'ज्यानें दयित अपुला कालिया मर्दियेला।
तो हा आजी अवचित करीं आपुल्या कृष्ण आला॥
आतां जातो बघुं तरि कसा टाकुं त्याला गिळोनी'।
वीचिव्याली तुटुनि पडती त्यावरी हें वदोनी! ॥ १४ ॥

तोयार्थी तो रवि लगबगा सिंधुतीरासि आला।
घ्याया पाणी स्वकर जुळुनी ओणवा जों न झाला॥
हा! हा! कैशी चरणतळिंची वालुका श्वेतवर्णा।
वाहोनी ती हळु हळु सरे, पाय त्याचा ठरेना! ॥ १५ ॥

जे जे तेव्हां उठुनि बसण्या भास्करें यत्न केले।
झाले ते ते विफल सगळे पाय खोलांत गेले॥
हा! हा! जें कां पद घसरलें एकदां आंत तें कीं-।
कांहीं केल्या वरि नच निघे न्याय हा रूढ लोकीं॥ १६ ॥

क्रीडागारीं अचपल मुलें खेळतां कंदुकाशीं।
लत्ताघातें वरि उडविती तेविं त्या भास्कराशीं॥
पादाघातें जलिं बुडविती ताडिती वीचिरामा।
घेती त्यातें पुनरपि शिरीं नेति त्या स्वीयधामा! ॥ १७ ॥

आदित्याचे करतनय तैं काय जे चारदोन।
होते क्रीडा करित गगनीं सर्वतः संचरून॥
जातां भानू अहह! दिसती दीनवाणे अनाथ।
शोकावेशें विकळ फिरती बावरोनी नभांत! ॥ १८ ॥

वेळीं या मी नवनव अशी सृष्टिशोभा बघोनी।
गेहीं जाया परत फिरलों सिंधुतीरावरोनी॥
येतां मार्गीं जड हळु पदीं बुद्धि गुंगे विचारीं।
कांहीं केल्या उपशम न हो चित्त येई न थारीं॥ १९ ॥

सूर्यास्ताचा अजि निरखिला भव्य जो मी प्रसंग ।
खेळे डोळ्यांपुढति अझुनी सारखा तो अभंग ॥
रव्यस्तातें विविध कविंनीं तेविंही चित्रकारीं ।
वर्णीयेलें परि नच असें पाहिलें आजवेरीं ! ॥ २० ॥

जातां जातां मजसिं दिसला मार्गिं त्या बाळ एक ।
ज्याच्या भोंतीं धिविधपरिचे लोक होते अनेक ॥
उत्कंठेनें मन भुलविलें तेथ लोटीत नेलें ।
त्याच्यामागें चरण ममही श्रांत धावूनि गेले ॥ २१ ॥

होता दुःखें रडत बहु तो बाळ कारुण्यमूर्ती ।
सांगायातें क्षम परि नसे 'आपुली काय आर्ती' ॥
'आई ! बाबा !' वदवदुनि हें सारखा काढि हेल ।
दृष्टी फेंकी मृगशिशुपरी भोंवताली विलोल ॥ २२ ॥

'कोणाचा तूं असिस वद गा ! येसि कोणीकडूनी ।
एकाएकीं तव जन तुला केविं गेले त्यजूनी ?' ॥
साक्षेपानें करिति जन ते प्रश्न ऐसे तयास ।
'आई ! हूं हूं' रुदनपर या बाल दे उत्तरास ॥ २३ ॥

'आई कोठें ?' 'घरिं' 'घर कुठे ?' 'त्या तिथे' 'नांव ?' 'साबा' ।
'आईचें बा ?' 'वहिनि' 'जनका कायसें नांव ?' 'बाबा' ॥
ऐशा या त्या सुकुतुकपरां रम्य बालोत्तरांहीं ।
लोटे हांसूं बहुपरि परी, बोध होई न कांहीं ! ॥ २४ ॥

मार्गीं जातां विविध जनता येउनी धाइधाई ।
बाळातें त्या बघुनि फिरुनी आपुल्या मार्गिं जाई ॥
कोणी निंदी जननिजनका कोणि त्या बाळकास ।
कोणी चेष्टा करिति नुसत्या, मांडिती कोणि हास ! ॥ २५ ॥

'स्वापत्यातें पथिं विसरतां राहिलें ज्या न भान ।
गैदी होता जनक गमतें पूर्ण वात्सल्यहीन ॥'

'छे ! छे ! ऐसें नच' कुणि वदे 'भार झाला पित्यास ।
पोसाया हा म्हणुनिच तयें टाकिलें यास खास!'॥ २६ ॥

'छे ! छे ! होई कधिं नच असें,' अन्य त्याला प्रपादी ।
'निर्द्रव्याही स्वतनय कधीं वाटतो का उपाधी ? ॥
'छे! छे! ऐसें कधिं तरि घडे भारतीं सत्त्वशालीं ? ।
जेथें पुत्रा गणिति अपुला दिव्य हो अंशुमाली !' ॥ २७ ॥

कोणी बोले 'मजसि गमतें बाल हा भूमिजन्य ।
जैसी होती जनकदुहिता भूमिजा ती सुधन्य !॥
'मैत्रेयाचा सुभग शिशु हा पूज्य पूर्णावतार ।
आला न्याया हरुनि अमुचें वित्त वा पुण्यभार !' ॥ २८ ॥

धर्मात्मे जे सुजन कुणि ते बोलती गद्गदोनी ।
'कां हो! ऐशी छलकमतिनें बोलतां दुष्ट वाणी ॥
दुःखी वेडी तनयविरहें माय झाली असेल ।
या मोहानें खचितचि तिचा जीव थारीं नसेल!' ॥ २९ ॥

लोकांचे जैं विविध निघती तर्क ऐसे विशाल ।
आला कोणी सहज फिरतां तेथ तैं ग्रामपाल ॥
गेला संगें करिं धरुनि तो दीन त्या अर्भकास ।
तन्मातेचा हुडकुनि कुठे शोध लावावयास ॥ ३० ॥

गेलों मीही हळुहळु पुढें कांहिं मातें सुचेना ।
वेडा झालों, मन तळमळे, चैन चित्तीं पडेना ॥
सूर्यास्ताचें भयकर तसें चित्र त्या बालकाचें ।
जाईनाच स्मृतिंतुनि दुरी चित्त कैसें न कांचें? ॥ ३१ ॥

जीवात्मा हा प्रियकर बहू बाल सर्वेश्वराचा ।
मायामोहें भुलुनि विषयां सोडुनी हात त्याचा ॥
जीर्णारण्यीं भटकत फिरे मार्ग त्या सांपडेना ।
गेला! गेला! स्वपथ चुकला बापुडा दीनवाणा! ॥ ३२ ॥

ईशाचा त्या सुखमय असा वांछुनी चित्तिं लाहो ।
दीर्घाक्रोशें 'सुख! सुख!' असा फोडितो नित्य टाहो ॥
धावाधावी करि तरि तया श्रेय लाभे न कांहीं ।
द्राक्षेच्छूची फणस मिळतां तृप्ति हो का कदाही? ॥ ३३ ॥

बालार्काचें सुखकर असें ऊन जेवीं पुढारा ।
माध्यान्हींची मधुर अथवा जेविं छाया झरारा ॥
चेतोहारी क्षितिज पुढती धाव कीं घेइ जैसें ।
हा! हा! धावे भरभर पुढें सौख्यही नित्य तैसें! ॥ ३४ ॥

नाना दुःखें विविधहि तशीं संकटें अंतराय ।
घाली मार्गी अनवरत तो सर्व देवाधिराय ॥
हेतू हा कीं भिउनि तरि त्या लाडक्या अर्भकांनीं ।
यावें मागें परत फिरुनी आपुल्या संनिधानीं ॥ ३५ ॥

जीवात्मा तें परि नुमजुनी नित्य सैराट धावे ।
बारा वाटा जल अडवितां जेविं वेगें निघावें ॥
किंवा जैसा पथ न बघतां मत्त घोडा बुजीर ।
हावो कांहीं, परत न वळे, धावतो तो निसूर ॥ ३६ ॥

व्यामोहानें सुरतरुच हा! अर्कवृक्षास मानी ।
प्रेमें त्याला बहु कवळतो नाश पावे निदानीं ॥
इक्ष्वागारीं सरसमधुरा बाष्पगंधा भुलोनी ।
जैसी पावे निधन अनलीं मक्षिका ती पडोनी ॥ ३७ ॥

'ध्यातां चित्तीं विषय मनुजीं होय तत्प्रेम गाढें ।
संगें त्यांच्या फिरफिरुनि तत्सेवनीं काम वाढे ॥
कामाच्या त्या प्रबल सहसा आड येतांचि कोणी ।
क्रोधोत्पत्ती सहज घडते शांति त्याची गळोनी ॥ ३८ ॥

क्रोधाची जी परिणति तिला सार्थ संमोह नाम ।
संमोहें त्या स्मृतिस सहजीं भ्रंशता ये प्रकाम ॥

होतां भ्रंश स्मृतिस सहसा बुद्धि जाते लयाला।
जातां बुद्धि त्वरित मनुजा नाश हा ठेविलेला!' ॥ ३९ ॥
जीवात्म्या या भ्रमवश अशा आत्ममार्गज्ञ कोणी।
दावा लावा सुपथिं सपदि प्रेमहस्तें धरोनी॥
हाका मारी सकरुण पिता ये ध्वनी मात्र कानीं।
जावें कोठें अवश फिरतो ना दिसे मार्ग रानीं! ॥ ४० ॥

---

## ३. असून भीक कां?

( शार्दूलविक्रीडित. )

आहे मूढ! तुझ्याच भव्य भवनीं पूर्वील ठेवा जुना।
कां तो नेत्र न पाहसी उघडुनी अद्यापि अंधा मना! ॥
दारोदार धनार्थ कां भटकसी स्वत्वास तूं सांडुनी।
घेसी कां करुनी विडंबन जगीं हें तोंड वेंगाडुनी? ॥ १ ॥
नाहीं लाज, तसें न आत्मभयही, स्वेच्छेपरी वर्तसी।
आले सांगत साधु थोर तिकडे दृष्टी न देशी कशी? ॥
बोधावें वरचेवरी तुज किती? कांहीं न वाटे कसें?।
बुद्धी सांगितली, शिधोरि दिधली, कामा न ती येतसे ॥ २ ॥
'द्या बाई मज जोगवा' वदलिया दंतावली काढुनी।
देतो काय कुणी कुणास जगतीं वेड्या! सुखें आणुनी! ॥
चित्ता! हें तव शुद्ध वेड सगळें, भ्रांती, खुळी कल्पना।
दे दे दे म्हणिं सोडुनी कुपथ तो, सन्मार्ग नोहे, मना! ॥ ३ ॥
त्यांतूनी अथवा दयापरजनें कोणीं तुला मानसा!।
प्रेमानें दिधला असें समजुं कीं, आणोनि हातापसा ॥
जन्मातें न पुरेल सत्य परि तो ध्यानीं सख्या! हें धरीं।
भिक्षेची वद हंडि काय चढते केव्हांहि शिंक्यावरी? ॥ ४ ॥
जन्माचा दिससी दरिद्रि पुरता मातें अगा मन्मना!।
याञ्चा धर्मचि जन्मजात तरि का? सोडीं तरी सज्जना! ॥

नाहीं औषध बोलती बुध जरी लोकीं स्वभावाप्रती ।
यत्नें होय असाध्य साध्यहि पुन्हा, हें तेचि कीं सांगती ॥ ५ ॥

आहे जें जवळी तुझ्या धन तुझें तें सांपडेना तुला ।
त्याची दादहि हाय! बा तुज नसे, हा योग नामी भला ॥
आहे तें नसल्यापरी जरि घडे, बोलूं तरी काय गा! ।
गेहीं कामदुघा असोनि फिरसी ताकास तूं दुर्भगा! ॥ ६ ॥

आतां मी कथितों तुला पुनरपी तें द्रव्य शोधावया ।
नामी मार्ग गुरूपदिष्ट, न लगे ग्रंथांत गुंगावया ॥
जाई या पथिं पाउलावरि गड्या! पाऊल ठेवोनियां ।
येतां विघ्नशतेंहि बा! भिउं नको, सोडूं नको निश्चया ॥ ७ ॥

आहे या तव देहरूप सदनीं अंतःस्थलीं हे मना! ।
आत्मासंज्ञक गूढ गुप्त धन तें ज्यातें कधीं अंत ना ॥
सांभाळीं परि बा अहंकृतिफणी तेथें बसे त्यावरी ।
जातां वित्तसमीप तो खवळुनी ये तूर्ण अंगावरी ॥ ८ ॥

शोभे भव्य दशांगरूप दश तत्कंठावरी निर्मल ।
फूत्कारें गरलान्वितें हृदयभू संपूर्ण मोहाकुल ॥
प्रज्ञारूप पयावरी भुजग तो बा! चालवी जीवना ।
प्राशोनी सुविचार वायु करितो निःसत्त्व धीतें मना! ॥ ९ ॥

वर्णूं काय? धनास त्या न उपमा, तें वर्णवेना मला ।
लाभे ज्यास तयास मात्र कळतें तन्मूल्य जें चंचला! ॥
राहे गुप्त सदैव तें न कधि ये कोणाहि दावावया ।
नाहीं देय तसें न हेय, न कुणा सामर्थ्य त्या गावया ॥ १० ॥

शस्त्रास्त्रें नसती समर्थ लवही हें वित्त नाशावया ।
नाहीं पावक शक्त साच कथितों त्यालागिं जाळावया ॥
नाहीं शक्ति, तशीच घोर पवना शोषावया त्याप्रती ।
पाणीही बुडवावया क्षम नसे ती संपदा या क्षितीं ॥ ११ ॥

यावें स्वीय करीं अमूल्य धन तें ऐसी जरी कामना ।
माया-वारुळ वाढलें हृदयिं जें फोडीं तरी तें मना ! ॥
कालीया वधिला जयें भुजबळें श्रीकृष्ण तो ध्याउनी ।
हातीं तीव्र विरक्तियष्टि धरुनी मारीं फणी तो क्षणीं ॥ १२ ॥
जें मी हें वदलों तुला मम मना! त्यांतील माझें असें ।
नाहीं अक्षर एकही परि गड्या ! श्रीकृष्णवाणी असे ॥
पार्थातें गतमोह कर्मपर बा! केलें जिनें संगरीं ।
केला मीं अनुवाद हा लव तिचा शंका न कांहीं धरीं ॥ १३ ॥
ऐसें वित्त अनर्घ्य हें तव असे, तूं मूर्त लक्ष्मीपती ।
कां चित्ता! तरिही बळें वद वृथा बा! होसि भिक्षापती? ॥
'आहे संनिध तें परी चुकसि तूं जागा' तुका सांगतो ।
यत्नें साध्य, करीं सुनिश्चय क्षणीं देई फळें गोड तो ॥ १४ ॥

---

## ४. जन्मदरिद्री !

(शार्दूलविक्रीडित.)

होतों मी बहु खिन्न भग्नहृदयें द्वारीं उभा निश्चल ।
लावोनी गगनीं उदास नयनें निःस्तब्ध चिंताकुल ॥
दुःखाचा मग दीर्घ एक सहसा निःश्वास सोडूनियां ।
या जीर्णी भवकाननीं भटकलों कोठें तरी जावया ॥ १ ॥
नाहीं हेतु मनीं नसे मन मनीं नेत्रत्व ना लोचनीं ।
नाहीं स्थान तसें नियोजित परी गेलों पदामागुनी ॥
भ्यालों भव्य भयाण भेसुर वना पाहूनि चित्तांतरीं ।
गेलों मी परि थांबतां न पुढती तैसा तदभ्यंतरीं ॥ २ ॥
होता तापत त्या अनंत गगनीं चंडांशु तेजस्पती ।
झाल्या तप्त किती तई दश दिशा दुःसह्य जीवाप्रती ॥
वर्षे वन्हिच अंतराळ वरुनी तेवीं धरा खालुनी ।
संतप्ता विरहाकुला युवतिशी पेटे जणूं आंतुनी ॥ ३ ॥

वाहे वायु अतीवहां भणभणा अत्युष्ण कीं नाग हा।
कोपानें जणुं वाटलें खवळुनी फूत्कार सोडी महा ॥
कोठेंही लव आर्द्रता न दिसली मागें पुढें भोंवतां ।
व्यापोनी अवघें चराचर उरे ती भीष्म हा! उष्णता ॥ ४ ॥
वर्षे एक जरी न बिंदु घन तो माझ्याच देहांतुनी ।
वाहे घाम परंतु, फार थकलों तृष्णा मला लागुनी ॥
आले तों घन घोर थोर जमुनी एका क्षणीं सत्वर ।
केलें मेदुर तूर्ण नील गगना घालोनि आडंबर ॥ ५ ॥
मेघाक्रांत नभा विलोकुनि करी केका शिखी नाचुनी ।
हर्षें चातकपक्षिही नभ भरी तोयार्थ आक्रंदुनी ॥
प्रेमें नाचति कांतपार्श्वि अपुल्या मत्ता मयूरी मुदा ।
वेड्यांचा भरला जणूं अहह ! तो बाजार वाटे मुधा ॥ ६ ॥
वर्णें नीरद नील नीलमणिसे अत्यंतही सोज्वल ।
हा ! हा ! पोकळ शारदीय परि ते देती कुठोनी जल ॥
जे जे वारिद भेटतील गगनीं त्यां त्यांपुढें चातका ।
कारुण्यास्पद बोल रे! न वद तूं नाचूं नको बर्हिका[1] ॥ ७ ॥
हे ओळया दुबळया पिशा मम मना ! तूंही असा पाहुनी ।
मेघां या भुलुनी मनोमय सुखीं गेलास हा! रंगुनी ॥
लाधे आज परी गड्या ! फल तुला कैसें भलें सुंदर ।
वर्णें कौंडळ रम्य मोहक जरी त्याचें कडू अंतर ॥ ८ ॥
ऐशा या नितरां[2] निरुक्त नटव्या नेदें[3] नव्या नीरदें ।
दुष्टें बिंदुहि टाकिला न भुवनीं, गर्जे परी उन्मदें ॥
देवोनी वारि साह्य चंड तपना तो वाढवी उष्णता ।
होती सर्व जगीं सहाय धनिका दीनासि ना तत्वतां ॥ ९ ॥
गेलों पाहत मी पुढें हळुहळू विस्तीर्ण त्या काननीं ।
नाना रम्य लता बहू कुसुमिता उत्फुल्ल आमोदिनी[4] ॥

---

१. मोरा. २. अत्यत. ३. गर्जणाऱ्या. ४. सुगंधित.

व्योमस्पर्शि तसे विशाल तरु ते पाहोनि वाटे मना ।
ईर्ष्येनें चढती नभीं मदभरें दंडावया तापना[1] ! ॥ १० ॥
आनंदें फिरतां तरूतळवटीं तैं जीं फळें सुंदर ।
दैवानें दिसलीं मला गवसलीं तीं घेतलीं सत्वर ।
आशेनें अशनार्थ मीं लगबगां सानंद जों फोडिलीं ।
कांहीं आम्ल नितांत वा कटु बहू तीं चाखतां लागलीं ॥ ११ ॥
झालों क्रुद्ध तसा विषण्ण हृदयीं, टाकोनियां तीं फळें ।
'चांडाळा! अदया ! शठा! खलवरा! ' दैवा असें निंदिलें ॥
' जें जें पीत दिसे नसे कनक रे ! तें तें मना ! तत्वतां ' ।
धिक्कारूनि तया असें वदुनियां झालों पुढें चालता ॥ १२ ॥
तों भेटे मजला जलाशय महा मध्येंच मार्गांतरीं ।
झालों हर्षित ताप ते विसरलों संतोषलों अंतरीं ॥
जातां धांवत लोचनींच उदका प्राशावया लागलों ।
गेली पार निवे तहान सहसा आत्मींच कीं रंगलों ॥ १३ ॥
प्याया अंजलि मीं भरोनि उदकें जों आननीं लाविला ।
थू थू थू करुनी जलांजलि जलीं सोद्वेग तो सोडिला ।
झालें खारट तोंड देहभरही कांटा उभा राहिला ।
होतें तापद सर्वही जग तया जो प्राक्तनें वंचिला ॥ १४ ॥
आतां काय करूं कळे न मजला बुद्धीहि झाली खुळी।
होतें जात पुढें पुढें पद परी कोठें न ठावें मुळीं ॥
जातां दूर असा बराच जलधी मार्गांत मातें दिसे।
झालें चित्त नवें हुरूप चढुनी; आशेस मृत्यू नसे!॥ १५॥
होते लोक अनेक कार्यपर त्या क्षीरोदतीरावरीं ।
कोणी शोधित रत्न कोणि कनका मुक्ता कुणी भीतरीं॥
गेलों मीहि जलीं समुत्कट पुन्हा भाग्या परीक्षावया ।
त्यातें सिंधुसमाधि वा झडकरीं अक्षय्यिंची द्यावया ॥ १६ ॥

---

१. सूर्यास.

कोणा हेम मिळे कुणा रजतही कोणास मुक्ताफळें।
खोटीं मोतिं कुणा, परी मज मिळे सर्वांहुनी आगळें ॥
हा धिग्धिग्भग! शंखशुक्तिकवडे मातें दिले सागरें ।
मोदें सागरदत्त शंख फिरतों फुंकीत मी आदरें ॥ १७ ॥
राहो हें; मम चारु चित्त! परि तूं होऊं नको खिन्न गा!।
जा जा बाळ! असाच जाइं पुढतीं ओलांडिं या दुर्नगा॥
नाहीं आज तसें उद्यांहि न जरी कालावधीनें तरी।
आहे वांच्छित जें मिळेल तुजला शंका न कांहीं धरीं ॥ १८ ॥
अद्यापि प्रभुच्या कसा नुतरसी, अल्पज्ञ तूं वाटतें।
आहे फार तुला तुझा भरंवसा, सोडीं परी वेड तें ॥
भक्त्या ईशपदारविंद नमुनी घेईं उडी सागरीं।
शंखाचे मणि त्याच होतिल, खरी ही मान तूं वैखरी ॥ १९ ॥

---

## ५. मनधरणी.

(दिड्या.)

दिवस उगवे किति शुभद आजि नामी। लीन व्हायास्तव म्हणुनि ईशनामीं ॥
जों न लागे मी समुद गावयातें। तार लागेना काय करूं त्यातें! ॥ १ ॥
मनोमर्कट सैराट धांव घेई। सर्वें ओढी मज दूर जवें नेई ॥
परतवाया सदुपाय किती केले। परी सारे ते फुकट फुकट गेले ॥ २ ॥
'बाळ! बेटा!' बोलोनि सामदाम। विविध युक्त्याही योजुनी प्रकाम ॥
बहुत आर्जविलें मानि मनोराया। कांहिं केल्या येई न एक ठाया! ॥ ३ ॥
हटें तेव्हां एकांत सेवियेला। दार लावुनि अंधार फार केला ॥
तरी माझ्या करिं तुरी देउनी तें-। पळे; मुरडोनी दावि वाकुल्यांतें ॥ ४ ॥
खिन्न झालों निरुपाय जाहलों मी। उठे कंटक सर्वांगिं लोमलोमीं ॥
तार झाली बेसूर गळे वीणा। निरुत्साहें बैसलों दीनवाणा ॥ ५ ॥
गर्व होता कीं प्रभुस्तुतिस्तोत्र। नसे गाया मजवीण कोणि पात्र ॥
परी भ्रांतीचा फुटुनि भोपळा तो। दुःखिं होउनि मी चूर जिवा खातों ॥ ६ ॥

गमे जीवित मज शून्य दिशा दाही । नसे शांतीचा ठावठिकाणाही ॥
शून्यहृदयें मी शून्यनभोभागीं । शून्य दृष्टीनें लक्षि जों अभागी ॥ ७ ॥
तोंचि लागति कर ताल धरायातें । सरे चरणांघ्री सांथ द्यावयातें ॥
करांगुलिका अंगुष्ठ मध्यमा या । उभय चिटक्या लागती वाजवाया ॥ ८ ॥
कंठ लागे आलाप घ्यावयाला । 'आ'स धाडाया 'ई'स भेटण्याला ॥
जों न अंतर्मुख लोल नयन झाले । श्रुतिद्वारातें करें बंद केलें ॥ ९ ॥
सर्वे गेलेलें चित्त दूर जागीं । येइ धांवत धडपडत लागवेगीं ॥
वदे चिडुनी 'कां छळिसि असा मातें । दास तव का मी धारिं धरायातें ॥१०॥
स्वेच्छ पांखरुं मी स्वैर विहरणारें । अन्यतंत्रें केव्हां न चालणारें ॥
जशी इच्छा संचार तसा माझा । मीच माझा निःशंक आधिराजा! ॥ ११॥
जेथ गरुडाची दृष्टि जात नाहीं । रेणुरेणुहि नच जेथ शिरत पाहीं ॥
सूक्ष्म सूक्ष्मीं मी गुरुहि गुरूमाजीं । वायुपरिसहि गति चपल किती माझी ॥१२
सदय जितुकें तितुकेंच असें क्रूर। भ्याड जितुकें तितुकेंचि शूरवीर ॥
विमति जितुकें तितुकेंच सुमति आहें । कशी अद्भुत मम शक्ति असे पाहें ॥१३॥
सुवश मजला सर्वथा करायातें । साधुसंतहि ते नमन करिति मातें ॥
तरी नाहीं मी सहजसुलभ त्यांना । कथा तव ते मग काय दीनदोना! ॥१४॥
ईशभक्तीचें तेंच तेंच काव्य । काय गावें रे मज न गमे श्राव्य ॥
देवभूतें तुज खास झपाटोनी । पूर्ण अविवेकी ठेविलें करोनी ॥ १५ ॥
सदा दुर्मुख, कसला न तुला छंद। खऱ्या सौख्याचा लव न तुला गंध ॥
आजि येथें जाशिल उद्यां तेथें । काय तुज हें लाधेल भोगण्यातें? ॥ १६ ॥
पुरे आतां हें खुळें तुझें वेड । तुझ्या देवा त्या दूर जरा सोड ॥
कसा येइ न तुज वीट यामयाम । गात बसतां रसहीन रामनाम? ॥ १७ ॥
ज्ञानवृद्धांना कान जरा देई । स्वार्थ साधोनी अल्प तरी घेई' ॥
तदा वदलों त्या दुष्ट मन्मनासी । 'आव गुरुजीचा छान आणितोसी!॥१८॥
तुझ्या नीचा! या अशा प्रलापांचें । नवल वाटे मज एकपरी साचें ॥
कसा तुजला प्रत्यहीं भोजनाचा-। वीट येइ न वा नित्य नटायाचा? ॥१९॥

कसे बाळांचे तेच तेच शब्द । तुला रुचती; होसी न कसा क्षुब्ध? ॥
ताच पुष्पें ती तीच वृक्षराजी–। केविं रुचती तुज सांग तरी आजी! ॥२०॥
तोच इंदू ती तीच चंद्रिकाही । तोच निर्झर ही तीच कोकिलाही ॥
तींच वसनें, ते तेच अलंकार । कसे तुजला वाटती सुधासार? ॥ २१ ॥
तीच तरुणींची तनु, प्रणय तोच। तोच वासंतिक समय, आम्र तोच ॥
तींच कमलें, ती तीच मधुपराजी । वीट गातां येई न केविं आजी ?॥२२॥
तुला याची खंती न येइ कैशी? लाळ घोटोनी रसास्वाद घेशी॥
उष्टिं पात्रें तीं तींच सेवितांना । कशा मिटक्या मारिसी सुखनिधाना! २३
जया ज्ञान्यांची बोधसुधा मातें । सजसि सरसावुनि समुद पाजण्यातें ॥
इतर त्यांचे तूं शब्द किती सांग । आजवेरीं पाळिले यथासांग? ॥ २४ ॥
किती वेळ, रततेंसि पापकर्मीं? किती वेळा विंधिसी लोक मर्मीं?॥
अन्यवस्तूंचें हरण करायासी । किती वेळा वद रोज इच्छितोसी? ॥ २५ ॥
नित्य चेष्टा त्या त्याच करायाची । स्थलीं वर्जित त्या त्याच जावयाची ॥
गड्या! इच्छा करितां न तुला लाज। भला गमसी तूं एक सौख्यभाज !॥
भलें दिसतें हें गोड तुझें शास्त्र । रुचे घ्यावा तितुकाच भाग मात्र॥
नको अपणां प्रक्षिप्त म्हणोनी तें–। दूर लोटावें; योग्य! योग्य! तूंतें॥२७॥
तुझी आवड जे तेंच तुझें शास्त्र। इतर कांहीं प्रेमा न तुझ्या पात्र ॥
न्याय नामी, तव अजब तर्कशास्त्र। पठण पाठण चालवीं अहोरात्र! ॥२८॥
'नेत्र मिटतां मी लोक अंध होती'। समज ऐसा हा धरुनि आत्मचित्तीं॥
नेत्र मिटुनी मार्जार पयः प्राशी। मार बसतां ये भिन्न अनुभवाशीं! ॥२९॥
सर्व इंद्रियवृंदांत मनोराजा! । अग्रपूजेचा मान असे तूझा ॥
तुझें सामर्थ्यहि फार तसें मोठें । मान्य मजला, तें मी न म्हणें खोटें॥३०॥
स्वामि नच मी तव, तूं न दास माझा । तूंचि सर्वस्वीं होइं महाराजा ॥
परी माझी तुज एक याचना ही । नको अवमानूं फार भार नाहीं ॥ ३१ ॥
अहोरात्रींच्या साठ घटींतून । दोन घटिकांचें देइं मला दान ॥
तया वेळीं सांगेन तुला जैसें! । तुवां वर्तावें नित्य मना! तैसें ॥ ३२ ॥

अहोरात्रींच्या इतर घडीमाजीं । स्वैर विहरें तूं नाहिं ‘ नाहिं ’ माझी’ ॥
जों न वदलों हें चित्त लीन झालें । प्रेमभरतें अनिवार तया आलें ॥ ३३ ॥
‘सर्व मधुरीं मधुमधुर ईशनाम । सर्वमंगलिं तें मंगल प्रकाम ॥
कधिं न येवो तुज वीट तया गातां । चारु चेता! मागणें हेंचि आतां ’ ॥३४॥
तोंचि गळती घळघळां नेत्रबिंदु । वरी येई उसळोनि हृदयसिंधु ॥
लवे रसना अधरोष्ठ कंप पावे । ऊर्मिवेगें भारती तशी धांवे ॥ ३५ ॥
मुदें झालें मन मधुरगानिं दंग । भरे गानीं अनिवार तदा रंग ॥
तोंचि गाणें हें आजि कृपासिंधो! । तुला अर्पी मी हीनदीनबंधो! ॥ ३६ ॥

---

## ६. जलकुंभ भरत असतांना पाहून—

( शार्दूलविक्रीडित. )

आरंभीं जल जों पडे हळुहळू त्या रिक्त कुंभामधें ।
आक्रंदे करुणस्वनें कटुरवें कर्णांस संत्रास दे ॥
जों जों कुंभ भरे जलें वरिवरी गांभीर्य येई रवीं ।
होतां पूर्ण जरी न शब्द निघतो शांत ध्वनी मोहवी ॥ १ ॥
लक्ष्मीची न कृपा जयावरि घडे कोणी असा निर्धन ।
लज्जा, मान, दयाभयादि गिळुनी संतप्त रात्रंदिन ॥
धांवाधांव करी पडे धडपडे पाही न मागें पुढें ।
दुःखें कर्णकटु ध्वनी करि, घरीं दारीं तसा ओरडे ॥ २ ॥
प्रेमस्निग्धकटाक्ष त्याजवरि जों लागे कराया रमा ।
किंचिच्छांति धनागमें मिळुनियां होई स्थिती मध्यमा ॥
होई धुंद हृदंबर प्रबल ये दंभांधता लोचनीं- ।
येई, दुंदुभिसा तसा दुमदुमे गंभीर मंदध्वनी ॥ ३ ॥
त्याचें सुंदर मंदिर स्वपद जैं मानोनि अभ्यंतरीं ।
स्वच्छंदें रमते मुदें विहरते ती इंदिरा सुंदरी ॥
नांदे शांति नितांत शांत सदनीं स्वांतींहि संतुष्टता ।
पूर्णानंदिं रमे रमाधव असा जाऊनि ती दंभता ॥ ४ ॥

दंतिध्वंसक सिंहसा बहुपरी गर्जूनि जो उन्मद ।
वर्षे अंबुद बिंदु जे टपटपा तन्नाद संत्रासद ॥
वेगें वाहुनि तेविं जी कुसरिता अल्पोदका गर्जते ।
गुर्वी सत्सरिता उदारहृदया निःशब्द कीं वाहते ॥ ५ ॥
वाजे कीं नवनीतही मृदुरवें अग्नीवरी ठेवितां ।
लागे जों वितळावया कडकडे अत्यंत तें तत्वतां ॥
वाढे तो ध्वनि सारखा न मळ जों त्यांतील सारा जळे ।
होतां स्वादु सुरम्य आज्य पारि तें संपूर्ण तो मावळे ॥ ६ ॥
होई कर्म करीं न सांग कधिंही, भक्ती न ठावी खरी ।
नाहीं ज्ञान तसें तरी बडबडे हा ! हा ! मदांधापरी ॥
दंभाहंकृति पापधी निवटुनी पापांतका काम-दा ।
देशी ज्ञान विभो ! दया करुनिया निःशब्द मातें कदा ? ॥ ७ ॥

---

## ७. सरित्सिंधु

अथवा

### प्रेम कीं कर्तव्य?

**पद** (**चालः**–दो दिवसांची तनु ही साची.)

भरतीमुळे समुद्राचे पाणी नदीच्या मुखांत शिरून तिच्या पाण्यास मागें रेटीत असतां नदी त्यास म्हणते:––

शरण शरण ही चरणकिंकरी, घेई पदरीं, दया करीं ॥
उदारचरिता जीवितनाथा अशी न हुजला झिडकारीं ॥ ध्रु० ॥
पदीं लोटिसी, करीं ताडिसी, असें न झालें पूर्वी कधीं ॥
सदयहृदय कीं अदय करोनी गणिसी कां मज अपराधी ॥ १ ॥
विलंब झाला बहु यायाला म्हणुनि काय कीं सांग मला ॥
राग भयंकर असा अनावर आला माझा हा तुजला ॥ २ ॥
क्षमा मागत्यें, पदर पसरत्यें, पायीं कोळण मी घेत्यें ॥
चरण झाडित्यें मृदुल कुंतलीं अश्रुजलानें भिजवीत्यें ॥ ३ ॥

जननीजनका तन्मृदुलांका त्यजुनी, बंकां लंघुनिया ॥
सूं सूं गर्जत उसळत धांवत सोत्सुक आल्यें भेटाया ॥ ४ ॥
अनुपमसुंदर बहु गिरिगव्हर तैसे दुस्तर उंच कडे ॥
फोडुनि अंगें बहु आवेगें आल्यें वेगें मी इकडे ॥ ५ ॥
विविधोपायां केलें सखया! वांच्छित ठाया या याया ॥
समयासमया प्रिया! न बघतां गणिलें नच मीं मम काया ॥ ६ ॥
तव पददर्शन तव मधुमीलन जन्मापासुन हेतु असा ॥
धरुनी आल्यें शरण रिघाल्यें पारि हें मिळलें फळ सहसा ॥ ७ ॥
जनका मुकल्यें, तुज अंतरल्यें, सार्थक झालें जन्माचें! ॥
हेंही गेलें तेंही गेलें खेळ काय हे दैवाचे! ॥ ८ ॥
पुन्हा विनविल्यें, हात जोडिल्यें अभागिनीतें घे पदरीं ॥
कशी न कांता! उपजे स्वांता दया अनंता! अजुनि तरी ॥ ९ ॥

२

अंतःकरणीं तुझी कोरिली मूर्ति पूजिली आजवरी ॥
निघेल तेथुनि न कळे केवीं कितीहि झाले कष्ट जरी ॥ १ ॥
माझें तनुधनमनःसमर्पण म्यां तुजलागुन हें केलें ॥
माझें मजला म्हणावयाला कांहिं दयाळा! नच उरलें ॥ २ ॥
विचारवाचा मम नच उरलीं तुझीं जाहलीं हीं जलधे! ॥
इच्छा नसुनी तुझ्या अनुदिनीं नामगायनीं रमें मुदें ॥ ३ ॥
श्रुतिरंध्रांतें कितिहि झांकिल्यें तारि न चालतें कांहींही ॥
'सिंधु सिंधु' हा घुमे ध्वनि महा ऐकुनि पाहा, ना नाहीं ॥ ४ ॥
नेत्रांची गति तशीच पुरती तुलाच बघती जारि न मनीं ॥
कर सरसरती पद अनुसरती धन्य मानिती तव नमनीं ॥ ५ ॥
मधुतर शीतल तुझाचि परिमल अभिनव निर्मल ये मातें ॥
जारि 'ना' म्हणल्यें मन न विरमतें काय करूं या भोगातें! ॥ ६ ॥
मुग्धमूढ मी वेडिवांकडी भोळिभाबडी तशि अबला ॥
ठावि न यास्तव वरपांगींची प्रियानुरंजनरीति मला ॥ ७ ॥

लाडिक लाघवि गुलगुल भाषण तसेंचि वरिवारि बहु हसणें ॥
पुढें पुढें वा विलज्ज होउनि चावट चाळे करुं नेणें ॥ ८ ॥
सर्व सुखाचें सर्वस्वाचें निधान साचें तूं असमी ॥
अंतर्बाह्यीं सर्वपरीही व्यापुनि मज तूं उरलासी ॥ ९ ॥
सोडुनि आतां तुजला नाथा! येइ न जातां मला तरी ॥
तार मार कीं कर कांहींही दिली मान मीं तुझ्या करीं ॥ १० ॥

३

विलंब झाला न मीं लपविला मान्यहि केला अपराध ॥
यास्तव मजला काय दंड हा जणूं मृगी मी तूं व्याध ॥ १ ॥
अनुतापापरि खरीच दुसरी शिक्षा असुरी नसे गडे! ॥
झाली मज ती अगदीं पुरती पहा तरी किति तनू झडे ॥ २ ॥
तुज रत्नाकर म्हणती जरि नर, पाषाणाकर मज गमसी ॥
दयारसाचा लेश न असतां कसा रसाशय जनिं ठरसी? ॥ ३ ॥
धन्या मान्या नच सामान्या जरि गिरिकन्या मी असल्यें ॥
किति तरि मृदुतर माझें अंतर दयारसानें थबथबलें ॥ ४ ॥
चतुरसागरा! बुद्धिगभीरा! करुनि विचारा पुन्हा पहा ॥
सांगे मन्मन हें मजलागुन कीं तव दारुण दोष न हा ॥ ५ ॥
ही तव तनु जरि तरी तिच्यावरि सत्ता सारी तुझी नसे ॥
बंधुजनांची तवदेशाची सर्व जगाची परी असे ॥ ६ ॥
ऋण देशाचें, ऋण लोकांचें, ऋण जगताचें शिरावरी ॥
असे जोंवरी तूं न तोंवरी स्वैरविहारी खरोखरी ॥ ७ ॥
अपुल्यापुरतें बघतां नुसतें तुझें न सरतें कर्तव्य ॥
हा स्वार्थाचा पथ नरकाचा तुला न साचा परिसेव्य ॥ ८ ॥
स्वार्थी आधीं परार्थ साधीं जनीं जनार्दन आराधीं ॥
विनोद नच हा, विरोध नच हा, त्यांतचि सिद्धी संसिद्धी ॥ ९ ॥
उपदेशाचा कर्तव्याचा पाठ मनाचा सुखकारी ॥
सारासारें पूर्ण विचारें अनुसरल्यें मी परोपरी ॥ १० ॥

४

बालपणींच्या विमुग्धतेच्या बहु मौजेच्या काळांत ॥
कर्तव्याचे खेळ खेळल्यें, स्वैर विहरल्यें मोदांत ॥ १ ॥
कड्यावरोनी धडाधडा मीं उडया मारिल्या आनंदें ॥
धांवधांवल्यें बहु बागडल्यें स्मरतां हरिखें मन कोंदे ॥ २ ॥
पडल्यें झडल्यें कितिदा रडल्यें किति आरडल्यें मोठ्यानें ॥
वळणीं वळणीं धांवत सुटल्यें पिशापरी मी हौसेनें ॥ ३ ॥
वनावनांतुनि तरुतरुंमधुनी लतांखालुनी बहु पळतां ॥
निर्झरिणी किति धांवत येती मजला मिळती मज बघतां ॥ ४ ॥
गिरगिर माता लपंडावही तैशा फुगड्या खेळत मी ॥
बाल्य लोटिलें पारि कर्तव्यीं पडूं न दिधलें कधीं कमी ॥ ५ ॥
जों जों होते स्मृति मज तों तों भरतें येतें हृदयातें ॥
गहिंवर दाटे शब्दहि न फुटे वदना वाटे वदतां तें ॥ ६ ॥
सहकारानें सादर सुमनें सुंदर सुमनें समर्पिलीं ॥
साच सांगत्यें समुद्र सर्व तीं तुज सुखवाया सेवियलीं ॥ ७ ॥
वाट पाहतां माझ्याकरितां नीज अवचितां तुज लागे ॥
जागा तुज मीं करावयाला लटक्या रागें अनुरागें ॥ ८ ॥
सरःप्रांगणीं बालमैत्रिणी मृणालिनींसह मोदभरीं ॥
खेळत असतां त्यांहिं उधळिला पराग मजवरि मृदुल करीं ॥ ९ ॥
परागमिश्रित रागसुरंजित जल तें सिंचित तुझ्यावरी ॥
उभी राहिल्यें प्रेमीं झुलल्यें वाया गेलें अंतिं परी ॥ १० ॥

५

तीरनिवासी तरुजटिलांसी तपोजनांसी जलपान ॥
सुखें करविलें मनीं रिझविलें प्रयास पडले कोणा न ॥ १ ॥
निदाघदग्धा[1] लतिका मुग्धा केल्या स्निग्धा[2] जलदानीं ॥
शुष्क आतपीं[3] झाल्या वापी[4] भरल्या आपीं उद्यानीं[5] ॥ २ ॥

१. उन्हाळ्यानें जळलेल्या. २. ओल्या. ३. उन्हांत. ४. विहिरी. ५. बागेंत.

अनावृष्टिनें जळलीं रानें त्यांतहि धान्यें उपजविलीं ॥
मृत्युद्वारीं गरिब बिचारी प्रजा बैसली जीवविली ॥ ३ ॥
नौकांमधुनी धान्यें भरुनी मला तुडवुनी न्यायाला ॥
मार्ग सुरक्षित दिधला निश्चित काय न अभिमत गमे तुला ॥४॥
संध्यावंदन पूर्वजतर्पण ईश्वराचिंतन करावया ॥
झाल्यें कारण योग्यांलागुन समाधि सुंदर लावाया ॥ ५ ॥
सृष्टिसतीचीं कुटिल बालकें वधिती माझीं जरि बाळें ॥
तरि मी त्यांतें न्हावुं घालिल्यें निर्मल करिल्यें लडिवाळें ॥ ६ ॥
प्रेमलवृत्ती युवयुवती किति जलीं विहरती स्वच्छंदें ॥
जरि मी दुःखी तरी तयांना सतत रमविल्यें आनंदें ॥ ७ ॥
कंटाळोनी विषम जगाला जो जन आला मजपाशीं ॥
स्नेहलवृत्त्या चुंबुनिया त्या घेल्यें जात्या हृदयाशीं ॥ ८ ॥
कधिं कधिं काढुनि मंजुल मी ध्वनि मनीं रिझवुनी बहु त्यांतें ॥
शांतपणानें सत्त्ववृत्तिनें सुख सेवाया पाठविल्यें ॥ ९ ॥
वच हें परिसुनि सिंधु द्रवुनी प्रेमविकंपित कर पसरी ॥
त्या चतुरस्रा सरित्सुंदरी आलिंगोनी हृदयिं धरी ॥ १० ॥

६

अशीच माझी जीवितसरिता[1] येइ अच्युता![2] तुझ्याकडे ॥
प्रेमानंदें गिरवित गिरवित कर्तव्याचे अचुक धडे ॥ १ ॥
तुजला ठावें न मी स्वभावें विलंब लावीं यायातें ॥
निजगृहिं याया कधीं कुणी का विलंब लावी? वद माते ॥ २ ॥
गृहधनदारा जरी पसारा त्यांत मला कां गुंतविलें? ॥
आज्ञेवांचुनि तुझ्या जरी या तृणहि न सृष्टींतील हले ॥ ३ ॥
हाय मोकलूं सकलां या का सूत्रधारका! सांग मला ॥
हिंडूं देऊं भिक्षा मागत मम नामें कीं त्या सकलां ॥ ४ ॥

---

१. जीवितरूप नदी. २. देवा; श्लेषार्थी न चळतां.

कार्यकारणें ठावें मज तूं विश्व नियंत्रित हें केलें ॥
हेतुविना का जगच्चालका! जन्मा मजला घातियलें? ॥ ५ ॥
जो तो अपुला जगीं एकला जग या बोला बोलतसे ॥
मला न कळलें वर्म तयाचें बीज न त्यांतिल मज गवसे ॥ ६ ॥
भूमी घडली उदक कशाला उदक निर्मिलें तेज कशा ॥
तेजासंगें वायु कशाला गगन कशाला जगदीशा! ॥ ७ ॥
वृक्ष निर्मिले लता कशाला लता प्रसवि का पुष्पाला ॥
घडलीं पुष्पें हीं निष्पापें फळें पुढें हीं काशाला? ॥ ८ ॥
दिवस पातला सूर्य उगवला फुले पद्मिनी[1] कासारीं[2] ॥
निशा[3] पातली इंदु न उगवे झुरे कुमुदुनी[4] जलांतरीं ॥ ९ ॥
अन्योन्याश्रित जग हें निश्चित अनुजीवाच्या खरोखरी ॥
कर्तव्याचा सहकार्याचा गुरुभर आहे शिरावरी ॥ १० ॥

७

संसृतिसुंदर कर्तव्याचा अनध्याय बा! करावया ॥
तुझी अनुज्ञा कालत्रयिंही नसेल गमतें प्रभुराया! ॥ १ ॥
भारतांत जनु त्यांतहि नरतनु कामधेनु कीं जणुं दुसरी ॥
दुर्लभ असली मजला दिधली अनुग्रहचि हा खरोखरी ॥ २ ॥
किति जरि सुंदर ती बाह्यांतर नयनमनोहर परी असे ॥
काचविनिर्मित ती हें मन्मत बुधाहि अभिमत विसरूं कसें? ॥ ३ ॥
कधीं कळेचि न गळेल पटकन फुटेल झटकन ही कांच ॥
विघ्नविरोधक हवी द्यावया कर्तव्याची तिज आंच ॥ ४ ॥
कर्तव्याचा त्याग कराया प्रेम न सांगे कोणाला ॥
कर्तव्यहि तें कधीं न वदतें घाला प्रेमावरि घाला ॥ ५ ॥
कर्तव्याविण सत्प्रेमाचा प्रेमावांचुनि वा त्याचा ॥
कधीं न संभव पहा संभवे कसा मेळ हा मौजेचा ॥ ६ ॥

---

१. सूर्यकमलिनी. २. सरोवरांत. ३. रात्र. ४. चंद्रकमलिनी.

अमर्याद जें प्रेम कर्म तें कर्मप्रेमीं भेद नसे ॥
रवि-रविकांती चंद्र-चंद्रिका यांत भिन्नता काय दिसे? ॥ ७ ॥
कर्तव्यास्तव कीं प्रेमास्तव बंधुजनाचें सुहृदाचें-॥
कीं जनकाचें नागरिकाचें जगताच्या लघु घटकाचें ॥ ८ ॥
करवीं कांहीं माझ्याकरवीं प्रेमें तुजला हें विनवीं ॥
अनाद्यनंता प्रभो दयाळा! इच्छा इतुकी पुरवावी ॥ ९ ॥
तूंच नियंता तूंच नियोगी तूंच नियोगहि विभो जरी ॥
प्रेम प्रेमी प्रेम्य तसा तूं कुठे भिन्नता वसे तरी? ॥ १० ॥

---

## ८. तूं येऊं नकोस!

पद (चाल–दो दिवसांची तनु .. .. )

भूक लागली वृत्ति परतली संस्मृति झाली मातेची ।
बालक रडला पूर लोटला अतिवृष्टिच कीं वळवाची ॥
मातेमागें लावुनि दृष्टी कोंबुनि मुष्टी वदनांत ।
रडरडुनी बहु गर्गट केलें अंबर भरलें निमिषांत ॥
सरसर धावे माता कावे आविर्भावें रागाच्या ।
मागें वळुनी वदली जननी, हाता धरुनी बाळाच्या ॥
'मधें मधें कां? लुडबुड इतुकी करिसी, मेल्या! गप्प रहा ।
मागें मागें येउनि सोंगे न धरीं, मारिन खूप पहा ॥
कामांतुनि मी जरा रिकामी होतां घेइन तुज साची ।
छळीं न केतूसम मजला तूं' परि न बाळ तो ऐकेची ॥
काम गळालें हातामधलें, चित्त द्रवलें मातेचें ।
धांवत जाई, प्रेमें घेई मुके मटामट बाळाचे ॥
दाटुनि आला पान्हा फुटला पदराखालीं ती त्यातें ।
पाजायातें अंकीं घेते, दाद न पारे दे तो तीतें ॥
खेळीं रमला चित्तीं रिझला रुचे न त्याला स्तनपान ।
अंकावरुनी धडपड करुनी बाळ निघाला सटकून ॥

'नतो धलं तूं, नतो येउं तूं जंमत कलतों ताईची'।
वदुनी इतुकें पुढती चमके पारि न माउली ऐकेची! ॥ १ ॥

* * * *

जरी अर्भकासम मी हांका तुला मारितों इवळोनी।
'राधानाहो! दर्शनलाहो दे' हा टाहो फोडोनी॥
कितिदां पडतों पायां, थकतों, काकुळतीला बहु येतों।
शरण्यशरणा! पतितोद्धरणा! हृद्घन तव ना पाझरतो! ॥
आईसम का तूं न रिकामा सांग दयाळा! सांग मला।
क्षुधा न ज्याला ऐशा बालापरि कीं तुजला हा गमला? ॥
उगाच किंवा बाह्यात्कारीं हाका मारी छटेल हा।
अंतर्यामापासुनि नाहीं अद्यापिहि या खरी स्पृहा॥
घसा कोरडा ओरडतां हा पडला माझा परि पाहीं।
सर्वसाक्षि तूं खरी स्थिती मम कशी न दिसते तुजला ही! ॥
किंवा आईपरि तूं येशिल चित्त द्रवतां धावोनी।
विश्वसुनी मी स्वस्थ राहुं का, भय बहु वाटे परी मनीं॥
माया ताई बहु मायावी मोज तिची मी करावया।
जाइन का रे? न कळे मजला काय करावें प्रभुराया! ॥
येइल म्हणुनी तुजला जेव्हां इच्छा मजला घ्यायाची।
येई तेव्हां परी विनंति स्मृति मज होउ न ताईची! ॥ २ ॥

---

## ९ नवें-जुनें वर्ष.

(पृथ्वी.)

सहर्ष सुहृदांसवें उपवनामधें हिंडतां।
रसाल[1] तरु पाहिला लघु सुरेख आंदोलतां॥
सुरम्य सुमसृष्टिच्या सहजबंधु मंदानिलें।
सुगंध भरला किती दिशिदिशीं मना मोहिलें॥ १ ॥

---

१. आंब्याचा वृक्ष.

मरंदमय मंजरी मधुर एक म्यां तोडिली ।
मुहुर्मुहु[१] विलोकिली मुदभरें किती हुंगिली! ॥
कुठे तिजसि ठेवुं मी तिज कुठे न ठेवूं असें ।
तदा मजसि जाहलें मन करी तदा ती पिसें! ॥ २ ॥
समुल्लसित मानसें तृषित नेत्रिं विस्फारिती[२] ।
सुकोमल तनू तिची निरखितांचि सालंकृती[३] ॥
चमत्कृति विलोकिली स्तिमित वृत्ति तैं जाहलीं ।
अणूपरिसही लघू किती फलें तिला झोंबलीं! ॥ ३ ॥
हळूच उमलूनियां मृदुल पुष्पकुक्षीप्रती ।
फलें उदय पावती परि फुलां न संमर्दिती ॥
प्रसूनशव[४] आदरें निजशिरावरी वाहती ।
असे तनयधर्म तो किती उदात्त हें दाविती ॥ ४ ॥
नवें न किमपी नवें नच खरें निराधार तें ।
जुन्याच जठरांतुनी नियत जन्म तें पावतें ॥
तरूद्गम[५] न संभवे जरि न बीज आरोपिलें[६] ।
जुन्यास अवमानणें म्हणुनि हो! नसे चांगलें ॥ ५ ॥
असे अतिपुराण हा विटपि नांव ज्या 'काल' कीं ।
कुणा न कथुं वृद्धि ये स्थितिसमाप्ति त्याची निकी ॥
अनेक शकरूपिणी असति त्यास शाखा भल्या ।
पळप्रहरयामिनीदिवसपर्णि भारावल्या! ॥ ६ ॥
फुले विटपि लागुनी विविधमासरूपी फुलें ।
तशीं बिलगलीं किती अमित वत्सरांचीं फलें ॥
चमत्कृति परी पहा सुफल पक्व जों होतसे ।
गळोनि लय पावतें नच पुन्हा कधींही दिसे! ॥ ७ ॥
असेंचि नववर्ष हें उदित आमुचें होतसे।

---

१. वारंवार. २. प्रफुल्ल. ३. सुंदर (अलंकारांनी युक्त.) ४. मेलेलें (सुकलेलें) फूल. ५. झाडाची उत्पत्ति. ६. पेरलें.

अनंतिं गतवर्ष तें विलय आजि पावे तसें ॥
यदीय सुखसंगमीं प्रगति आमुची जाहली ।
स्मरूं न जरि काल तो बहुचि धन्यता जोडली! ॥ ८ ॥
गताह्निं अनुभूति जी, म्हणुनि, लाधली आपणां ।
स्मरोनि तिज, टाकुं या पद पुढें, नको वल्गना! ॥
तरीच नववर्षिं या सुख विशेष संपादुनी ।
प्रभूत्तमकृपाबलें खचित धन्य होऊं जनीं! ॥ ९ ॥
कसूनि हरिभक्तिचा दृढ पचंग सोत्कंठ तो ।
सर्वेचि असुं द्या सर्वे स्वसुहृदात्मविश्वास तो ॥
प्रचंड ' जयकृष्ण' ही करुं अखंड या गर्जना ।
मिळेल फल या चला जशि धरूं मनीं भावना! ॥ १० ॥

---

## १०. पुष्प आणि मानवी जीवित.

(पृथ्वी.)

मनोज्ञ नवपुष्पिता विकसिता सुरम्या लता ।
तसेच तरु पाहिले उपवनांत आंदोलतां ॥
सुगंध पवनें किती पसरला स्मरोद्दीपक ।
प्रफुल्ल मन जाहलें; करि जसा गृहा दीपक ॥ १ ॥
समग्र गृहयातना विसरलों घडी एक मी ।
निसर्गवनदेवतासदनिं सौख्य का ये कमी? ॥
असो. सहज पाहिलें गलितपुष्प मीं सुंदर ।
करीं धरुनि हुंगिलें बहुत दावुनी आदर ॥ २ ॥
प्रमोदयुत मानसें सुमन लीलया पाहतां ।
विचार शतशा मनीं उभविले तयें तत्त्वतां ॥
तयीं सुमन वेढिलें जशि समस्त पृथ्वी तमीं ।
मुदें सकल गोंवितों सुरसवृत्त पृथ्वींत मी ॥ ३ ॥

जनीं मनुजजन्म तो कुसुमसा मला भासतो ।
विचार करितां मनीं अमित देइ लाभास तो ॥
प्रसून मुकुलस्थितींत असतां सुवासें निकें ।
मनोभ्रमर गुंगवी, शिशुस तें जसें मातुकें ॥ ४ ॥
तसा मनुज हर्षतो उपजतां गृहीं नंदन ।
असेल कुणि का असा कुमति जो गणी नंद न ॥
हरीख परमावधी उमलतां कळी होतसे ।
वयांत नर येइ जों अमित सौख्य दे हो तसें ॥ ५ ॥
सुमा चुरडितां अशा नयनमोहका लागती—।
मनास चटके खरे चटचटा, न त्याला गती ॥
तसा सहज नेतसे यम नरा मुळीं नाकळे ।
त्वदीय कृति केविं भो प्रभुजि! मंदधींना कळे? ॥ ६ ॥
निरर्थ सगळें गमे नर गतासु होतां तयां- ।
तदीय सुहृदां जनां लव सुचे न हो तातया! ॥
दिसे न कधिंही पुन्हा मनुज तो जगाभीतरीं ।
अशाश्वतहि भासती सुममनुष्य ऐशीं तरी ॥ ७ ॥
सुरम्य कुसुमा! तुझी रुचिरता विनाशी खरी ।
सुगंध किति वेळसा वद टिकेल तैसा तरी ॥
दिनैक दिन दोन वा, मग सुकोनि कीं जाशिल!।
पदच्युत करील वा चुरगळोनि कोणी खल! ॥ ८ ॥
सुरेशपदिं वा शिरीं तनु समर्पिशी तूं जरी ।
तरीच तव धन्य तें उमलणें फुला! भूवरी ॥
किती नविं तृणांकुरें उपजती प्रतिप्रावृटीं ।
तपीं गळुनि बापुडीं पडति पाहिं पृथ्वीपटीं ॥ ९ ॥
तसे मनुज हो! फुलापरि तुम्ही गमां या जनीं ।
न धन्य जनु युष्मदीय शिणल्या वृथा या जनीं[१] ॥

---

१. माता.

अशाश्वत अयुष्य हें धनसुतादि तें व्यर्थ हा! ।
प्रभुत्व, इहवस्तु या क्षर, न लाभ देती महा ॥ १० ॥

( शार्दूलविक्रीडित. )

व्हावें जन्मुनि धन्य या क्षितितलीं ऐशी जरी कामना ।
जिव्हेनें हरि गाउनी निशिदिनीं ठेवा मनीं काम ना ॥
पूजा श्रीधर हस्तकीं, यदुवरा नेत्रीं पहा सर्वदा ।
श्रोत्रीं कृष्णकथासुधा पिउनिया प्रेमें भजा सर्व-दा ॥ ११ ॥

---

## ११. सुहृद्दर्शन.

पद (चाल—उद्यां बघ जाते......)

अलौकिक घडलें । मन निरुपाधिक हें झालें ॥ ध्रु० ॥
दर्शनलाहो प्रियसुहृदाचा । घडे अकल्पित पूर्ण सुखाचा ॥
प्रमुदित झालों हृदयीं साचा । मनीं मी धालों । प्रेमामृतिं रंगुनि गेलों ॥ १ ॥
षड्रसभोजन मज का मिळलें? । कीं षड्दर्शनदर्शन घडलें? ॥
षट्शास्त्रांचें अथवा झालें । षड्ऋतु मूर्ति । येउनि का करि सुखपूर्ती ॥ २ ॥
चिंतामय हृन्नीलनभीं या । कृष्ण नीलघन येतां उदया ॥
नीलकंठमन नृत्य थयथया । करी आनंदें । हृदय किती हरिखें कोंदे! ॥ ३ ॥
केकिविरावें घन तो द्रवला । थुइ थुइ वर्षे प्रेमजलाला ॥
प्राशुनि मोदें मयूर धाला । शून्य जग झालें । मेघरूप केवळ उरलें ॥ ४ ॥
प्रसन्न निर्मल हृदयाकाशीं । कृष्णशरद्विधु तेजोराशी ॥
पूर्ण कलानिधि ये उदयासि । सुधामय झालें । चित्तकुमुद अभिनव फुललें ॥५॥
शुद्धभावकलहंसनिनादित । हृदयसरोवर पूर्ण विराजित ।
वृत्ती-शाली झाल्या परिणत । प्रमोदें न्हालें । जग शरल्लीन हें झालें! ॥६॥
कृष्णरूपि वा हेमंतर्तु । आला धांवत सुखैकहेतु ॥
सौहार्दांचा विशाल केतु । अंतरीं फडके । भयवश षड्रिपुगण वांके ॥ ७ ॥
कामक्रोधा थंडी भरली । उसळी त्यांची त्यांत जिराली ॥
भेदवृत्तिही करपुनि गेली । बुद्धि ही हौसी । आत्म्यासीं रंगे कैशी! ॥ ८ ॥

शिशिर वदूं का अथवा याला । आला मोदें रिझवायाला ॥
दुःखहोलिका करावयाला । गतप्रभ झालीं । वैकल्पिक कुमुदें गळलीं ॥९॥

प्रेमरसाचा सदिक्षुदंड । कीं काव्याचा मधुमधु खंड ॥
रम्यगुणांचा रत्नकरंड । मोडुनी गंड । गर्वाचा, मन हो थंड ॥ १० ॥

संदेहाची धूलिच उडवित । ये अथवा हा ग्रीष्मचि धांवत ॥
तप्तकरांनीं विकल्प जाळित । जाहला धूर । दुष्टाशा चकनाचूर! ॥ ११ ॥

सर्व किल्बिषें जळूनि गेलीं । मलिन मनोभू पवित्र झाली ॥
ज्ञानबीज तें समुचित कालीं । फोकलायातें । प्रेमजलें आर्द्र करी ते ॥१२ ॥

मी मधु मज वा भेटायाला । कृष्णरूपि हा माधव आला ॥
सुमनें उधळित दिशांदिशांला। हरपलें भान। गमला मज जणुं कीं मदन॥१३

वृत्तिमल्लिका पुष्पित झाली । हास्य·गुलाबा पुष्पें फुटलीं ॥
दंतकुंदनवमुकुलें फुललीं । करी स्मित गालीं । विनयाची लज्जावल्ली ॥१४॥

सारल्याचा सुरुतरु सुंदर । नवदलयुत हा नयनमनोहर ॥
संदेहाचीं अभ्रें घनतर । फोडितो प्रबल । गजराजी मृगपतिबाल!॥ १५ ॥

पौरुषचंपकतरु दरवळला । पावित्र्याच्या कल्पतरूला ॥
मधुर सुमांचा बहर लोटला । समाधानाचा । मंदानिल डुलवी साचा! १६

अभिमानाचा पलाशवृक्ष । फुलला, गळलीं सुमनें लक्ष ॥
रागसुरंजित झालें वक्ष । गर्वंवध झाला । तद्रुधिरपूर कीं आला! ॥१७॥

सौजन्याच्या सहकारावारि । प्रीतिकोकिला पंचम रव करि ॥
हसवी रिझवी डुलवी अंतारिं । किती ये बहर । करि गुंजा चेतोभ्रमर ॥१८॥

वसंतकालीं बहुविध तरुवर । सुरभि सुमें हीं अभिनव सुंदर ॥
जमवुनि एक्या ठायीं चतुर । प्रदर्शन मोठें। उघडी जणुं मजला वाटे ॥१९॥

अनुपम रम्या शरन्नभःश्री । अथवा वदुं का ललित वनश्री ॥
कीं ही मानूं रुचिर सरःश्री। एक्या च कालीं । त्रिस्थलिंची यात्रा घडली ॥२०

ऐसें मन्मन झालें क्षणभर । निरुपाधिक तें जरिही स्वैर ॥
क्षुत्तृष्णेचा पडला विसर । कार्यगुरुभार । मग कुठोनि तरि सुचणार ? ॥२१॥

षड्ऋतु ऐसे ठायीं एका-। जमले; गमलें मजला देखा ॥
अनुभव याचा सहृदय रसिकां। अन्य मनुजां हें। शब्दजाल, दुसरें नोहे ॥२२॥
नित्य भवीं या मन्मनराया!। निरुपाधिक तूं ऐसा सखया!॥
होउनि ध्याई कमलानिलया। जरी हें घडलें। सफल सुहृद्दर्शन झालें ॥२३॥

---

## १२. परीक्षा।

( चाल.—अर्धतनू वारुळी बुडाली...)

" दिव्याकृति ही स्वर्गालंकृति तरुणी रमणीश्वरी।
सुंदरी सौंदर्याची झरी ॥ ध्रु० ॥
मनोभवाची मनोमोहिका पुष्पवाटिका नवी।
हारिखवी चित्त, नयन लोभवी ॥
सुवर्णगौरा पीतकांतितनु केवळ जणुं केतकी।
डोलतो कृष्णफणी मस्तकीं ॥
रम्यवदन हें धवल कमल कीं, नयनभृंग त्यावरी।
नासिका चंपककलिका खरी ॥
हा अधर लाजवी गमतें मज विद्रुमा।
शोभते रदा या सुंदर कुंदोपमा।
हा खुले गालिं या गुलाबनवरक्तिमा।
वक्राकृति ही भृकुटी भासे मदनधनुष्यापरी।
विंधिते दृष्टिशरें अंतरीं ॥ " दिव्या० ॥ १ ॥

* * * * *

" चतुरशिरोमणि रसिकाग्रणि तूं खरा कवीश्वर खरा।
उदारा गभीरमतिसागरा! ॥
कुठे पाहिलें स्मरा, कधीं तशि सौंदर्याची झरी।
पाझरे बुद्धि तुझी पारि खरी ॥
सोन्याची ही लगड घरीं तव कां न तिका आटसी?।
उगा कां दीनमुखें हिंडसी? ॥

चांचल्य कुठे त्या फणिचें गेलें वद ।
रोपिना कसा तो अपुला विषधर रद ।
हा लाव हांकुनी मधुहर अलि दुर्मद ।
भ्रमरपीडिता शकुंतला तव दुष्यंता घावरी ।
जाहली भीति तिची संहरीं ॥ दिव्या० ॥ २ ॥

कमल तुझें हें नच कोमेजे जरी न विलसे सरीं ।
चमत्कृति अद्भुत तव ही खरी ॥
सरल नासिका गंध घमघमे आजाचि हें ऐकिलें ।
सेवितां प्रसन्न मन जाहलें ! ॥

तव रमणीच्या अधरविद्रुमा बिंब मधुर मानुनी ।
कवीशा ! फोडिल शुक मोहुनी ॥
दे गुलाब सुम मज एक खुडुनि त्यांतुनी ।
पाहुं या तयाला वास किती हुंगुनी ।
पाहुं का धनुर्बल एकवार ओढुनी ।
असति कोंवळ्या कुंदकळ्या त्या कठिना रदनापरी ।
अजब हा शोध तुझा भूवरीं ! ॥ " दिव्या० ॥ ३

* * * * *

" रसज्ञ मार्मिक अभिज्ञ तार्किक चार्वाकाचि शोभसी ।
दांडगी बुद्धि तुझी राक्षसी ! ॥
रत्नपारखी खरा एक तूं अमोघ चतुरस्रता ।
मूर्तिमान् बृहस्पतिच तत्त्वतां ॥
परीक्षणाची विलक्षणा ही रीति तुझी पाहुनी ।
कुणाही कींवचि यावी मनीं ॥
कार्पासराशि हा रजतधवल बा ! दिसे ।
तो फेनपुंजही तसाच धवलित असे ।
परि हाटिं तयाला रजतमूल्यता नसे ।

मधुकंठास्तव कोकिलभक्षक राजशालकापरी ।
भाससी मूढ मला अंतरीं ॥ दिव्या० ॥४॥
सुवर्णचंपक कनकपीत रे! कनक पीतही तसें ।
परीक्षा उभया भिन्ना असे ॥
निकष नासिका सुमनालागीं अग्नि निकष कांचना ।
फिरवितां निकष फुका वंचना ॥
गणितश्रेढी जरि उपयुक्ता व्यवहारीं फोल ती ।
निरीक्षणिं निरर्थ जैसी श्रुती ॥
बा! रत्नमूल्य का कळेल तें चावुनी? ।
बा! गानमर्म का कळेल तें पाहुनी? ।
का रूपचारुता दिसे नयन झांकुनी? ।
निर्यामिक[1] तूं गद्यं[2] पंडिता कवितामधु-माधुरी ।
कळाया मृदुता हवि अंतरीं ॥" दिव्या० ॥ ५ ॥

* * * *

निखिलनियन्त्या! न्यायनिर्दया! नयपटु नारायणा!
परीक्षिसि असाच का या जना? ॥
हाय हाय हा न्याय काय मी धाय मोकलूं किती ।
पुरे बा! पुरे तुझी पद्धति ॥
रात्रंदिन या चरकीं धरुनी काय असा जाळिसी? ।
कनक बा! काय मला मानसी? ॥
मृदु सुमाहूनही मृदु मन माझें असे ।
हें मीच तुला परि बोलुनि दावूं कसें? ।
बहु आत्मविकत्थन यांत गमे होतसे ।
नको नको बा! विसर विसर तें वदलों जें श्रीहरी! ।
पिता का सुतवच हृदयीं धरी? ॥दिव्या० ॥६॥

---

१. अमेळ ( ज्याच्या विचारांत विसंगतपणा आहे अशा. ) २. शुष्कहृदया !

कशास चिंता करूं परी मी तव ही कविमन असे ।
तुझिच का विभूति उशना नसे? ॥
कथा तुझ्या ज्या सदा परिसतों भिवविति त्या मन्मना ।
घाबरें करिती करुणाघना! ॥
किती परीक्षा कठिण घेतली प्रऱ्हादाची तुवां ।
नयचि ना, भक्तभृंगराजिवा? ॥
सुतयज्ञनिकषिं तूं श्रियाळ नृप लाविला ।
स्त्रीयज्ञनिकषिं तूं हरिश्चंद्र यांशिला ।
शिबिनृपाकडुनि तूं आत्मयज्ञ कराविला ।
मजसाठीं तूं निकष कोणता नवा योजिसी तरी ।
जाण बा ! नृपति नसें मी परी ॥ दिव्या! ॥७॥

---

## १३ माझ्यावर प्रीति आहे ना पण ?

### राधाकृष्णप्रणय.

( चाल—आनंदाआनंद गडे ! )

राधा—‘ प्रीति असे ना मजवरती ? । मनापासुनी कृष्णा ! ती ॥
आण गळ्याची वहा गडे ! । सांग मला कां गूढ पडे ? ॥
तोंवरि सखया । निर्मलहृदया । हृदयनिहित या ।
नुचलीं मी मम शिराप्रती ॥ प्रीति० ॥ १ ॥
ललिता नलिनी निजकोषीं । बांधुनि ठेवी मधुपाशी ॥
सोडी त्यातें जशी न ती । विनवी जरि तो मधुगीतीं ॥
या हृदयाशीं । हृदयापाशीं । स्वबाहुपाशीं ।
धरुनि ठेविलें नच भीति ॥ प्रीति० ॥ २ ॥
हळूच तो शिर दयितेचें । उचली वरि हृदयावरिचें ॥
अपांगिं बघतां मान वळे । तोंचि मुखा मुख सहज जुळे ॥
कलिका फुलली । मृदुल कपोलीं । लाली चढली ।
प्रेमरसाला ये भरती ॥ प्रीति० ॥ ३ ॥

कृष्ण--विचार करुनी पहा मनीं। वेड न का हें तव रमणी?॥
शपथेवरि का सांग बरें। खऱ्या प्रीतिचें मोल ठरे?॥
नभिं घनमाला। विलसे विमला। केकि हर्षला।
डोलत नाचे मधुर किती!॥ प्रीति० ॥ ४ ॥
प्रभा प्रियतमा जशि रविला। चारु चंद्रिका चंद्राला॥
शंपा प्रियकर मेघाला। कीं सरिता क्षीरोदाला॥
परि वद रमणी। मजलागोनी। यांतुनि कोणीं।
शपथ वाहिली कीं प्रीति। करूं परस्पर अम्ही अती॥५॥
कस्तूरीचा आमोद। भुलवी झुलवी दे मोद॥
जगांत परि हें कळवाया। शपथ न लागे कधिं घ्याया॥
अतितर मधुरा। असे शर्करा। याची इतरां।
शपथेविण ये अनुभूति॥ प्रीति० ॥ ६ ॥
स्वयंभूत गे! प्रीति असे। जडांत संभव तिचा नसे॥
मंगलमय जो जगत्पती। मूर्तिमंत कीं तो प्रीति॥
भक्तासाठीं। तो जगजेठी। भक्तापाठी।
शपथेविणही असे सति!॥ प्रीति० ॥ ७ ॥
विरंचितनयें सखि! मातें। पुसतां कथिलें म्यां त्यातें॥
वैकुंठीं मी वसत नसें। योग्यांच्याही हृदि न तसें॥
निर्मलचित्त। भक्त्यासक्त। माझे भक्त।
जिथे राहुनी मज गाती। तीच खरोखर मम वसति॥ ८ ॥
प्रीतीचेंही हेंच पहा। हृदयवल्लभे! तत्त्व महा॥
चिन्मयरूपी प्रीति सखे। भक्तासन्निध रमे सुखें॥
नसतां चित्तीं। लवही प्रीति। वदलों बहु ती--।
असे तुजवरी; परि अंतीं। काय जरि न ये अनुभूति?॥ ९ ॥

---

# १४. लपंडाव.

( भक्तमणिमालामेरु राधेच्या ठायीं आत्मविश्वास किती दृढ होता याचें शब्दचित्र लिहिण्याचा प्रस्तुत कवितेंत प्रयत्न आहे. )

( **चाल**--दो दिवसाची तनु ही........... )

१

धांव धांव जा सुखें माधवा ! तुझ्याच मनिंचें होऊं दे ।
कुठवर जासी कितिसा लपसी किती धावसी पाहूं दे ॥ ध्रु० ॥
कितीहि सुंदर भेसुर रूपीं बहुरुप्या ! तूं नटलासी ।
भीति न त्यांची मला राहिली वृथा कशाला चाळविसी ॥ १ ॥
राधा नच ही असे पूर्वीची उगीच मुळुमुळु रडणारी ।
कळती आतां तिला चांगलीं कारस्थानें तव सारीं ॥ २ ॥
कच्च्या गुरुची नसे खरोखर तुझीच शिष्या पुरी पुरी ।
गुरुशिष्यांच्या लपंडावीं या कोण बघूं या ये हारी ॥ ३ ॥
जातां पुढतीं हंसत हंसत तूं नको पाहुं रे ! मुरडोनी ।
नको पाळवूं करसंकेतें मोहक डोळे मोडोनी ॥ ४ ॥
कशास इतुक्या व्यर्थ खटपटी करिसी मज तूं वंचाया ।
समर्थ नच का गमे राधिका तुला नाटक्या ! जाणाया ? ॥ ५ ॥
प्रभातकालीं मृदु मधु मंजुळ मुरली सुंदर वाजवुनी ।
विहगबालकां संथपणानें गायनसंथा दिल्या कुणीं ? ॥ ६ ॥
भर-मध्यान्हीं भक्ष्यशोधिनी-दीनपक्षिणी-चंचुपुटीं ।
दाणे कोणीं सांग घातले ? तूंच तूंच ना ? जगजेठी ! ॥ ७ ॥
संसृतिसागर तरतांना जे पडले गडले तळिं बसले ।
जीवनकलहीं दमले, थकले, हताश झाले, दगदगले ॥ ८ ॥
प्रशांत रात्रीं सुधारसाचे चषक देत त्या जीवांना ।
लक्षलोचनीं लक्षि कोण रे ! वात्सल्यानें दयाघना ? ॥ ९ ॥
सती कुमुदिनी तपस्विनी या आचरितां तप जलामधें ।
वांच्छित पुरवुनि कुणीं रिझविल्या ? वद वद मजला ऐकूं दे ॥१०॥

२

वसंतविरहें व्याकुल वसुधा स्ववश न होई सामानें ।
पाहुनि ऐसें पाखडली जैं आग तिजवरी ग्रीष्मानें ॥ ११ ॥
वात्सल्यानें प्रेमभरानें वृष्टि सुधेची करोनिया ।
शांतवितां तिज दिसलें मजला श्यामरूप तव यदुराया ! ॥ १२ ॥
नये ओळखूं परि मीं म्हणुनी पीतांबर निज टाकोनी ।
नीलांबरिं या नील नीरदीं नीलांबर तूं नेसोनी ॥ १३ ॥
घननीळा ! तूं लपत छपत रे ! जरी धांवसी तुझा तरी ।
दिसतो मजला चमचम करितां कांठ लख्ख हा जरतारी ॥ १४ ॥
इतर भूषणें जरी न दिसलीं कौस्तुभ कैसा वद लोपे ? ।
राधेला या ठका ! अशापरि नसे ठकविणें बघ सोपें ॥ १५ ॥
वैजयंति ही मोहनमाळा पदावलंबी गळयांतली ।
थांब थांब कीं बालमुकुंदा ! गमे अडकुनी पदिं तुटली ? ॥ १६ ॥
किंवा नूपुर पदिंचे गळले धांवत असतां गोपाळा ! ।
तुटले सुटले मणी मोकळे माणिनमणी बघ ओघळला ! ॥ १७ ॥
मकराकृति तव कर्णकुंडलें श्रवणीं दिसति न पडलीं का ? ।
शर्थ माधवा ! झाली आतां तिळही भय तुज नुरलें का ? ॥ १८ ॥
वेंच वेंच तीं, वळ माघारीं आज हांससी जरि मोदें ।
उद्यां यशोदा बांधिल उखळीं पूर्वस्मृति मनिं वागूं दे ॥ १९ ॥

३

अजूनही मीं नोळखिलें तुज वाटे ऐसें काय तुला ? ।
आणिक देत्यें ऐक दाखले पुरे खेळ हा गोपाळा ! ॥ २० ॥
जलावर्जनें जीवन मिळतां मोहक दिसली वसुंधरा ।
मोहित झाला चित्तीं चळला वर्षाॠतु जरि धीर खरा ॥ २१ ॥
हिरवा शेला मोहक सुमनें वस्त्राभरणें नवीं अशीं ।
अर्पी तिजला, परि ती साध्वी काय कैतवीं पडे फशीं ? ॥ २२ ॥

चिडला वर्षा खिजला चित्तीं गांजी तिज अति वृष्टि करी ।
कवणें वद हारि! तया दंडिलें हारिधनु कोपें धरुनि करीं? ॥ २३ ॥
शरत्स्वरूपें अवतरुनी नव सहस्रदलयुत पद्माचें ।
छत्र करोनी साध्वीवरतीं धरिलें कोणीं वद साचें ॥ २४ ॥
वणिग्वृत्तिऋतु हेमंताभिध बहु मायावी मधुभाषी ।
वेडा होउनि बघे वसुमती आलिंगाया करपाशीं ॥ २५ ॥
स्निग्ध प्रेमल कटाक्ष फेंकित इक्षुरसाचा चषक करीं ।
घेउनि चाले डोलत डोलत कारिणीमागें जसा करी ॥ २६ ॥
धनुःसमानचि कमान त्याची केली ज्यानें पुमान तो--।
पुरी जाणत्यें, रावणहंत्या रामा कोण न ओळखतो? ॥ २७ ॥
जरठ वांकडा शिशिर फांकडा, शब्द बोबडा ये वदतां ।
वळला अंकडा तरीहि मुरडे कशी पहा ही कामुकता! ॥ २८ ॥
टोंकित कांठी लागे पाठी धरेस गांठी तिला छळी ।
भस्मासुरवत् तया जाळिता तुजविण दुसरा कोण बळी? ॥ २९ ॥
वसुंधरेला वसंतरूपें दर्शन देउनि आनंदें ।
तिचे मनोरथ सांग पुरविले मधु गोविंदा! कुणीं वदें ॥ ३० ॥

४

कसा नुतरल्यें अजुनि काय कीं खेळ न झाला तुझा पुरा ।
हौस न पुरली जरि तव कृष्णा! सुखें धांव जा भराभरा ॥ ३१ ॥
पक्ष जोंवरि मुळीं न दमले उडतो पक्षी मुदें वरी ।
थकला म्हणजे अपाप मग तो घरटें अपुलें जवळ करी ॥ ३२ ॥
दाटुनि पान्हा फुटतां धारा सोडुनि चारा गाय घरीं ।
धांवत येई किती हंबरे बचडें अपुलें जवळ करी ॥ ३३ ॥
फळ वृक्षाचें गळे भूतळीं जों न जाहलें परिपक्क ।
जोंवरि इंदु न इंदुग्रावा धारितो अपुलें उपलत्व ॥ ३४ ॥
कितिहि उन्मदें गर्जो अंबुद, मारुतलहरी कीं चपला ।
दृष्टिस पडतां सर्व मावळे लोळण घेई भूमितला ॥ ३५ ॥

आतुर जोंवरि कांत तोंवरी खरा मानिनीमान तगे ।
परंतु होतां हें उफराटें तीच होउनी त्या बिलगे ॥ ३६ ॥
निश्चय ढळला सर्व शिवेचा जातां शंकर तपोवनीं ।
मान कशाचा, कोप कशाचा, लीन जाहली ती चरणीं ! ॥ ३७ ॥
कृष्णपतंगा! खुशाल म्हणुनी स्वच्छंदें तूं विहर नभीं ।
जोंवरि माझ्या हातीं दोरी मीहि तिळभरी तुला न भीं ॥ ३८ ॥
हृदयानंदा! हृदयीं माझ्या जरी विलसती तुझीं पदें ।
विनवुं कशाला तुला तरी मी धांव धांव जा स्वच्छंदें ॥ ३९ ॥

---

## १५. मित्रोदय.

पद (चाल—अर्धतनू वारुळीं बुडाली.)

प्रसन्न सुंदर नयनमनोहर मित्रोदय जाहला ।
सुखाचा सागर वोसंडला ॥ ध्रु० ॥
सुविचाराची प्रभात फुटली कुविचाराची निशा ।
उडाली पीडि सदा अवदसा ॥
अज्ञानाचें निबिड भयंकर तम हें कोणीकडे ।
दिगंतीं जाउनि वेगें दडे ॥
निस्तेज तेविं ही होय गर्वदीपिका ।
वाहतो नम्रतावायु शांत जो निका ।
सप्रेम उसळती सत्त्ववृत्तिधेनुका ।
अहंकार हा दिवाभीत कीं दारुण रव आपुला ।
सोडुनी मुग्ध कसा बैसला ॥ १ ॥
अतिलोभाच्या रातकिड्याचा किर्र शब्द भीषण ।
निमाला मित्रोदय पाहुन ॥
मानधनाची मतिमंजूषा चोराया जो टपे ।
चोरटा काम अतां तो लपे ॥
ही मोहतरूची दाट दुष्ट सावली ।

जी मानसभूमीवरी पहा मीनली ।
मावळे रम्य जों ज्ञानदीप्ति फांकली ।
मत्सररूपी व्याघ्रकपाळीं शूळ महा ऊठला ।
मद्गजा लवहि न मद राहिला ॥ २ ॥
हृदयगगन हें प्रसन्न झालें, चिंतेचा नीलिमा ।
त्यजी, ४ प्रणयाचा रक्तिमा ॥
मनःकमल हें विकसित होतां भावभृंग त्यांतुनी ।
निघाला दुःसह बंधांतुनी ॥
हे आलस मायापाश सर्व तोडिले ।
धैर्यानें संकटमेघ दूर लोटिले ।
तें उदात्त मित्रध्येय पुढति ठेविलें ।
स्वानंदाच्या उज्ज्वल राज्यीं गुंगत मग चालला ।
तयाला कोण आडवी भला ॥ ३ ॥

---

## १६. तिमिराप्रत—

पद (चाल—उद्धवा शांतवन कार...)

ये ये बा! तिमिरा आतां, निजजननी रजनीसंगें ॥ ध्रु० ॥
तूं निदान एकांताचें । सुविचारें गमसी जगतीं ॥
शुचिनिधान सुविचाराचें । त्रस्त मना देसी शांती ॥
तूं पिधान तेजोवलया । बाह्यीं तारि गर्भीं प्रगती ।
गुरुवितान आनंदाचें । आध्यात्मिक परमा सुगती ॥
या द्विजिव्ह जनतासर्पा ।
कां भीसी तूं निष्पापा ।
जरि बसति मृदंगा थापा ।
रंजनार्थ झिजवी स्वांगें ॥ निज० ॥ १ ॥
भीममूर्ति वरुनी दिससी । स्वांतिं परि कोमल असती ॥
कृष्णवर्ण बाह्यात्कारीं । तेज हृदीं तळपे भारी ॥

भीषण रव करिसी वरतीं । प्रेमाची मंत्रावलि ती ॥
समदृष्टी हितकर साधु । तूंच जगीं तुजला प्रणती ॥
उच्च नीच अबल प्रबल ।
कुटिल वक्र अथवा सरल ।
मलिन पूर्ण किंवा विमल ।
सम बघसी या अनुरागें ॥ निज० ॥ २ ॥
हें श्मशान देवायतन । कुटिका वा भूपतिभुवन ॥
हें पंकिल पल्वलवारी । कीं गंगाजल शुभकारी ॥
हा ईशध्याननिमग्न । अथवा तो पापविलीन ॥
हा भूपति सुकृति नयज्ञ । किंवा तो दुष्ट कृतघ्न ॥
समसमान सारे गणिसी ।
त्यां सर्वेंचि अंकीं धरिसी ।
भेद न हा ठावा तुजसी ।
आत्मलीन, मद्यें झिंगे ॥ निज० ॥ ३ ॥
संसृति हें सासर जीवा । हा प्रकाश तेथिल दूत ॥
सजविला मनोरथ[1] नामीं । जुंपूनि मनोरथ[2] वाजी ॥
लोभाचे फटके मारी । अश्व खुरीं उधळी चारी ॥
पतिकाम स्वेच्छाचारी । नणदुली असूया मारी ॥
ईर्ष्या ही सासू दुष्ट ।
अभिमान सासरा नष्ट ।
मदकोप दीर पापिष्ट ।
छळती जरि तनु ही भंगे ॥ निज० ॥ ४ ॥
या प्रपंचरजनीमाजीं । संयमी[3] न जागे असती ॥
परधन[4] तें हरण कराया । जीवाचें भयहि न धरती ॥

---

१. मनरूपी रथ. २. इच्छा. ३. येथे श्लेष आहे, एका अर्थी जे संयमीन ते जागे असती; दुसरे अर्थी जे संयमी न ते जागे असती. ४. परधन–श्रेष्ठधन जे ज्ञान तें; (पक्षी) परक्यांचे धन.

परयुवती श्रेष्ठप्राप्ती । या ध्येयध्याना ध्याती ॥
स्वस्वरूपमदिरापानीं । देहभान विसरुनि जाती ॥
गुणधर्मविभिन्ना जनता ।
रक्षितोसि भेदातीता ।
तूं म्हणोनि जगता गोप्ता ।
त्वद्भावीं होतिल दंगे० ॥ निज० ॥ ५ ॥
तूं नेसी माहेराला । कैवल्य मोक्षधामाला ॥
सुविचार पिता हा जेथें । शांती ही माता विमला ॥
बंधु मोद रिझवायाला । बहिण दया खेळायाला ॥
शुचिभाव हंसदूताला । धाडितोसि कळवायाला ॥
धैर्याचा गज सजवीला ।
अंबारी संयम झाला ।
भक्त्यंकुश हाकायाला ।
कोण न वद तेथें रंगे ॥ निज० ॥ ६ ॥

---

## १७. शेतकरी.

पद ( चाल—अर्धतनू वारुळीं... )
असे कृषीवल खरा कृतीनें क्षेत्रनिरत जो सदा ।
जयाची भूमिच कुलसंपदा ॥ ध्रु० ॥
सद्बोधाची प्रशांत सोज्ज्वल पहाट जों कां फुटे ।
क्षणीं हा क्षेत्रज्ञाता उठे ॥
षट्कर्मांचा नांगर मोठा गुण हे गुण बांधुनी ।
षडिंद्रिय वृषभ तया जुंपुनी ॥
सद्बुद्धीचा असूड नामी टाकुनि खांद्यावरी ।
धरोनी दांडा निश्चय करीं ॥
घालितो नांगरा चेतोभूमीवरी ।

---

१. परयुवती-श्रेष्ठ युवती जी मुक्ति ती ( पक्षी ) परक्याची स्त्री.

ती शुद्ध कराया सुफलवती सत्वरीं ।
बहु कष्ट सोसुनी खोल तिला नांगरी ।
आळस कुंदा तृणें कुनिंदा हरळी दुःखप्रदा ।
निवटुनी हारितो भूच्या गदा ॥ असे० ॥ १ ॥
मनोवासना थोर एषणा संकल्पाचीं खतें ।
पसरितो खतवाया भूमितें ॥
निष्ठेचा मग कुळव चालवी संतत भूमीवरी ।
गुरुघनीं लावुनि दृष्टी वरी ॥
तों ईशदयेचा पाउस पडतां क्षणीं ।
सर्वत्र चमकतो सात्विक सोज्ज्वल धणी ।
पेरणी कराया उत्सुक बहु होउनी ।
सुविचाराचा मोरचूत* जो प्रीतिजलीं तो तदा ।
हराया मिसळी कृमिदुर्मदा ॥ असे० ॥ २ ॥
ज्ञानबीज अति साक्षेपानें बुडवुनि तो त्यामधीं ।
वाळवी शांतिच्छायीं* सुधी ।
दंभाहंकृति संशयरूपी काणी* तेणें मरे ।
शुद्धसें बीज तळाला उरे ॥
पेरणी कराया ज्ञानाची निर्भर ।
तो धरी करीं मग भक्तीची पाभर ।
ये समुचित काळीं पीक वरी सुंदर ।

---

* जोंधळ्यावर काणी नांवाचा एक रोग पडत असतो. रोग पडलेली कणसें चांगली दिसतात; परंतु त्यांतील दाणे हातानें दाबले की, आंत बुक्क्यासारखी काळी भुकटी निघते. "मोरचुताचें पाणी करून (१०० तोळे पाण्याला दोन तोळे मोरचूत) त्यांत जोंधळ्याचे बी भिजवावें, व मग तें सावलीत वाळवून पेरावें असें केल्याने काणी रोगाचें बी जळून जातें, व शुद्ध व बिनरोगट जोंधळ्याचें बीं हातीं येतें." असा अलीकडे शेतकीखात्यानें शोध लाविला आहे. व तो सप्रयोग सिद्ध करून दाखविला आहे. यास उद्देशून प्रस्तुत ओंळींची रचना केली आहे.

जन्मांतरिंचीं दैन्यकिल्बिषें जळुनी श्रीहरिपदा ।
मिळतसे आत्मलीन तो मुदा ।। असे० ।। ३ ।।

## १८. चिंताज्वर.

पद–( चाल--आनंदी आनंद गडे... )

सौजन्याची यदा पडे । महर्गता ही चहूंकडे ।। ध्रु० ।।
कर्तव्याची थंडि अहा । अनर्थ उडवी त्यांत महा ।।
अभिनव मृदुतर । मनोंबुजावर । पडलें दंहिवर ।
दारिद्र्याचें कसें घडे! । सौजन्याची० ।। १ ।।
मरुद्गणांचा प्रभाव हा । अद्भुत उपजवि रोग महा ।।
दुर्बलतेची हृदीं भरे- । फार हुडहुडी धैर्य नुरे ।।
चिंताज्वर तो । अंगीं भरतो । लाही करतो ।
अविश्वास हा वात जडे । सौजन्याची० ।। २ ।।
मात्सर्याचें मग पित्त । चढतां हरपे शमवित्त ।।
कोऽहं भ्रांती जों पडली । संमोहा लहरी फुटली ।।
स्मृतिभ्रंशता । बुद्धिनष्टता । प्रलयलीनता ।
गूढ गूढ हें दिसे पुढें । सौजन्याची० ।। ३ ।।
नीति सुबुद्धी या बाया । जमती औषध ठरवाया ।।
अंगरोग वदती न दिसे । दृष्टि ताठली ढळत नसे ।।
स्वार्थभुतानें । दिधलें ठाणें । मंत्रबलानें ।
गाडूं त्याला चला गडे! । सौजन्याची० ।। ४ ।।
'काय करूं' नी 'कसें करूं' । सकल मंत्रि हा मंत्रगुरु ।।
अष्टाक्षरि हा मंत्र जपी । कशास पडतो अन्य तपीं ।।
जपला मंत्र । चुकलें तंत्र । बिघडे यंत्र ।
अस्थिचर्म तें मात्र उरे । सौजन्याची० ।। ५ ।।
संचित उद्यम विधि जमती । निदान कांहीं करूं म्हणती ।।
विधिनें भाळीं बोट दिलें । हंसूं उद्यमा बहु आलें ।।

जसें करावें । तसें भरावें । वृथा रडावें ।
भोग भोगणें भाग पडे । सौजन्याची यदा० ॥ ६ ॥
आळस आश्रय रोगांचा । शत्रु महा आरोग्याचा ॥
तो जिंकावा म्हणिं आधीं । मग नुरती आधिव्याधी ॥
उद्यमरायें । निदान केलें । औषध कथिलें ।
काय तयानें गद न झडे? । सौजन्याची० ॥ ७ ॥
नारायण हरि भिषक्पती । गीतेमाजीं स्पष्ट कथी ॥
'समाधान हें भक्तिरसीं । घेतां हरि या रोगासी ॥
सकलां त्यजुनी । जे जे कोणी । माझे चरणीं ।
लीन तयांना काय नडे?' । सौजन्याची० ॥ ८ ॥
हेतु न धरितां कर्म करा । भाव ईश्वरीं धरुनि पुरा ॥
अनुपम सुख लाधायातें । समुचित पथ गमतो मातें ॥
कसली चिंता । घेउनि बसतां । हैबत घेतां ।
काय अशानें दैन्य दडे? । सौजन्याची० ॥ ९ ॥

---

# तरंग ३ रा.

## १. नवलची!

( चाल.– नृपममता रामावरतीं...... )

पूर्विची न ओळख जरिही । वर वधूस कुतर्के पाही ॥ नवलची ॥
तैशीच वधूही हृदयीं । वर पाहुनि हर्षित होई ॥ नवलची ॥
गालांत हंसोनी हळु तीं । अन्योन्यां चोरुनि बघती ॥ नवलची ॥
कुल जरी । एक ना तरी । प्रेम अंतरीं ।
उपजतें पाहीं । नच संशय तिळभरि कांहीं ॥ नवलची ॥१॥
जरि बंधु सहोदर असला । बघवे ना प्रेमें डोळां ॥ नवलची ॥
जरि भगिनी प्रेमळ विमला । भेटाया तिज कंटाळा ॥ नवलची ॥

ही रीत । कशी नयनीत । सुरू जगतींत ।
बाप ना आई । धिक् सकल कामिनी-पायीं ॥ नवलची ॥ २ ॥
यापरतें दुसरें कांहीं । सृष्टिशास्त्र शिकवित नाहीं ॥ नवलची ॥
अग्निजतू पिप्पलदेहीं । उपजती विदित सर्वांही ॥ नवलची ॥
विसरूनि परि बंधुत्वाला । तो अनल जाळि कीं जतुला ॥ नवलची ॥
परशुदंड गोता काळ । होतसे जाणती सकळ ॥ नवलची ॥
कस्तुरी । मृगोदरीं जरी । उपजते तरी ।
वधाया होई । कारण ती पितरां पाहीं ॥ नवलची ॥ ३ ॥
जलधि कुठे कोठें विधुही । घन कोठें कोठें बर्ही ॥ नवलची ॥
राकाशशि बघतां निधितें । प्रेमाची उकळी फुटते ॥ नवलची ॥
घनमय नभ बघतां साचें । हर्षभरें केकी नाचे ॥ नवलची ॥
गिरिवरी । आंवळे जरी । लवण सागरीं ।
एक होतांही । खावया वासना होई ॥ नवलची ॥ ४ ॥
प्रेमाची ऐशी रीती । म्हणुनि तया अंधचि वदती ॥ नवलची ॥
तें न बघे कुल वा जाती । ना कधीं रूप ना कांति ॥ नवलची ॥
हा सर्व मनाचा कल तो । बा! झुकेल तिकडे झुकतो ॥ नवलची ॥
गायिलें । मना भासलें । जगीं पाहिलें ।
प्रीतिचें गुज हें । शोधुनी मानसीं पाहें ॥ नवलची॥ ५ ॥

---

## २. प्रीतिसंगम.*

(चाल—काय वदूं नशिबातें...... )

संगम तोषद वाटे । मनातें । कोयनेप्रती कृष्णा भेटे ॥ ध्रु० ॥
पितृदिशेनें आली कृष्णा । उत्तरवाहिनी सरित्कोयना ॥
सन्मुख दोघी भेटति जाणा । प्रयागसंगम जणुं हा वाटे ॥ १ ॥

---

* हा मनोहर संगम कऱ्हाड येथें आहे व म्हणून त्याला दक्षिणप्रयाग असें म्हणतात.

भेटहि होतां बहु दिवसांनीं । प्रेमळ जैशा दोन्ही भगिनी ॥
आलिंगिति कीं प्रेमभरांनीं । सौख्य किती हृदयीं दाटे! ॥ २ ॥
अथवा जैशा मातादुहिता । परस्परांच्या कंठीं पडतां ॥
काय वर्णवे ती वत्सलता । शब्दसिंधु सारा आटे ॥ ३ ॥
मधुपय उदकीं मिळतां जैसें । एकरूप तें प्रकटवि खासें ॥
अभेदता ही पाहुनि तैसें । नवल गमे मजला मोठें ॥ ४ ॥
सुता कोथना पोटिं धरोनी । जननी कृष्णा तिजलागोनी ॥
प्रियकर पतिच्या पोंचवि सदनीं । अश्रुपूर नयनीं लोटे ॥ ५ ॥

---

## ३. फूल तें फूल!

कोणा एका प्रसंगीं कोणा एका सत्कवीनें दुसऱ्या एका सत्कवीबद्दल कुत्सित शब्द वापरले ते ऐकून खालील शब्द निघणें शक्य नाहीं काय?

(**चाल**—भूपती खरें ते वैभव... )

तूं दहन भूमिंतिल पुष्प जयाला गणिशी ।
तें त्याज्य कसें तें सांग एकदां मजशीं! ॥ ध्रु० ॥
गुण अन्य फुलांचे ह्यांत न का वद वसती ।
जे रसिकां भ्रमरां दास करोनी घेती? ॥
नवनीतमृदुल हें स्पर्शीं नाहिं का? ।
हा मोहक सौरभराशी नाहिं का? ।
हा आश्रय रसविभवाशीं नाहिं का? ।
हें अंतरंग वद भुलवीना कवणाशीं? ।
वद हरी न नेत्रां कवणाच्या हृदयाशीं? ॥ १ ॥
सौवर्णकोंदणीं रम्य हिरकणी दिसते ।
ताशि लोहमुद्रिकेवारि बसली नच खुलते ।
सामान्यजनें निंदीली ती तरी ।
पारखी उडी बघ घाली तिजवरी ।
चंद्रिका दिसे त्या गेली ती खरी ।

तिमिरांत आपुलें तेजच दावायाशी ।
नज निसर्गसिद्धा बाध कधींहि गुणांशीं ॥ २ ॥
पाहुनी शुक्तिला मुक्ताफल फेंकावें ।
कीं पंक पाहुनी कमला सोडुनि जावें ? ॥
हें नसे वेड का सांग तूं मला ।
मम नको मानुं तूं राग प्रेमला ! ।
तूं उदार धरुनी वाग वृत्तिला ।
बा भारतपुत्रा ! भारतांत सुमनांशीं ।
तूं कोठेंही बघ मान आपुलीं त्यांशीं ॥ ३ ॥

---

## ४. गरीब गोंवऱ्यावाळी.

साक्या.

‘हात जोडिल्यें पदर पसरिल्यें, पायीं लोळण घेत्यें ।
नको नको बा ! नको मला तूं लाथाडूं दीनेतें ॥ १ ॥
‘हाय ! हाय ! हा कसा वाहतो हात तुझा उलथाया ।
माझी पांटी तशा गोंवऱ्या दाहि दिशां फेंकाया ? ॥ २ ॥
‘गवऱ्या इतुक्या करावयातें किती लागले कष्ट ।
याची तुजला काय कल्पना जातीचा तूं नष्ट ! ॥ ३ ॥
‘गल्लोगल्लीं आळोआळीं–नाहीं रस्तोरस्तीं ।
सदा भटकल्यें नाहिं पाळिल्या लाज भीड या शिस्ती ! ॥ ४ ॥
‘रानोरानीं माळोमाळीं ढोरांच्या मी मागें ।
सदा हिंडल्यें घडी न बसल्यें जीव जरी हा भागे ॥ ५ ॥
‘नाहिं बघितली खिंड दरी कीं, नाहीं डोंगर म्हटला ।
सदैव फिरल्यें घडी न बसल्यें देह जरी हा वठला ॥ ६ ॥
‘नाही म्हटली मसणवटी मी सदा नदीचे कांठीं ।
वण वण वण वण किती हिंडल्यें अपुल्या पोटासाठीं ! ॥ ७ ॥

'सकाळ नाहीं दुपार नाहीं नाहीं संध्याकाळ ।
पहाट नाहीं रात्रहि नाहीं फिरल्यें रे! अळुमाळ ॥ ८ ॥
'नाहीं थंडी नाहीं वारा नाहीं पाउस ऊन ।
सोबत संगत नाहिं पाहिली फिरल्यें कांव्यांतून ॥ ९ ॥
'कसलीही भयभीती नाहीं उजेड ना काळोख ।
पोटापाठी दृष्टि ठेविली भली बुरी कीं चोख ॥ १० ॥
'तहान भूकहि म्हटली नाहीं, नाहीं गणिली काया ।
पोहटि पोहटि शेण जमविल्यें पोटा या जाळाया ॥ ११ ॥
'स्तनास असलें पोर तरीही तसेंचि तोडुन त्यातें।
शेण धराया धांवत जाल्यें खळीस या भरण्यातें ॥ १२ ॥
'ओलें ओझें वाहुनि वाहुनि कंबर जरि ही मोडे ।
वांकुनि वांकुनि तरी जमवित्यें शेणहि थोडें थोडें ! ॥ १३ ॥
'जड ओझ्यानें थाळ जरीही आली या डोईतें ।
तरी न बसत्यें क्षण न टेंकत्यें घ्याया विश्रांतीतें! ॥ १४ ॥
'त्या या गवऱ्या दारोदारीं फिरवुनि पोटाकरितां ।
विकुनि मिळवित्यें पैसा अडका मी तेलमिठापुरता ॥ १५ ॥
'नाहीं कळणा, कोंडा नाहीं नाहीं कांहिं घरांत ।
मुलें उपाशीं सारीं बसलीं लावुनि दांता दांत! ॥ १६ ॥
'म्हणुनि गोंवऱ्या घेउनि आल्यें धांवत धांवत येथें ।
चांडाळिण मी पोर तान्हुलें रडत टाकुनी तेथें! ॥ १७ ॥
'बाबा म्हणत्यें दादा म्हणत्यें म्हणत्यें माय तुला मी ।
येवो करुणा अभागिनीची जाऊं दे मज धामीं ॥ १८ ॥
'नको नको बा! नको नेउं तूं माझी दे मज पांटी ।
जात्यें जात्यें खरें सांगत्यें पुन्हा न ये या हाटीं ॥ १९ ॥
'हिसकाहिसकी नको करूं मज घाल एवढी भीक ।
दे दे पाटी दे आतां ही मागत्यें न आणीक ॥ २० ॥

'किती ओरडूं किती रडूं रे! पडूं कितीदां पायां ।
कशी न येई हाय निर्दया! कांहीं तुजला माया! ॥ २१ ॥
'नको ओढुं फरफरां, जराही नुरलें देहीं त्राण ।
कालपासुनी उपवासी रे! याच गळ्याची आण! ॥ २२ ॥
'पोट मिळालें पाठीला हें कसें बांधिलें पाहीं ।
काकुळतीला किती येउं मी पांटी सोड अतां ही' ॥ २३ ॥
परोपरींनीं असें विनविलें जरी तियेनें त्याला ।
दया न लवही नराधमाच्या शिवली त्या हृदयाला! ॥ २४ ॥
फरफर ओढित नेलें तिजला पांटीसह त्या दुष्टें ।
अधिकाऱ्यांचें कसें निर्मिलें चित्त गूढ हें मोठें! ॥ २५ ॥

---

## ५. पारिजात.

पद (चाल-चंद्रकांत राजाची कन्या.)

"पारिजात हा काय लाविला तुजकरितां दारीं? ।
नको घेउं गे! नको नेउं गे! टाक फुलें सारीं" ॥ ध्रु० ॥
'नाहीं इच्छा मला फुलांची ठेवुनि हीं घेई ।
नवल केवढें परी पहा कीं क्षण इकडे येई ॥
'बिंदु बिंदु या कशा मक्षिका रस नेती लुटुनी ।
मधुकर निर्भय सुरस चाखिती कुसुमांकीं बसुनी ॥
'मंद मंद या मारुतलहरी परिमल नेउनि हा ।
दिशादिशांतरिं सोडुनि देती सर्वां सौख्य महा ॥
'सुगंध गेला रसही गेला उरलें हें रूप ।
परी क्षणें तें सडेल, घे मग घाणीचा धूप ॥
'निरस फुलांचीं कलेवरें हीं व्हावित कोणाला ।
नकोत मजला, असोत सारीं लखलाभचि तुजला ॥
'पारिजात हा कोणाकरितां सांग बरें आतां ।

त्वदर्थ नाहीं मदर्थ नाहीं अन्याचि रसभोक्ता ॥
'भामेसाठीं भामाद्वारीं लावी हारि तरु हा ।
फुलें रुक्मिणीमंदिरांगणीं पडती सर्व पहा ॥
'सदा दरवळे सौरभ माझ्या पारि सौख्यागारीं' ।
"नको घेउं गे? नको नेउं तूं टाक फुलें सारीं" ॥ १ ॥

---

## ६. चित्रास—

करमणुकीच्या १९११ सालच्या चित्राम उद्देशून प्रस्तुत कविता लिहिली आहे.

(साक्या)

काय लक्षिसी लोललोचने! ललिते ललने! सांग ।
वदन मुरडुनी मागें करुनी किंचित् दृष्टि अपांग ॥ १ ॥
कुरळ केश निःस्नेह तुझे हे रुळती वदनावरतीं ।
करांगुलींनीं तरि न सारिशी पुनरपि कां ते वरतीं? ॥ २ ॥
भुरुभुरु उडती वायुलहरिंनीं गमती जणुं हे भृंग ।
धवलसारसाकडे धांवती होउनि चित्तीं दंग ॥ ३ ॥
विपांडुमुख हें नीलकुंतलीं धूसर विधुसें भासे ।
निसर्गमधुरां मालिन्यहि तें शोभवि सुंदर खासें ॥ ४ ॥
विगलित झालीं गात्रें सारीं नुरलें देहीं त्राण ।
झाले नेत्रीं एकवटुनि जणुं गोळा पंचप्राण! ॥ ५ ॥
डोळे गेले खोल किती हे वांसा नाकाचाही ।
किती निघाला! बोल बोल कीं क्षणभर इकडे पाहीं ॥ ६ ॥
गाल जहाले विरक्त कैसे ओष्ठहि भारी म्लान ।
बगळ्यापारि गे! किती निघाली उंच तुझी ही मान ॥ ७ ॥
वळीव इकडे मान एकदां बोलें कीं मजसंगें ।
भंगे तव मन अथवा कोठें सांग तरी तें रंगे ॥ ८ ॥
केशाखालीं कर्ण झांकले ऐकुं न ये का म्हणुनी? ।
बळेंचि किंवा हें बधिराचें सोंग आणसी जपुनी? ॥ ९ ॥

चुकलों चुकलों ! सोंग नसे हें कोंगहि तैसें नाहीं ।
खरेंचि तुजला भान तुरे गे! तनुचें अपुल्या कांहीं! ॥ १० ॥
स्कंधाखालीं पदर गळाला झाला अस्ताव्यस्त ।
उरोज उघडे तुझे दाविती प्रमाण आजी व्यस्त ! ॥ ११ ॥
गदगद गदगद तुला हालवूं जागृत करुं का आतां ? ।
छे! छे! धीर न पारि तुज होई स्पर्शाया या चित्ता! ॥ १२ ॥
काय करूं मी! कसें करूं गे! शब्द एक तूं बोल ।
दगडाच्या या हृदयकपाटा खोल खोल गे खोल ॥ १३ ॥
हाय ! कशी ही उच्चारीं मी निंद्यावाणी अदय ।
मृदुल सुकोमल फूल असे कीं नवनीत स्त्रीहृदय ! ॥ १४ ॥
हाय ! काय वा दृष्टी फसवी ! चित्रींची तूं पुतळी ।
नव्हे नव्हे; मी प्रबुद्ध वेडा ! भूल असे ही सगळी ! ॥ १५ ॥
सुषुप्तींत वा स्वप्नामाजी काय असें मी पाहीं ।
काढुनि चिमटे त्रिवार म्हणतों नाहीं ! नाहीं ! नाहीं ! ॥ १६ ॥
प्रखर अशी ही भेदक दृष्टी लावुनि बघसी काय ? ।
पुरे पुरे गे! दृष्टि फिरिव ती फुटले धरणीकाय ॥ १७ ॥
बाई म्हणतों, ताई म्हणतों, म्हणतों माय तुलाही ।
पहा मजकडे हृद्गत सांगुनि शांतवि मजला कांहीं ॥ १८ ॥
गोरें मोरें तोंड बघोनी तिळतिळ काळिज तुटतें ।
उठवि उमाळे पोटामधुनी मन हें दुःखें कढतें ॥ १९ ॥
हृदय गहिंवरे कंठ भरे हा ! नुमटे पारि ही वाणी ।
करुण मूर्ति तव या हृदयाचें करिते पाणी पाणी ॥ २० ॥
नको भिऊं तूं नको लाजुं तूं सांगाया मज गूज ।
कपटहृदय मी नसें खरोखर ! सृष्टीचें अलगूज ॥ २१ ॥
कवी न गे ! मी परी कवीचें हृदय मला हें आहे ।
क्षणांत हंसतें क्षणांत रडतें क्षणांत रुसतें पाहें ! ॥ २२ ॥
फूल जणूं कीं मूल जणूं कीं कविचें अंतर्याम ।

चिरंजीव तें असूनि पावे क्षणांत अंतर्धान ॥ २३ ॥
उदास होतें, प्रफुल्ल होतें, होतें तेविं कठोर ।
राजनीतिपर कपटी किंवा अट्टल पक्के चोर ॥ २४ ॥
साधें भोळें, वेडें लहरी त्रिकालज्ञही तैसें ।
वर्णहीन परि ठायीं ठायीं भिन्नचि जल तें जैसें ॥ २५ ॥
असो; नको जा सांगूं मजला ओळखलें तव गूढ ।
गताब्द बघसी सिंहदृष्टिनें होउनि चित्तविमूढ ! ॥ २६ ॥
हेंच कळेना कारण तव वद तिर्यग्दृष्टीचें या ।
रवी न पाहे बघे कवी तें गुह्य लपविणें वाया ॥ २७ ॥
वळीव दृष्टी पुन्हा सांगतों मान न का ही मोडे—।
लागुनि कळ; मी लळा पुरवितों तव हा वाडेंकोडें ॥ २८ ॥
श्वेतद्वीपीं[1] श्रीमत्तांचा दीनांशीं कलि माजे ! ।
वैतागुनि त्या ईशमंदिरीं गेले अमुचे राजे ! ॥ २९ ॥
नैर्ऋत्येला[2] बुद्धिबळांचा डाव मांडिला होता ।
नृपप्रजांनीं परस्परांना चुकवुनि द्याया गोता ॥ ३० ॥
कितीक वरुषें खेळ चालला गताब्दिं शेवट झाला ।
प्यादीं केली फार मजेची जुलमी भूप पळाला ! ॥ ३१ ॥
ईशान्येला चीनपती तो लोकमताख्या तनया ।
अधिकारोचित पाहुनि सांगे राजदंड करिं घ्याया ॥ ३२ ॥
रीस रशीया, चीन लांडगा, मेष कोरिया सान ।
इच्छिति खाया परी गिळी तो जंबुक चतुर जपान ! ॥ ३३ ॥
गतवर्षींच्या ठळक चार मीं कथिल्या गोष्टी तुज या ।
अधिक नको कीं गतवस्तूंचें स्मरण जाळितें हृदया ! ॥ ३४ ॥
'वर्ष नवें हें सुखकर होवो !' माग ईश्वरा आतां ।
अनन्य भावें; पूर्ण करिल तो सकल जगाचा पाता ! ॥ ३५ ॥

———

१. इंग्लंडांत. २. पोर्तुगालमध्यें.

## ७. माझी कन्या !

**पद** ( चाल–चंद्रकांत राजाची कन्या. )

येतां जातां बसतां उठतां, दृष्टीला पडतां;–।
सदा निंदितां, सदा चिडवितां, काय असें करितां? ॥ ध्रु० ॥
देवाजीनें दिधली दुहिता दोष न तिज द्यावा ।
कशी असो; ती असे माझिया विसांवाच जीवा ॥
काळी असली, वेडी असली, असली कसलीही ।
माझी मजला बरी असे ती; भार कुणा नाहीं ॥
पुरे पुरे हो! पुरे खिजविणें, किति तरि रडवावें ।
काय मिळे कीं तिनें रडावें आपण हांसावें ॥
ईश्वरनिर्मित रूप तिचें हें शक्य न पालटणें ।
फुकटचि तरि कीं तिला हिणविणें अथवा बहु हंसणें ॥
अंगुष्ठानें किती उजारेलें नाक तिचें जरि हो ।
चाफेकळिसें वदा सरळ तें होइल का तरि हो? ॥
नाकाचा हा वडा ढेपसा बत्तासा अथवा–।
वरचेवरि हें असें खिजवुनी, कां तिजला चिडवां ॥
नानापरिचीं उटणीं उटुनी काळि न हो गोरी ।
नाहीं निर्मळ जीवन जरि तें साबण काय करी? ॥
नका कोळशांमधलें माणिक म्हणूं तिला आतां ।
मूळवर्ण हा तिचा जरि न ये तुम्हांस पालटतां ॥ १ ॥
चित्र चित्र तें चतुर चितारी चित्रपटीं काढी ।
काढुनि खोडी अरसिक कोणी जरि त्याला खोडी ॥
कसें रुचावें तयास, जरि नच बोलाया धजला ।
परि अंतरीं खिन्न कुपितही समजा तो झाला! ॥
स्वेच्छेपरि तें लिहिलें त्यानें, चित्र तया प्रिय तें–।
निंदो कोणी वंदो कोणी, त्यातें तें रुचतें ॥

प्रसूतिकालीं प्रसूस होती किति नाना क्लेश ! ।
प्रसूच जाणे, न ये कल्पना वांझेला लेश ! ॥
स्वानंदाच्या साम्राज्यांतरिं रंगुनि कवि कविता- ।
डोलत गुंगत गात गात ती करितो रसभरिता ॥
कोणी म्हणती ' नाहीं तिजवरि शाल प्रतिभेची ।
'मद्रासिण' ही नसे कंचुकी अंगिं कल्पनेची ' ॥
कोणी म्हणती 'गुर्जरीण' ही अन्वयसुख न दिसे ।
अर्थकुचांचा थांग न लागे! खासें ध्यान असे ' ॥
कोणी म्हणती 'भली सजविली नटवी हाटींची ।
अलंकार हे किती घातले शोभा गमतीची ' ॥
'प्रास - नूपुरें, तसे घातले तोडे यमकांचे ।
कठोर करिती ध्वनी किती हे! कर्णकटू साचे ' ॥
'शब्दभूषणें' कोणी म्हणती 'चोरुनि परक्यांचीं ।
'उसनी आणी ऐट चोरटी फार दिमाखाची '! ॥
'पैठणिच्या ती तोऱ्याखालीं, जरि ' कोणी वदती ।
'चाले गजगति, जागोजागीं परि ठिगळें दिसती ' ॥
असो अशी ती दूषणभरिता भूषणभूता ही ।
कविता अपुली कवीस रुचते, टाकित तो नाहीं ॥
ओजोहीना सुवर्णदीना रसहीना कविता- ।
जनें निंदिली; गणी तिला कवि मोहक गुणसरिता! ॥ २ ॥
म्हणुनि विनवितों परोपरींनीं बोलुं नका तिजला ।
अप्रिय जरि ती तुम्हां गमतसे, प्रियकर बहु मजला ॥
असा काल हो कधिं तरि येइल, सुंदर ती दिसुनी ।
कोणाचें तरि चित्त सत्वरीं घेइल वश करुनी ॥
वेडया करि जो गोपसुंदरी नटवा श्रीरंग ।
वेडा झाला कुब्जेसाठीं होउनि मनिं दंग ॥

सार-सारसें सुरस सुधेसम, सुरभिसुमें सारीं ।
सोडी षट्पद समद संभ्रमें, सहकारहि सारी ॥
कालोचित तें कर्णिकारसुम कु-सुम जरी विरस ।
मधुकर घाली उडी त्यावरी होउनि कीं विवश ॥
उग्र असे बहु गंध जिचा ती मंजरि सब्जाची ।
मनुज चिकित्सक तरीहि हुंगुनि मिरवी करिं साची ॥
मत्स्यासम ये गंध जिला हो 'योजनगंधा' ती ।
स्मृतिप्रणेता पराशर वरी अवगणुनी याती ॥
दाव्यामार्गे पशूस लागे जाया, तें जैसें ।
जडाजडाही चालवीतसे प्रेमसूत्र तैसें ॥
चंद्रासंगें जशी चंद्रिका, रविसंगें छाया ।
प्रेमासंगें वसे मनासह, तशि मानवकाया ॥
प्रेमभाषणा पैसपाड ना सर्व गोड भासे ।
वेडिवांकडी बालकवाणी दे सुख भलतेंसें ॥
प्रेम असे कीं देवाजीचें देणें; हें तुकया- ।
सांगे; प्रेमापुढें खरोखर देहभान वायां ॥
म्हणुन सांगतों अमर्याद ही पृथ्वि काल, जनता ।
केव्हां तरि तिज वरील कोणी, दोष न द्या आतां ॥
भवभूतीनें तत्त्व मनोहर निजकविता गातां ।
बोधियलें जें; सार्थ गमे तें अनुभव कीं घेतां ॥ ३ ॥

---

## ८. जग कोणाकरितां?

पद ( चाल–अर्धतनू वारुळी...... )

'जग हें नोहे दीनांकरितां' वदते जनता असें ।
वदो कीं क्षिति मज त्याची नसे ॥ ध्रु० ॥
उदास होसी कशास दयिते! सोड मुग्धता पुरे ।
दिलें जग आंदण तुज ईश्वरें ॥

बोल फोल ना अमोल केवळ तोल विचारें मनीं ।
सर्व हें अपुल्याकरितां गणीं ॥
हे लावुनि नानातरू । सुरभि वल्लरी ।
ही रची वाटिका रम्य । धनिक तो जरी ।
परि भोक्ता याचा कोण । शोध अंतरीं ।
भ्रमर सेविता, वायु दिगंतरिं परिमल हा नेतसे ।
धन्याला कोण तरी त्या पुसे! ॥ १ ॥
निर्मलनीरा सरिता सखये! निर्झर नच निर्मिले ।
खरोखर धनिकास्तव मंगले! ॥
गूढ गगन हें गहन गहन तें कोणास्तव गे! वदें ।
विरचि तो करुणाघन शर्मदे! ॥
तो चंद्र विहरतो नभीं । सर्वदा जरी ।
अक्षय्य परी क्षय तया । पीडि सुंदरी ।
तो सदा विपत्ती महा । भोगि किति तरी ।
तारे परि गे! सदा प्रकाशति त्यांना क्षय हा नसे ।
चमत्कृति सर्व जगा ही दिसे ॥ २ ॥
व्याघ्रवृकांना पोटा न मिळे गहन गहनिं राहुनी ।
परि फिरे तुंद हरिण खाउनी ॥
गजराया मृदुकवळ न मिळतो फोडी तरु काननीं ।
परी मधु मुंगिस रात्रंदिनीं ॥
दृष्टान्त तुझा सखि तूंच पहा कीं कशास जाणें दुरी ।
विचारें शोधुनि बघ अंतरीं ॥
हें मूल दांडगें हट्टी । अचपळ पिसें ।
हें दुजें किती तरि । दुबळें तैसें असे ।
हें तिजें किती तरि । सुंदर मोहक दिसे ।
खाया देसी सदा दुबळा असेल जैसें तसें ।
कुणास्तव जग हें वद मग असे? ॥ ३ ॥

## ९. गळावयास झालेलें फूल!

**पद ( चाल**–चंद्रकांत राजची कन्या........)

'हाय! हाय! मी काय बघें हें, किति बंधू माझे।
धूळीमध्यें निजले येथें, चरें चित्त भाजे॥
बुद्धिवैभवें चराचरीं जे श्रेष्ठ जगीं असती।
विवेकसिंधू म्हणविति नर ते, केवीं तुडवीती!॥

काय दयेचा सुविचाराचा लेश न मनिं वागे?।
कोठें न कळे दडी घेतली त्यांच्या अनुरागें!॥
धवल मृदुल हीं बकुलसुमें यां दिसतीं बहु सान।
म्हणुनि न देती गमे सुजन हे तयांस मनिं मान॥

निशिगंधाचें, चांफ्याचें वा सुमन गुलाबाचें।
वक्षःस्थलिं हा जनगण मिरवित केंविं हाय! नाचे!॥
आकारानें रंगांति चेष्टा वचन तयां साजे।
एकत्वाच्या वृथा वल्गना करिति, न मन लाजे!॥ १॥

हाय! हाय! हा मनुज काय कीं, राक्षस चांडाळ।
काय वदूं या कळे न मजला मूर्त अदय काळ!॥
सुमनें वेंचुनि करी चुरगळा काय मनुजता ही?।
सदय रसिकता हीच काय कीं? बोध न मज होई॥

आतां तर हा करी पाकळ्या सुमनांच्या कसा।
मदांध गर्वोद्धत गज तुडवी कमलें पदिं जैसा॥
नच बघवे ही परम नीचता परमावधि झाली।
झांकिं नयन कुसुमाकरजनका! सत्वर वनमाली!॥

बाह्यचक्षु हे जरी हटानें झांकुनि मी बसलों।
अंतश्चक्षु न येति मिटाया पुरता कीं फसलों॥
नयनच्छायायंत्राकरवीं चित्त चित्रकारें।
हृत्फलकीं जें बिंब घेतलें उमटे तें सारें॥

सर्वक्षयकर असें जयाचें ब्रीद जगीं गाजे ।
त्या कालाविण दुजा न पुसुं ये चित्र उमटलें जें ॥ २ ॥
विनंति अंतीं जगन्नियंत्या अखिल विश्वबीजा! ।
हीच असे कीं नको करूं बा! अधःपात माझा ॥
सुखद समीरा सुमनसृष्टिच्या सहकारी सखया ।
सहज अकृत्रिम अससि सुहृद बा! करिं करुणा सदया! ॥
थांब! थांब! बा! जरा थांब, नच उडविं जवें मजला ।
काढुं नको बा! फरफट माझी विनति हीच तुजला ॥
जगन्नियंत्या प्रचंड सूर्या! तूं मज विकसवुनी ।
सजीव बापा! वृथा कशाला ठेविसि वद भुवनीं? ॥
उघडुनि अपुलीं द्वादश नेत्रें करिं रक्षा माझी ।
आनंदानें मरुं दे मजला येथें सुखशेजीं! ॥
कोण ऐकतो कोण परिसतो रडणें दुबळ्याचें ।
आप्तबंधु वा स्नेही सारे जगतिं चालत्याचे! ॥
सर्वांचि पडलें सुमनहि गळुनी म्लान जरी ताजें ।
गेलें उडुनी घाणीमाजीं जाळित मन माझें ॥ ३ ॥

---

## १०. दुःखांतच सुख!

[ **प्रसंग**– घराशेजारील एका बागेत एक तरुणी बकुळीची फुलें वेचीत असता तिची दृष्टि मोरींत नुकत्याच पडलेल्या एका फुलाकडे गेली. प्रथम ती तें फूल घ्यावे या इच्छेने वांकली, पण मग तिचें मन पालटून ती ते फूल न घेतां निघून गेली. प्रस्तुत प्रसंग पाहून सुचलेल्या विचारांचें शब्दचित्र खालील कवितेत काढलें आहे. ]

( **चाल**–आनंदी आनंद गडे........ )

**फूलः–थांब जरा गे! थांब जरा । स्पर्श न करिं मम कलेवरा ॥ ध्रु० ॥**
**ऐक वदें जें शांत मनें । करीं पुढें जें तुज करणें ॥**
**ऐक बालिके । हृदयमोहिके । नयरंजिके ।**
**थांब जरा गे! थांब जरा । करीं न सहसा अविचारा ॥ १ ॥**

कर लागे जों तव मजला । होइल भारी दुःख तुला ॥
दुर्गंधीनें तनूवरी । येइल कांटा सुकुमारी! ।
जलिं या पंकिल । जंतु अमंगल । करिती दंगल ।
मजभंवती ही परंपरा । दुःखांची किति अनिवारा ॥ २ ॥

दुसरीं सुमनें बहु नामी । पहा विखुरलीं आरामीं ॥
वेंच तयांतिल जीं रुचती । पुरोनि उरतिल इतुकीं तीं ॥
मुग्धनंदिनी । मजवांचोनी । तव या भुवनीं ।
नडे न कांहीं जरी जरा । कां करिसी या अविचारा? ॥ ३ ॥

तरुणीः—मृदु मन सुमना कां इतुकें । कठोर करिसी सांग निकें ॥
बघुनि स्थिति ही तुझी अशी । दुःख होय बा! बहु मजसी ॥
हृदय कालवे । वच न बोलवे । मुळिं न साहवे ।
कुदशा तव ही कुसुमवरा!। पीळ पडे रे! मदंतरा ॥ ४ ॥

फूलः—आल्या गेल्या भल्या भल्या । किती योषिता मोठाल्या ॥
पुरुष तसे गे! कुमारही । घेउन गेले फुलें गृहीं ॥
परि त्यांतोनी । मजला बघुनी । द्रवे न कोणी ।
तुझ्याच परि गे! हृदंतरा । कुठुनि दयेचा फुटे झरा? ॥ ५ ॥

अभागि मजसम हीं दुसरीं । होति सुमें जीं पूर्वीं; परी ॥
सडूनि कुजुनी कालमुखीं । लीन आजि तीं पहा सखी !॥
त्यांच्यासाठीं । कोण हिंपुटी । झाले कष्टी ।
विचार निजमार्निं करीं पुरा । पायांपुरता नसे बरा ॥ ६ ॥

कितीक आणिक फुलें अशीं । दुर्गतिच्या पडतील फशी ॥
उद्धारास्तव तयांचिया । सिद्ध काय तूं करावया? ॥
मज एकासी । उद्धरिलेंसी । बहु प्रयासीं ।
अनादि दुर्गति-परंपरा । सरे अटे का तिचा झरा? ॥ ७ ॥

तरुणीः—गेलीं गतलीं कुसुमें रे! । प्रश्नचि त्यांचा आजि नुरे ॥
भावि सुमांचा विचारही । नको कराया मज पाहीं ॥

संचित सरुनी । जें सुम कोणी । आज तरोनी ।
चढेल भाग्या भराभरा । करील तो तें कुसुमवरा ! ॥ ८ ॥
चिंता त्याची वृथा मला । कशास व्हावी सांग फुला! ॥
म्हणोनि तुजला उचलोनी । मंगल उदकें न्हाणोनी ॥
हारिखें जपुनी । तुज गुंफोनी । मेरुस्थानीं ।
रचीन माला कीं गजरा । किंवा वेणी मनोहरा ॥ ९ ॥
कंठालंबी नवमृदुला । विलोलमाला सुखदोला ॥
बसूनि त्यावरि आंदोलें । विलासलीला करिं डोलें ॥
हृत्सिंहासनिं । किंवा बसुनी । शांतिसुखांनीं ।
मंजुलवाणी प्रणयभरा । वद मजसंगें मधुमधुरा ॥ १० ॥

फूलः–हीन दीन मी सुम पापी । पात्र पदा त्या न कदापी ॥
छे! छे! साहस हें करुनी । नको ठरूं तूं निंद्य जनीं ॥
उच्च पदाची । प्राप्ति सुखाची । मज व्हायाची ।
असती तरि का सुदुर्धरा । होती स्थिति मम ही अपरा? ॥ ११ ॥
समज तुझ्यासह मी आलों । वैभवशिखरीं विराजलों ॥
पदप्राप्ति ती का अढळ । सकल सुखां का तें मूळ? ॥
जरि मी विगुणी । ढळेन तेथुनि । तूंच फेंकुनी ।
देशिल तव या कुसुमवरा । इहपर कैंचा मग थारा? ॥ १२ ॥
जोंवरि असतों लघुकलिका । आम्ही सुंदरि! अलोलिका ॥
एका तरुचीं फुलें मुलें । आम्ही सारीं अवि विमले! ॥
विकारवशता । विकसित होतां । बुद्धी फुटतां ।
सैरावैरा भराभरा । आम्हि उधळतों दिगंतरा! ॥ १३ ॥
इथेंच याची चमत्कृती । पहा दावितों तुला सती! ॥
सुमनें आजी जीं फुललीं । काय तत्स्थिती बघ झाली! ॥
कांहीं गळलीं । श्रीशिवभालीं । कांहीं पदतलिं ।
कांहीं गरगर हा वारा । नेउनि सोडी घनांबरा! ॥ १४ ॥
कांहीं वेंचुनि रमणींनीं । शिरीं घातलीं गुंफोनी ॥

कांहिं मुलांनीं कुस्करुनी । दलीं पूजली भूजननी ॥
कांहिं जाळिलीं । कांहिं भक्षिलीं । कांहिं फेंकिलीं ।
मजसम गेलीं कष्टतरा-। दुर्गंधीच्या माहेरा ॥ १५ ॥

ईशदत्त ही स्थिती गमे-। सुखद मला, मम चित्त रमे ॥
स्वर्गसुखाचें माधुर्य । इथे मिळे मज अविकार्य ॥
ही मम गंगा । पथत्रिभंगा । रम्य शुभांगा ।
सर्व सुखांची शुभंकरा-। उपचिति येथें मनोहरा ॥ १६ ॥

दुष्ट विषमता जगांतली । नांदे न गडे इथे मुळीं ॥
मत्सर कोणि न करावया । इथे शांतता अनसूया ॥
स्वानंदाचें साम्राज्य । येथें विलसे अविभाज्य ॥
हा पाषाण । हें सिंहासन । हाही भेद न ।
येथें शांति सुधासारा । लाधे मजला अविकारा! ॥ १७ ॥

तरुणीः-पूर्वी गायिलीं दुःखाचीं । गाणीं आतां सौख्याचीं ॥
गूढ तत्त्वमय बोल तुझे । कळती नच मज, चित्त बुझे! ॥
भ्रमवी मज तव । सुंदर अभिनव । हें वाक्पाटव ।
सोड हट्ट हा नसे बरा । चल सुमना चल जाउं घरा ॥ १८ ॥

फूलः-केवळ दुःखासाठीं गे! जगीं जन्मती जे सुभगे! ॥
दुःखांतचि त्यां सौख्य गमे । त्यांतचि त्यांचें चित्त रमे ॥
सौख्यें त्यांना । देति यातना । न हो कल्पना ।
याची कोणाप्रति इतरां । ज्याचें त्याला, न्याय खरा ॥ १९ ॥

कोमलहृदये! कशास हा । तूं तरि धरिसी हट्ट महा ॥
सदय जरी तूं खरोखरी । दे मज इतुकी भीक तरी ॥
इथेच हा जन । असो चिरंतन । शांतिसौख्यधन ।
सेवो विनवीं परात्परा । जाई बाई सुखें घरा! ॥ २० ॥

पुष्पवचातें अवगणुनी । लांबवि कर जों ती रमणी ॥
फूल घेउनी उचलोनी । प्रेमें न्याया निजसदनीं ॥

जळौव धांवत । फूं फूं गर्जत । आला वाहत ।
सुमना लोटित झराझरा । घेउनि गेला भूकुहरा! ॥ २१ ॥

---

## ११. दर्पण!

पद (चाल—अर्धतनू वारुळी बुडाली.........)

हिंडत असतां आनंदें मीं पिळित मिशा मंदिरीं ।
आरसा सहज घेतला करीं ॥ ध्रु० ॥
काळें दिसलें कांहिं लागलें न कळत गालावरी ।
विरमलों हास्य पळालें दुरी ॥
भिंग वाटुनी मळकट मजला फुंकर मुखिं घातिले ।
सर्वेचि स्वच्छ पुसुनि काढिलें ।
दर्पणीं समुत्कट निजमुख अवलोकिलें ।
कृष्णत्व कपोलीं पुनरपि परि पाहिलें ।
जाहलों बावरा दोष कुठे नाढळे ।
आणुनि पाणी कांच धुई ती लगबग मग सत्वरीं ।
पुन्हा मी पाहीं मुख भीतरीं ॥ १ ॥
आश्चर्यानें स्तिमित जाहलों तेंच पुन्हा पाहुनी ।
सुचेना काय करूं त्या क्षणीं ॥
'नसेल ना हें गालासचि या कांहिं लागलें तरी'।
उपजतां संशय हा अंतरीं ॥
ठेवुनी आरसा पाणी मीं घेतलें ।
चोळुनी मुखाला बहु नेटें पुशियलें ।
दर्पणीं पुन्हा मीं निजरूपा देखिलें ।
प्रमुदित झालों स्वच्छ वदन तें बघतां हृन्मंदिरीं ।
मिशा मी पुनरपि चढवीं वरी ॥ २ ॥
हाय! मानसा! असाच फससी रात्रंदिन दुर्बला ।
वाटतें कांहिं न त्याचें तुला ॥

दूषण देसी देव. दैवा दुसऱ्यांना दुर्मदा ! ।
स्वतांच्या दोषास्तव तूं सदा ॥
ही मना खरोखर नीती बरवी नसे ।
बा ! नीट विचारीं दोष कुणाचा असे ।
मग परांस निंदीं माझी ' ना ' त्या नसे ।
वृथा लावितां दोष दुजा ये दोषचि अपुल्यावरी ।
उधळिली धूळ जशी ये शिरीं ॥ ३ ॥

---

## १२. वसंतसत्कार.

पद ( चाल–सुरम्य मंदिर ... राग वसंत.)

वीरवराग्रणि वसंत आला । नरनारीगण प्रमुदित झाला ॥ ध्रु० ॥
मृदुमंथरगति गजेंद्र मारुत-। मलयज, ज्याचा झुलताचि चालत ।
सुयशोबिरुदावलि ललकारत । चाले बंदीजन पिकमाला ॥ १ ॥
पवनांदोलित आम्रमंजरी । ऋतुराजावरि जणुं ही चवरी ।
ही वनदेवी रम्य वनश्री । ढाळी करुनी अभिनव लीला ॥ २ ॥
गायकवर सद्वंशजात हे । स्ववेणुवादनिं तत्पर पाहें ।
ऋतुराजातें गायनमोहें । देती प्रतिपदिं नव तोषाला ॥ ३ ॥
ललितनृत्यपटु नर्तकगण हा । थय् थय् नाचे शिखिवृंद पहा ।
सांथ करित ही विहगतति महा । उत्कट करुनी जयघोषाला ॥ ४ ॥
' कुसुमाकर मी षड्ऋतुचक्रीं ' । बोधी विजया ऐसें चक्री ।
म्हणुनि गणुनि तद्विभूति अंतरीं । सत्कारूं या मधुमासाला ॥ ५ ॥

---

## १३. एक कोडें.

[ आषाढी अथवा कार्तिकी एकादशीला तुळशीबागेंत मोठी यात्रा भरते. तेथें नानातऱ्हेची मातीची चित्रें, लहान मुलांची खेळणी वगैरे जिन्नस विकावयाला येत असतात, हें पुष्कळांना माहित आहे. अशा एका एकादशीला मुलीनें मातीची

चित्रें घेण्याबद्दल आग्रह धरिला असतां तिचा व माझा झालेला संवाद खालील कवितेंत ग्रथित केला आहे. ]

( आर्या. )

' एकादशी म्हणोनी तुळशीबागेंत आज नेवोनी ।
भाऊ! मज मातीचें द्या हो! द्या चित्र छान घेवोनी ॥ १ ॥
' किति तरि चित्रें आलीं एकापेक्षांहि एक सुंदर तीं ।
वाटे बघत बसावें लावुनि निजदृष्टि सर्व त्यांवरतीं ॥ २ ॥
' ज्यांहीं कर्ण उभविले धरुनी एकेक पाय उचलोनी ।
घोडे ऐसे बघतां शर्यत जणुं सोडिली गमे कोणीं ॥ ३ ॥
' सरतां दिव्य परीक्षा गुरु शाळा जेविं सोडण्यापूर्वीं ।
शृंगारल्या मुलांना करिति उभे अश्व भासती तेवीं ॥४॥
' किंवा श्रीरामाची मोठी जी मिरवणूक निघणार ॥
तिजसाठीं हे वाटे असती कीं सज्ज करुनि शृंगार ॥ ५ ॥
' ज्या निजपुच्छें मोदें पाठीवरि घेउनी उभारोनी ।
धेती कानोसा जणुं टवकारुनि कान आपुले दोन्ही ॥ ६ ॥
' ज्यांहीं मागें किंचित् माना मुरडोनि दृष्टि वळवील्या ।
वाटे जणुं वत्सा कीं अवलोकाया समुत्सुका झाल्या ॥ ७ ॥
' खूर उचलिले ज्यांनीं इच्छुनि जणुं काय भूमि उकराया ।
ऐशा गाई कोण न होई सोत्कंठ भाउ ! पाहाया ? ॥ ८ ॥
' कुंच्या पांघरलेलीं बाळें किति छान छान रेखींव ।
मांडिलिं विकावयाला, होतो त्यां हृष्ट पाहतां जीव ॥ ९ ॥
' तैशीं रांगतिं बाळें केश जयांचे भुरूभुरू उडती ।
असती; बघतां वाटे घ्यावीं उचलोनियां कडेवर तीं ॥ १० ॥
' बाई मम आईशी आहे घुसळीत ताक चरवींत ।
बैसे बाळ जवळ तें मागे पसरोनि हात नवनीत ॥ ११ ॥
' आलें आहे तेथें भाऊ हो! एक चित्र किति नामी ।
आजवरीं कोठेंही केव्हांही पाहिलें न त्यासम मीं ॥ १२ ॥

'रडते बाई कोणी जवळ उभ्या असति राक्षसी दोन ।
मारुति झाडावरुनी निरखी बाईस दृष्टि लावून ॥ १३ ॥
'भाऊ! चित्र कशाचें आहे हें मजासि आज सांगोनी ।
या खेपेला मज द्या सुंदर नव चित्र तेंचि घेवोनी' ॥ १४ ॥
तेव्हां श्रीसीतेचें सारांशें म्यां पवित्र सुचरित्र ।
सांगुनि सर्वेचि वदलों, 'व्हावें तुज कासया असें चित्र? ॥ १५ ॥
'देतों पैसे तुजला मी न म्हणें नाहिं कीं पहा बाई! ।
मातीचीं चित्रें परि त्यांचीं बाळे! न तूं कधीं घेई ॥ १६ ॥
'मातीच्या चित्रांची फुटतां होणार शेवटीं माती ।
देशिल फेंकुनि सारे तुकडे तूं रडत आपुल्या हातीं ॥ १७ ॥
'घे चित्र साखरेचें घेशी जरि, कीं जरी उद्यां फुटलें ।
हांसत भक्षण केलें वायां कांहीं न त्यांतलें गेलें ॥ १८ ॥
'किंवा होइल त्याचा सुंदर पेला भरोनि एक चहा ।
घेऊं आपण दोघें देऊं कोणा न एक थेंब पहा! ॥ १९ ॥
'झालें ना? ठरलें ना? चल देतों चित्र गोड घेवोनी' ।
वदलों ऐसें हांसत बालामधुमृदुकपोल चुंबोनी ॥ २० ॥
हळुचि निवारुनि माझा कर तेव्हां बालिका वदे मज ती ।
'खावोनि साखरेचीं चित्रें होणार काय तरि पुढती?' ॥ २१ ॥

---

## १४. गुणाः पूजास्थानम् ।

[मुले म्हटलीं कीं आईबापांला सगळीं सारखींच प्रिय. क्वचित्प्रसंगीं आवड-नावड दिसून येते, पण ती बाह्यात्कारी. एका प्रसंगीं दोघी मुलींमध्यें 'बाबांची मी आवडती कीं तू आवडती?' अशाबद्दल वाद चालला होता. तेव्हां त्याची कारण-मीमांसा लावून बापानें त्यांचें खालीलप्रमाणें समाधान केलें.]

**अभंग.**

सुगंध मार्दव । रंगरूप कळा । हेंचि प्रिय बाळे! पुष्प नाहीं ॥ १ ॥
सोन्याचें सुंदर । पुष्प मनोहर । परी तें सादर । हुंगी कोण ॥ २ ॥

मोल माधुरीचें । साखरेचें नाहीं । गोडीविण पाहीं । रांगोळी ती ॥ ३ ॥
रांगोळी रवाळ । दिसते तेजाळ । परी का कवळ । घेई कोणी? ॥ ४ ॥
कर्णमनोहर । कोकिळेचे स्वर । तेचि प्रियकर । पक्षी नाहीं ॥ ५ ॥
वायस तो काळा । कोकिळही काळा । काकगानकळा । कोण सेवी?॥६॥
दया, प्रेम, शांति । गुण; रूप कांति । गुण मोहविती । कांति नाहीं ॥७॥
कोणाचाहि काय । हाचि अभिप्राय । तोषे देवराय । भावबळें ॥ ८ ॥
चामड्यांचीं कुडें । हाडांचे सांपळे । कोणाला न बाळे । आवडती ॥ ९ ॥
वस्तुबाह्यरूपें । फसती दुबळे । ज्ञानें जे आगळे । भुलती ना ॥ १० ॥
माझी आवडती । नाहीं म्हणूनी ती । तैसी नावडती । तूंहि नाहीं ॥ ११ ॥
पारि विलसती । गुण जे तदंगीं । तेणें अंतरंगीं । बैसली ती ॥ १२ ॥
भावाचा दुकाळ । गर्वाचा सुकाळ । अनंताचें बाळ । नावडतें ॥ १३ ॥

---

## १५. तर मग मी देवाची!

(आर्या.)

संपादुनी नियामकनियुक्त तो गुरु नियोग ये तरणी ।
मार्गश्रम वाराया द्रुतगति परतोनि आपुल्या सदनीं ॥ १ ॥
बघतां धवा प्रतीची आनंदें बावरे मनीं भारी ।
नवल न दयितागमनोत्सुक असती कीं पतिव्रता नारी ॥ २ ॥
फिराफिरुनि, मान उचलुनि, किंचित् तिर्यक् करोनियां दृष्टी ।
निरखुनि चिर रविवदना पावे ती नववधूसमा तुष्टी ॥ ३ ॥
वदनीं तेज झळाळे प्रणयाचा रक्तिमा जणूं दाटे ।
अरुणध्वज मदनाचा किंवा हा रोंविला मनीं वाटे ॥ ४ ॥
निजमंदिरीं रवीला येउनि जों एकही न घडि झाली ।
विधिनियत तोंचि जवळीं ये पातालप्रयाण त्या कालीं ॥ ५ ॥
सुखद प्रवास व्हावा होतां मार्गीं न कांहिंही बाधा ।
साक्षेपानें भास्कर चढवी पोषाख अंगिं तो साधा ॥ ६ ॥

दिव्यद्युतिरत्नांचीं आभरणें निजकरेंचि काढोनी ।
पावकदीपवनस्पति यांप्रति टाकी सहर्ष देवोनी ॥ ७ ॥
दयितानुमोदनाची अल्पहि बघतां न वाट तो जाय ।
जगदुपकृतिच्या पुढती स्वसुख श्रेष्ठांस कायसें होय? ॥ ८ ॥
जातां रवि प्रतीची कोपें हो लाल, मावळे शांति ।
होतां न मनाजोगें अबलांची कोप हीच विश्रांति ॥ ९ ॥
पश्चिमदिगङ्गनेचा झालेला विरस पाहतां नयनीं ।
आनंदली किती तरि मुग्धा प्राचीहि तेधवां स्वमनीं ॥ १० ॥
सापत्न्योद्भव हर्षें पसरे स्मित आसुरी तिचे वदनीं ।
तें द्रोहहेतु हर्षण खेळे चमके सुतीक्ष्णशा नयनीं ॥ ११ ॥
अनुसरुनि प्राचीतें अन्यहि त्या उत्तरादि दिग्युवती ।
हासति खदाखदा किति; सज्जचि सुजनोपहासिं ही जगती ॥ १२ ॥
आधीं पतिविरहार्ता त्यांत पुन्हा चिडवितां असें त्यांनीं ।
त्रासुनि संतापोनी बैसे ती निजमुखेंदु वळवोनी ॥ १३ ॥
होतां न तृप्त येणें बालेला अधिक त्या छळायास ।
करुनि तिचीच अनुकृति वळविति सर्व स्वकीय वदनांस ॥ १४ ॥
येणेंपरी तयांनीं फिरविलें जों आननें तदा अपुलीं ।
तिमिरीं सृष्टि बुडाली गगनीं सर्वत्र कृष्णता भरली ॥ १५ ॥
ये तोंचि हळुच हांसत इंदु प्राचीमुखा करें स्पर्शी ।
दचके प्रथम जरी ती बुडति उभय संगमोद्भवीं हर्षीं ॥ १६ ॥
प्राची सलज्ज झाली मृदुलकपोलीं गुलाब बहु फुलला ।
अधरीं विद्रुम, नयनीं पद्म, तसा रदनिं कुंदही खुलला ॥ १७ ॥
न बघावें इतरांहीं म्हणुनि शशी लांबवूनि कर अपुले ।
झांकी जों तल्लोचन नवलाचें अपर कार्य तैं घडलें! ॥ १८ ॥
एकचि गोंधळ झाला विधुचे जों लागले न कर त्यांस ।
हांसति तयासि साऱ्या करुनी बहुपरि विनोद परिहास ॥ १९ ॥

कौतुक तें नव बघुनी लोटे हांसू समग्र विश्वाला ।
वरमुनि, विधु मुख झांकुनि नीलांशुकिं, धावुनी वरी गेला! ॥२०॥
जों जों शशि नभ वेंघे तों तों घेरिति तयास उडुबाळें।
डोळे लुकलुक करिती, गरगर फिरती पळोनि लडिवाळें ॥ २१ ॥
समयीं गृहीं अशा मी आलों जों नियतभार सारोनी ।
जमुनी सर्व मुलें मम आलीं पुढती सहर्ष धांवोनी ॥ २२ ॥
'आले भाऊ आले' ऐसा एकचि करोनि कल्लोळ ।
घालिति विळखे चरणा तद्हृदिं मावे न हर्षकल्लोळ ॥ २३ ॥
हांसत हांसत तेव्हां घेई मी धाकट्यास उचलोनी ।
केली तृप्ति मनाची प्रेमें बहुवार त्यास चुंबोनी ॥ २४ ॥
झालों प्रमुदित हृदयीं क्षणिं विलया सर्व शीण तो गेला ।
शिशुचुंबन अमृतागद संसृतिसंतापजन्य आगेला ॥ २५ ॥
रविकर परि घूकांहीं क्लीबांहीं वीरपुरुषसंतानें ।
सज्जनवित्तें दुष्टें बघतां फुटतात साच तन्नयनें ॥ २६ ॥
सुभगा गर्भवतीला पाहुनि वंध्या मनांत जळफळते ।
मत्सर दाबाया परि वरिवरि सुतिनीपदासि धिक्कारिते ॥ २७ ॥
जेथें नक्षत्रासम बाळें प्रतिचंद्र तो गृहस्वामी ।
ज्योत्स्ना शीतल गृहिणी स्वर्गाहुनि काय त्या उणें धामीं ? ॥ २८ ॥
तारे नभा, लतेला सुमनें, नवकल्पनाहि काव्याला ।
कमलें सरोवराला, शोभा बाळें तशींच सदनाला ॥ २९ ॥
नसतां तोय तडागीं जैसें तें हीनशोभ बहु दिसतें ।
तेवीं अपत्यरत्नांविणही गृह दीन रंकसें गमतें ॥ ३० ॥
बसलों गेहप्राङ्गणिं बाळें मी सर्व घेउनी संगें ।
विसरुनि गुरुता, बालक होउनि, मी बालसंगतीं रंगें ॥ ३१ ॥
ओढी मिशा धरोनी, कोणी दोन्ही धरोनिया कान ।
बोले 'च्याऊं! म्याऊं! भाऊ! काशीस जाउं' हासून ॥ ३२ ॥

गोंडस हात चिमुकला कोंबुनि तोंडांत धाकुलें बाळ ।
घाली वरचेवर ती न कळे कोठोनि आणुनी डाळ! ॥ ३३ ॥
त्रासुनि धरितां रदनीं कर मी हांसोनि खाजवी रसना ।
कर सोडितां परी तें घाली उघडुनि पुनःपुन्हा वदना ॥ ३४ ॥
नासाग्रिं तर्जनी मीं धरुनी डोळे जसे वटारोनी ।
लटिकें दटावितां त्या अनुकृति करि थेठ ऐट आणोनी ॥ ३५ ॥
ठेवुनि हात चिमुकले पाठीवरि, वांकुनी म्हणे कोणी ।
'भाऊ! पुसा 'भटो,' मज 'आणियलें काय कोंकणांतोनी?' '॥३६॥
ठेवुनि वीतेवरतीं वीत वदे एक 'झाड काशाचें? ।
भाऊ! पुसा मला हें, आंबे तोडूं नका परी त्याचे!' ॥ ३७ ॥
दोघे पाठीवरतीं चढले मजला करोनिया घोडा ।
'इयां इयां' म्हणती, देती कोमल करिं चोपही न कीं थोडा ॥ ३८ ॥
रागावुनि बाला तैं एक वदे त्यांस 'रे! चला सोडा ।
व्हा दूर भाउ माझे! कसला त्यांचा करीतसां घोडा!' ॥ ३९ ॥
वदती तेव्हां ते तिज 'होई तूं तूंच दूर! भाऊंचीं– ।
आम्ही सारीं, भाऊ अमुचे, नाहींस तूं मुळीं त्यांची.' ॥ ४० ॥
रडवें गोरेंमोरें तोंड करोनी सुता पुसे मातें ।
'भाऊ! तुमची ना मी? सांगा कांहीं तुम्ही तरी यांतें' ॥ ४१ ॥
क्षणभर मौज कराया तदा नकारार्थिं मान हलवोनी ।
'नससी माझी तूं गे! मी न तुझा' बोलिलोंचि हांसोनी ॥ ४२ ॥
पाठिंबा हा माझा मिळतां शेफारुनी मुलें सारीं
चिडवुनि परोपरींनीं आणिति रडकुंडिला तिला भारी ॥ ४३ ॥
'काळी काळी दिससि, न अमुची तूं' एक बोललें हंसत ।
'चिपटीभर कोंड्याला दुष्काळीं घेतलें तुला विकत' ॥ ४४ ॥
माता जवळचि होती हंसत उभी परम कौतुकें तेथें ।
जाउनि धांवत पाही बाला जों तिज धरावया हातें ॥ ४५ ॥

'हूं हूं ! शिवूं नको मज ' माय वदे तों धरोनि पदिं सोगे ।
उसन्या आविर्भावें दापित सरली हळू हळू मागें ॥ ४६ ॥
मागें माय सरे जशि बालाही तिजकडे तशी धांवे ।
विनवी सर्वेचि ' तुझि ना ? आहें मी सांग सांग गे पावें ' ॥ ४७ ॥
अंतःस्मित दावुनियां माय वदे ती ' तुझी न मी आई ।
वेडी खुळीहि असली अमुची मुलगी असेल कशि बाई ! ॥ ४८ ॥
' देउनि चिपटीभर मीं कोंडा दुष्काळिं कातकरणीला ।
त्या तव आईपासुनि विकत तुला घेतलें जसा पाला ' ॥ ४९ ॥
तों तों यत्न करी बहु मातेला ती बळेंचि धरण्यातें ।
परि ती स्वमनोरंजनतत्पर माता शिवूं न दे तीतें ॥ ५० ॥
हिरमुसली बाला ती निश्चल निःशब्द दीन उभि राहे ।
गहिंवरुनि साश्रुनयनीं केंविलवाणी अम्हांकडे पाहे ॥ ५१ ॥
देति न उत्तर कोणी करिती उलटा विडंबपरिहास ।
पाहुनि हताश झाली विरघळुनी लागली रडायास ॥ ५२ ॥
लोळे गडबड भूवरि उठुनि बसे डौल आणि रुसव्याचा ।
फुगवुनि गाल चिमुकले करि चंबू ती सुरेख तोंडाचा ॥ ५३ ॥
बुझवण तिची कराया सानें भावंड तें तिचेजवळीं–।
जाउनि वात्सल्यानें कोमलकरपाशिं आपुल्या कवळी ॥ ५४ ॥
' ताई ! उगी ललूंको, बांधूं गे ! घल उन्हांत भाऊंचें ' ।
वदुनी पुनःपुनः तिज उठवी ओढूनियां तिचे ओंचे ॥ ५५ ॥
इतर मुलें चिडवाया पुसती तिज ' सांग सांग कोणाची-।
असशी ताई ! तरि तूं ? ' वदली ती ' मी ' हळूच ' देवाची ' ॥५६॥

---

## १६. माल तूं मला !

[ **प्रसंग**—दिवाळीच्या दिवसांत एका मित्राकडे गेलों असतां त्याचा धाकटा मुलगा एका हातांत मातीचा घोडा व दुसऱ्या हातांत तमांचा घेऊन खेळतांना आढळला. घटकाभर मौज करावयाकरितां म्हणून मीं तो तमांचा घेतला, त्यांत टिकली

बसविलीं व तो त्याच्या घोड्यावर झाडण्याचा आविर्भाव आणिला. त्या वेळीं जो प्रकार घडला त्याचें शब्दचित्र खालील कवितेत आहे.]

**पद** ( **चाल** – किती तरी पहाटेची वेळ...... )

**' नतो, नतो, घोड्याला मालुं नतो, माल तूं मला ' ॥ ध्रु० ॥**
**कवळुनि निजकरपाशीं । क्रीडाह्य हृदयाशीं ॥**
**धरित धरित रूपराशि–। बाळ बोलला ॥**
**बाष्पाकुल दीनवदन । भीतहरिणबालनयन ॥**
**तुहिनविद्ध कमल सान । तेविं शोभला ॥**
**हृदयांतरिं खोल खोल । शिरले ते करुण बोल ॥**
**करित दृष्टि लोलदोल । बुद्धि आकुला ॥**
**हृदयातें कंप सुटुनि । सद्विचारवायु उठुनि ॥**
**हर्षमेघ तेविं फुटुनि । झरर वळघला ॥**
**काय मना बालाची । स्थिति-उक्ति न तुज जाची ? ॥**
**नव गुरुचा लाभ ह्याचि । समज जाहला ॥**
**ज्यास तयें बघ म्हटलें । अभिमानें कीं ' अपुलें ' ॥**
**समयीं तें जरि नडलें । त्यजि न त्याजला ॥**
**निरख निरख आत्मकृति । करिं विवेक मूढमती ! ॥**
**काय वदूं हृदयिं अती । खंति ये मला ॥**
**' बंधु ' ' बंधु ' म्हणुनि ज्यासि । नित्य मिठ्या मारितोसि ॥**
**ऐन समयिं वंचितोसि । लाज ना तुला ॥**
**वदसि जिला प्रेमखनी । सुखसरिता प्रियकारिणी ॥**
**परि शिरतां चोर सदनिं । लोटिसी तिला ॥**
**वदसि जिला शशिवदना । मधुवचना मृगनयना ॥**
**निजवंशस्वाभरणा । सदनमंगला ! ॥**
**काव्यगानिं यद्विलास । प्रथम मधुर चुंबनास ॥**
**स्मरुनि करिसि रोदनास । वंचिसी तिला ॥**
**स्वर्गाहुनि जन्मभूसि । शब्द बातें वानितोसि ॥**

स्वार्थसमयिं पारि तिजसीं । निंदिसी खला ॥
अजुन तरी उमज उमज । स्वाभिमान परज परज ॥
बालवच्च स्मर सतेज । शिवद जें तुला ॥ १ ॥

---

## १७. पुथून ताकला !

(आर्या.)

श्रांतमनें जडपदिं मी आलों पाहुनि गृहास परतून ।
आलीं हांसत बाळें, चंद्रागमनीं चकोर धांवून ! ॥ १ ॥
कोणी मत्कर ओढी, कोणी धारि उत्तरीय वस्त्रातें ।
घाली गळां मिठी कुणि, कोणी कवळी सवेंचि चरणातें ! ॥ २ ॥
दिसतां न वत्सवृंदीं 'वनमाला' वत्सला सुता मज ती ।
मी जों पुसें न दारामागुनि 'हौगा' करीत ये पुढती ! ॥ ३ ॥
प्रेमभरें म्यां तेव्हां लगबग त्या बालिकेस उचलोनी ।
किति चुंबिलें परोपरि हर्षें तिज दृढ धरून भूजकोणीं ! ॥ ४ ॥
होतां न तृप्त येणें पूर्ण करुनि घ्यावयास इच्छा मीं, ।
'दे गोड गोड' वदलों 'पापा मज एक आणखी नामी' ॥ ५ ॥
'थांगा आदीं' वदली बाला, 'मद काय आनिला थाऊ,' ।
'द्या मद मग मी देत्यें पापा हा गोल इकलचा भाऊ !' ॥ ६ ॥
परि मी न हें परिसितां उभय तिचे गाल चुंबिले बहुत, ।
सोडुनि खालीं वदलों 'खाऊं देऊं उद्यां तुला' हंसत ! ॥ ७ ॥
झालें; निमित्त पुरलें; तुरुतुरु जाऊन कोंपरा गांठी ।
फुगले गाल चिमुकले पडलें क्षणभर कुलूपही ओठीं ! ॥ ८ ॥
बोले काय पुनरपी बाला ती मत्समीप येऊनी, ।
'हूं हूं भाऊ ! थाऊ देतां पापाच कालु कीं पुथुनी !' ॥ ९ ॥
'खाऊ न आज' वदतां बोले 'हा ताकिलाच पापा' ती ।
'पुथुनी,' काढि खरोखर निपटुनि तैं गाल चिमुकल्या हातीं ॥ १० ॥

'नाहिंच पुथला' 'पुथला' 'नाहिंच' 'पुथला' 'मुळींच गे नाहीं' ।
' पुथला अगदीं पुथला पुथला बल का न लाहिला कांहीं ! ' ॥११॥
न सरे ' नाहीं ' माझें, ' पुथला ' न सरे अखेर चिरडली ।
गेला प्रकार, आली बाला ती थकुनि फारचि रडीला ! ॥ १२ ॥
रागारागानें तें चुंबुनि मज रडत बालिका बोले, ।
" नाहीं पुथला तलि घ्या पापे हे पलत आपुले थाले !" ॥ १३ ॥

---

## १८. सुविचारविहंग.

पद (चाल-चंद्रकांत राजाची.)

नसें कवी मी; गौरवितां कां मजला मधुवचनीं ॥
व्याधाहूनहि महा नीच अति दुष्टबुद्धि असुनी ॥ ध्रु० ॥
धनलोभें तो वधी नराधम ' वाल्या ' बहु जीव ।
पारि मी माझीं वधीं अपत्यें करितां नच कींव ॥
एक सांगतों परी खरोखर इतरांचा घात ।
शब्दानेंही कधीं न केला नच व्हा भयभीत ॥
नका घाबरूं परिसा माझे चार शब्द कानीं ।
सारांशें मद्वृत्त सांगतों ध्यावें तें ध्यानीं ॥ १ ॥
देहपुरीच्या नागरिकांचें इच्छित पुरवाया ।
जीवात्म्यानें सचिव नेमिला अपुला मनराया ॥
श्रवणचंदजी नयनदासजी मुनिम दोन त्याचे ।
चौकस मोठे कार्यकुशल ते व्यापारी साचे ॥
स्वेच्छेनें ते विश्वाच्या या बाजारामधुनी ।
विविध वस्तुंना तत्परतेनें घेती कीं भरुनी ॥ २ ॥
श्रुतिनेत्रांच्या वेशीवाटे माल आंत नेती ।
पुरस्वामिनी मतिदेवीला सर्व दाखवीती ॥
साक्षेपानें आनंदें ती ठेवुनि तो घेते ।
चातुर्यानें तदा तयाची निवड गोड करिते ॥

हृदयनभश्चर विचारपक्षी रम्य वस्तु बघुनी ।
झडप घालुनी वरुनि तयावरि, घेती उचलोनी ॥ ३ ॥
देखत देखत घडतां असली परमहानि, हाय ! ।
कोणाला तरि वदा सरळ हो साहवेल काय ? ॥
ओढुनि वेगें रसनारज्जू मी मुख-चापाची ।
शब्दशरांची वृष्टि करोनी विहग वधीं साची ॥
मृतविहगांचीं कलेवरें तीं जीं हीं तुम्हि बघतां ।
केविं तयांचा निर्जीवांचा गौरव हा करितां ॥
कांहीं जाती उडुनि नभोंतरिं शररव परिसोनी ।
विगतवीर्य मी तयांहि करितों अन्य उपायांनीं ॥ ४ ॥
ओष्ठांचा या करुनि सांपळा वदनद्वाराशीं ।
लावितसें मी पळते पक्षी त्यांत धरायाशी ॥
विहग परी ते धूर्त महा हो ! येति न बाहेरी ।
श्वास कोंडुनी जाति मरोनी कोण तयां तारी ॥
अंतःसिंधू महा तळासी वरतीं हृद्गगन ।
स्थान न कोठें पद टेंकाया जाती बहु थकुन ॥
पटपट पडुनी पारावारीं गेले जे बुडुनी ।
दावायातें आणुनि मातें कोण क्षम भुवनीं ॥ ५ ॥
श्रीकृष्णानें मातेसाठीं मृत बंधू अपुले ।
आणुनि जैसे प्रेमानंदें तिजला भेटविले ॥
सुविचाराचे विहंग माझे तैसे आणोनी ।
दया करुनिया दुर्भाग्या या देतिल का कोणी ॥
लीन अनंतीं झाले ते कां परत फिरुनि येती ।
वेडया चित्ता ! सोड कल्पना फोल जाण बा ! ती ॥
एकांतीं तूं ध्यानीं त्यांच्या जाशिल रंगोनी ।
तईंच त्यांचें सुखकर दर्शन साध्य पुन्हा मानीं ॥ ६ ॥

---

# १९. किती तरी बाई ही लांबण !

[ **प्रसंग:**—एकदां मी सपरिवार जुन्नरास जात होतो. जुन्नर व नारायणगाव यांत अंतर ९ मैलांचे असून मध्ये गांवठाव कांहींच नाहीं! तो लांबीचा प्रवास विशेष कंटाळवाणा व त्रासदायक वाटल्यावरून पत्नीचे तोंडून वरील शब्द सहज निघाले ! याबद्दल विचार करीत असतां प्रस्तुत कविता तयार झाली. ]

**पद** ( **चाल**—अभाग्याचे घरीं बाबा ...... )

**अल्प असा हा प्रवास दयिते! तापवि काय तुला ।**
**नवल वाटतें चित्तीं मोठें खेद तेविं मजला ॥ ध्रु० ॥**
**जीवितरूपी प्रवास सखये! जो तूं आक्रमिला।**
**आजवरी गे! त्यांत तुला का शीण न वद झाला? ।**
**अशा प्रवासीं जीवपांथ हा काययष्टीला ।**
**धरुनी चाले आस खाद्य हें बांधुनि पाठीला ॥ १ ॥**
**प्राक्तननामें मार्गदर्शकासह हा बघ भार्ये? ।**
**विषयारण्यीं कसा भ्रमतसे हाय ! हाय! आर्ये ।**
**मोहतरूची त्यांत पसरली छाया घन जाये ।**
**तसें संचरे मायातम तें कांपवि दृष्टीला ॥ २ ॥**
**मनःशल हा अलंघ्य तेवीं चित्तवासनांच्या ।**
**संकल्पात्मक वैकल्पित गे गुंफा किति साच्या ।**
**लोभाच्याही गुहा केवढ्या सारिता तृष्णेच्या ।**
**फूं फूं करुनी कशा वाहती भिवविति चित्ताला ॥ ३ ॥**
**अज्ञानाची दलदल मत्सरपन्नगफूत्कार ।**
**अहंकार हा मतंगजापरि करितो चीत्कार ।**
**क्रोधकेसरी करी गर्जना भीषण अनिवार ।**
**कामाभिल्ल तो धनुटंकारें वेधी हृदयाला ॥ ४ ॥**
**जन्मापासुनि अशा प्रवासीं चालत तूं असशी ।**
**तरी गमोनी सान सुखदसा कांते! तो तुजसी ।**

प्रहराची ही वाट गमावी तापद काय अशी ।
'किति तारे बाई लांबण!' वदसी विचित्र तव लीला! ॥ ५ ॥

## २०. रसाल व तरुच्छेदक.

( चाल--भूपर्ती खरे ते वैभव.. ... )

रसालः—कां नरा घालिसी घाव असा या देहीं ।
अपकार तुला मीं गमतें केला नाहीं ॥ ध्रु० ॥
वाहतो कसा हा हात तुझा उचलाया ।
हा तीव्र परशु वद माझ्यावरतीं सखया ! ॥
मी मोहक सौरभराशी, नाहिं का ? ।
मी आश्रय सुरस फलांशी, नाहिं का ? ।
मी सौख्यद रवितप्तांशी, नाहिं का ? ।
करिं शांत मनानें विचार सखया कांहीं ।
ही नसे तुझी कृति काय अन्यथा पाहीं ? ॥ १ ॥
तोडितां दलें मम मंगल साधायातें ।
करितसां अमंगल संतत परि कीं मातें ॥
वाहतां शिवाला निज शिव व्हावें म्हणुनी ।
मंजिऱ्या मदीया अशिव मला हो ! करुनी ॥
परि नव्हां तृप्त इतुक्यानें, तुम्हि सुधी ।
खंडितां मला शस्त्रांनीं मधिमधीं ।
मारितां शिरीं दगडांनीं तुम्हि सुधी ।
सोसुनी सर्व हे सुखवीतों सुफलांहीं ।
परि कधिं न विंधितों कोणा कटु वचनांहीं ॥ २ ॥
परि आज राजसा ! प्रसंग जीवावरतीं--।
पातला, म्हणुनि हें वदलों तुजला सुमती ॥
लागतो ऊंस बहु मधुर म्हणोनि बा ! तो ?
वद कोणि तरी का समूळ सारा खातो ? ॥

हें नसे वेड का सांग, तूं मला ।
मम नको मानुं तूं राग, प्रेमला ! ।
तूं विचार करुनी वाग, निर्मला ! ।
बोधिलें बोल बहु बोलुनि बघ बा ! हृदयीं-।
ताडुनी तरी; तुज दूरदृष्टि का नाहीं ? ॥ ३ ॥

तरुच्छेदकः– तापसा ! तरुवरा ! ताता ! तव हे बोल ।
झोंबती अंतरा विंधुनि भेदुनि खोल ॥
या तात्त्विक गोष्टी सगळया मजला कळती ।
संक्षुब्ध भुकेनें वृत्ति परी नाकळती ॥
जळतसे ज्ञानकलिका ती, कोमला ।
मतिनीति लयाला जाती, सोज्ज्वला ।
धारणाशक्तिही होते निर्बला ।
जों डोंब भुकेचा पोटिं भडकतो पाहीं ।
मग नुरे कल्पना पापपुण्यही कांहीं ॥ ४ ॥

थैमान मुलांनीं घरीं भुकेनें केलें ।
खावया द्यावया पारि न तयांना उरलें ॥
वस्त्र ना तनूतें झांकायातें धड कीं ।
पाहतां कुणा ही दैना न भरे धडकी ? ॥
निंद्य हें कर्म म्हणुनी मी, करितसें ।
भार हा शिरीं दोषांचा, घेतसें ।
निरुपाय तरो ! मी झालों, करुं कसें ? ।
ना जळे जारि फिरें पोट दिशा मी दाही ।
तरि सख्या स्वभावें सत्य नीच मी नाहीं ॥ ५ ।

रसालः– हें साच जरी बा ! शीघ्र घाव तरि घालीं ।
तुज रुचेल तें तें माझें करिं या काळीं ॥
मी सिद्ध राजसा ! त्वदर्थ द्याया प्राण ।
मनिं धरीं न शंका घाव हाण कीं हाण ॥

भंगुरा तनू ही जाणें, कधिं जरी।
लावणें उक्त उपयोगा, तिज तरी।
हाच कीं श्रेष्ठ पुरुषार्थ, वैखरी।
विनवितों म्हणुनि कीं आटप रे! लवलाहीं।
ही मान लवविली तुझ्यापुढें मीं पाहीं॥ ६॥

---

## २१. प्रीति कीं भीति?

(चाल—उद्यां बघ जाते......)

प्रीति कीं भीति। वरुं कोणा पडली भ्रांती॥ ध्रु०॥
स्वयंमन्य या स्वकीय दुहिता। विवाहयोग्या यौवनभरिता॥
झाल्या ऐसें मन हें बघतां। विमोहित झालें। नीतिचें बंधन तुटलें!॥ १॥
प्रीतीसंगें परिणय ठरला। भीतीनें परि कर करिं धरिला॥
वदली, 'मीं हा स्वमनें वरिला। पाहतें यातें। कशि आतां प्रीती वरिते!'२
ओवाळुनि कर भीतीपुढती। सरसावुनिया वदली प्रीति॥
'भली राक्षसी दिससी कुमती। टाकिसी पाश। परि करील तव तो नाश'॥
मति देवी मग उभय मुलींना। जवळ घेउनी वदली त्यांना॥
'कलह न समुचित कुमारिकांना। असावें गोड। वाणीनें पुरती कोड!॥४॥
चातुर्यानें निज लीलांनीं। घ्यावें पुरुषां मोहित करुनी॥
धृष्टपणानें स्वकार्यहानी। होतसे जाणा। नच वाणी ही अवमाना' ॥ ५॥
प्रीती बोले 'माझा महिमा। अगम्य बाई आगमनिगमां॥
मम लीलांना नाहीं उपमा। जसे मी झोले। देतें, हें जग आंदोले!॥ ६॥
सुर नर किन्नर माझ्या मंत्रें। फिरती जैसी चाळविं सूत्रें।
मत्करिंचीं हीं केवळ यंत्रें। गौतमीमोहें। इंद्र न का शापा लाहे?॥ ७॥
नारद असुनी इतुका ज्ञाता। त्याला माझी व्याधी जडतां॥
स्वयें विनटला तदा योषिता। हौसही फिटली। साठ सुतां नारी व्याली! ८
उग्र तपस्वी सुत गाधीचा। अपर विधाता या जगतीचा॥
विषयिजनांपरि धांवे साचा। मेनकेपाठीं। मुनिरूपें स्वर्गा गांठी! ॥ ९॥

सीतेसाठीं मुनिविश्राम । रघुकुलदीपक मेघश्याम ॥
पूर्णब्रह्म जरि जितकाम । सैरावैरा । फिरला जणुं गरगर वारा ! ॥ १० ॥
धवल कौमुदी वसनाभरणीं । मधुमासाची नटली रजनी ॥
वञ्जुलकुंजीं यमुनापुलिनीं । रंगुनी गेला । मनमोहन मुरलीवाला ! ॥११॥
वेणुध्वनि तो पडतां श्रवणीं । तन्मय होउनि बल्लवरमणी ॥
धांवत सुटल्या वणवण विपिनीं । वेड्या झाल्या । हरिरूपीं रंगुनी गेल्या ! १२
मुरलीनादें तृष्णा हरली । शुद्ध बुद्धही सारी सरली ॥
वृत्तीमाजीं वृत्ति मुराली । परात्पर धाम । हृदयिं घुमे नादब्रह्म ! ॥ १३ ॥
अजड सृष्टिही राहो बाई ! । अचेतनेची नवलपराई ॥
शांत मनानें पाहुनि घेई । प्रीतिची माव । कशि नाचवि जग हें सर्व ! ॥१४॥
माधव येतो नटे वनश्री । अभिनव गिरिवर चुंबि नभःश्री ॥
रविकर कर्षति सागरलहरी । ललित ही चपला । पाझरवी सांद्र घनाला ' ! ॥
क्रोधावेशें भीती उसळे । वदे, ' मला तव ठावे चाळे ॥
नादें तव हें जग जारि हुरळे । ऐकतां नांव । माझी त्या कळते माव ! ॥१६॥
मी मी म्हणते जे रणशूर । धाकें माझ्या ते नरवीर ॥
हतबल होती जारि बहुधीर । सुटे आवांका । धैर्याची येते शंका ! ॥ १७ ॥
गरगर फिरते माझे नयन । तसें भयंकर मम हें वदन ॥
पाहुनि होइ न वश मज कोण ? । माझ्या ठायीं । जग सारें तन्मय होई ! १८
हिरण्यकशिपु प्रल्हादाला । वदे ' तुझा हरि दावीं मजला '।
' नरहरि ' ' नरहरि ' जपतां झाला । नरहरिरूप । पापकूप दानवभूप ! ॥१९॥
वसुदेवाचा अष्टम तनय । दावी कंसा संतत तो भय ॥
कोण तया मग देतो अभय ! । अशनीं पानीं । कृष्णाविण न दिसे कोणी ! २०
यमुनातीरीं तव गोपींची । झाली स्थिति जी तीच तयाची ॥
वद लीला ही तरि कोणाची ? । तुझी कीं माझी । साक्षी या व्यासगुरूजी २१
गगनकृष्ण हें भूतल कृष्ण । भुवनकृष्णही भार्या कृष्ण ॥
जिकडे तिकडे भरला कृष्ण । कंसपण गेलें । कृष्णरूप त्याला आलें ! ॥२२।

लंकापतिचें असेंचि झालें । रामरूप जग त्याला दिसलें ॥
'मीतूंपणही अवघें सरलें । पेटली होळी । कोण तनू मग सांभाळी? ॥ २३ ॥
संदेहाच्या गांठी सुटल्या । संकल्पाच्या उकळ्या मिटल्या ॥
मौनपणाच्या नाड्या तुटल्या । शब्द निमाले । तेजातें तेज मिळालें! ॥२४॥
कुंभारिण निज मृण्मयसदनीं । कीटक यत्नें ठेवी भरुनी ॥
दावी भय त्या धाकीं धरुनी । त्यास बेजार । करि टोंचुनि वारंवार! ॥ २५ ॥
'राक्षसीण ती कुंभारीण । आतां येउनि कैदासीण ॥
करील माझें दुर्धर छलन । टोंचुनी प्रबला । मज करिल अर्धामेला!' ॥२६॥
येणें कीटक तन्मय होई । कीटकपण तें विलया जाई ॥
कुंभारिण तो हो लवलाहीं । जातसे उडुनी । त्या मृण्मय गेहामधुनी! । २७
श्रेष्ठ न का वद माझा खेळ? । तव लीलेचा याशीं मेळ ॥
न बसे प्रीते! एकहि वेळ । अशी ही कांहीं । अद्भुत मम करणी पाहीं! ॥२८
पुरे अतां हा वादविवाद । मीं लग्नाचा त्यजिला नाद ॥
नको नको ती मजला ब्याद । सुखानें रंगें । या क्लीब मनाच्या संगें! ॥२९॥
कुमारिका मी अखंड आतां । राहुनि जगता दाविन सत्ता ॥
काधिं न कुणाच्या जाइन हाता । धिग्धिग् जीणें । परावलंबी लाजिरवाणें ३०
विवाह नच हा परि ही बेडी । अनुभव घेई संशय फेडीं ॥
नको विश्वसूं मी जड वेडी । आजि अविकार्य । होवो तव मंगल कार्य! ॥३१॥

---

## २२. कमी मेली!

(साक्या.)

मरणद्वारीं बालक बसलें जीव पाखडी माय, ।
मुळुमुळु रडुनी असवें गाळी थकतां सर्व उपाय ॥ १ ॥
जवळ शेगडी रसरसलेली सुंठ भाजुनी चोळी ।
काढी कोणी रस आल्याचा कोणि उगाळी गोळी ॥ २ ॥
वैद्य आणिला होता, होत्या जमल्या आयाबाया ।
कोणी कांहीं कोणी कांहीं कथिती औषध द्याया ॥ ३ ॥

आयुष्याची दोरि तुटली कोण तियेला सांधी ।
घनमालेचे मणि ओघळले कोण पुन्हा ती बांधी ॥ ४ ॥
कंठ घुरुघुरू वाजे अचके शेवटचेही आले ।
कैंची आई! कैंचे बाबा! शब्द मुखांत निमाले॥ ५ ॥
सुटल्या नाड्या, थिजले डोळे, अंगहि गार जहालें ।
श्वास न चाले सर्व अटपलें सूतहि नाकिं न हाले ॥ ६ ॥
जिकडे तिकडे उदासीनता कोणा कांहिं सुचेना ।
कुठेहि लपवा तोंड, बाळ तो डोळ्यांपुढुनि हलेना ॥ ७ ॥
दीर्घ उसासा सोडुनि आजी, बाळक मांडिवरून ।
ठेवी खालीं, 'गेला! झालें!' कष्टें फार वदून ॥ ८ ॥
शब्द न जों हे कानीं आले वेडी माय जहाली ।
फोडुनि दुःखें हंबरडा ती धूळ मस्तकीं घाली ॥ ९ ॥
उभय करांहीं पिटी मस्तका बडवी तैसें ऊर।
वदे ओरडे, 'कसा जाशि रे टाकुनि मजला दूर'! ॥ १० ॥
'हाय सोनुल्या कुठे जाशि रे! कुठे माणका जासी ।
कशी येउं रे! कुठे येउं मी तुजला पाहायासी'! ॥ ११ ॥
मुलें जाणतीं रडूं लागलीं बघतां रडतां माता ।
गोकुळ होतें सुंदर घर जें श्मशान झालें आतां ॥ १२ ॥
बहिण धाकुटी कमळी त्यांची केवळ अल्लड पोर ।
बालमृगीपरि फिरवि सभोंतीं डोळे काळेभोर ॥ १३ ॥
सर्वजणांना बघतां रडतां चुकूर चित्तीं झाली ।
धीर धरूनी हळूहळू ती दादापाशीं आली ॥ १४ ॥
हात चिमुकले गळां घालुनी वदे तयाला काय ।
'नको ललूं मी थाकर देऊं काय लागलें हाय ॥ १५ ॥
'आई कां ले! ललते ऐथी, पोट दाबुनी पाहीं ।
आदी का तिद बथे धलोनी, हिंग देत कां नाहीं? ॥ १६ ॥

'भाऊ कां पन ललतो दादा? माले कोनीं त्याला?।
भूक लागली तल मी देस्यें लालू माधा थाला ॥ १७ ॥
'कां ले! बोलत नाहिंथ अधुनी? दुखतें काय कपाल?।
तोलूं का मी? थांब थांब पन घेऊनि येतें बाल! ॥ १८ ॥
'हो पन दादा! गंगू म्हनते 'बाल आमतें मेलें'।
तंपी म्हनते 'मेलें नाहीं बाप्पानें तें नेलें'! ॥ १९ ॥
'बाल तांगलें निदलें आहे तेथें आदीपाछीं।
मेलें म्हंजे निदलें का ले! आनुं काय मी त्याछी'? ॥ २० ॥
वदे न दादा शब्द एकही पाहुनि ऐसें बाला।
मनीं हिंपुटी झाली गेली आइस सांगायाला! ॥ २१ ॥
एक गळां कर हळू घालुनी पदर धारित दुसऱ्यानें।
वदे तिला ती 'बाल उथल कीं, ललसी किति मोथ्यानें? ॥ २२ ॥
लागे भल्ले होय तुला का बाबा? त्यांथ घलांत।
येउं न दें मी!' वदतां मिळलें बक्षिस एक मुखांत! ॥ २३ ॥
न वदे कोणी शब्द एकही कुणी न कांहीं सांगे।
पाहुनि ऐसें निजे बालिका फुंदत दादामागें ॥ २४ ॥
मृत बालाच्या शवसंस्कारानंतर किंचित् कालें।
जरा स्वस्थता होतां चवकशि जीवंतांची चाले! ॥ २५ ॥
भानावरतीं येतां माता 'कोठें कमळी गेली?'।
जों न विचारी, वदे बालिका हंसत "कमी गे मेली" ॥ २६ ॥

---

## २३. दुष्काळांतील मायलेंक.

(चाल—चंद्रकांत राजाची कन्या.)

मृदु अंकीं या बालक माझें मरणोन्मुख पडलें।
माया कैसी येइ न कोणा निष्ठुर जग झालें ॥ ध्रु० ॥
खाती सगळीं आनंदानें मी परि उपवासी।
अन्नाविण हें बाळ तडफडे दया न कवणासी ॥

ज्या नेत्रीं मीं प्रेमें काजळ घालुनि दिनरजनीं ।
चपल ठेविली दृष्टि तयांची गेले ते थिजुनी ? ॥
गेंद गुलाबी गाल मनोरम निशिदिनिं चुंबूनी ।
व्यथित मना या प्रसन्न केलें गेले ते बसुनी ॥
माखुनि तेलें चरणिं न्हाणिली प्रेमें तनु ज्याची ।
तन्मृदुलांगीं कशी पसरली छाया मरणाची ? ॥
बोल बोबडे वदुनि मजपुढें मजला रंजविलें ।
हास्यवदन तें एकाएकीं म्लान कसें झालें ? ॥
'विठ्ठल' म्हणतां टाळया पिटुनी मज आनंदविलें ।
कोमल कर ते आजी प्रभुजी ! निःसत्त्वचि पडले ॥
चुंबूं कवणा, कुणा बाहुं मी, कैसे दिन आले ।
माया कैसी येइ न कोणा निष्ठुर जग झालें ! ॥ १ ॥

परदेशीं ही दुबळी बाळा ! भणंग तव जननी ।
टाकुनि कैसा जासी सखया ! तिजला बालपणीं ? ॥
स्तनयुग्मीं या फुटल्या सुटल्या धारा बघ बाळा ! ।
मुख लावीं या कैसा आला तुजला कंटाळा ! ॥
मोक्षदेशिचें केणें भरुनी जासी कैलासीं ।
नको टाकुं मज इथे एकटी योग्य काय तुजसी ? ॥
जनकास्तव तव नेत्र जेधवां रडुनी सुजवियले ।
'पहा मजकडे' वदुनी ऐसें मज तूं शांतविलें ॥
आतां कोणाकडे बघूं मी वद वद घाबरल्यें ।
काय पाप मीं केलें न कळे संकट ओढवलें ॥
द्या बायांनो ! पाणी कोणी डोळे ही मिटले ।
माया कैशी येइ न कोणा निष्ठुर जग झालें ! ॥ २ ॥

किंचित् उघडुनि नेत्र तेधवां बाळ असें बोले ।
"नको जननि गे ! शोक करूं तूं दुर्दिन तव सरले ॥

जाउनी पुढतीं विनविन हारिला सुखि तुज करण्यासी ।
ये मागोनि शांत मनानें राहूं प्रभुपाशीं ॥
विनवी प्रभुला कांस धरोनी बळकट धैर्याची ।
नको भाकुं तूं करुणा माते! प्रभुविण अन्याची ॥
जातों मी तुज पोट एक गे पाहिं कमी झालें ।
तितुकी चिंता गेली तव तीं वाइट नच घडलें " ॥

* * *

बोलुनि इतुकें कंठीं त्याच्या घर घर तैं झालें ।
हाय ! हाय! ते शेवटचे त्या अचकेही आले ॥

* * *

पुत्रसुखा मी सर्वस्वीं कीं प्रभुजी ! आंचवल्यें ।
माया कैशी तुजहि न आली ? निष्ठुर मन झालें! ॥ ३ ॥

---

## २४. लके पैथे लके अंबे.

### साक्या.

रविवाराचा दिवस सुटीचा बाळां आनंदाचा ।
खेळायाचा उधळायाचा मौजा मारायाचा ॥ १ ॥
वडीलधारीं थोर माणसें घरीं न कोणि बघून ।
मुलामुलींनीं खेळ मांडिला एक्या ठायिं मिळून ॥ २ ॥
बाजाराचा खेळ योजिला पूर्व सिद्धता झाली ।
दाणागोटा कुणीं आणिला कुणी फळांची डाली ॥ ३ ॥
वाळू आणुनि लहानमोठी निवडुनि काळीगोरी ।
भरुनि बोळकीं करिति विकाया सिद्ध बाजरी ज्वारी ॥ ४ ॥
बारिक बारिक शंख पांढरे तांदुळ जिरवेलीचे ।
गारा कांदे खडे बटाटे प्रकार हे गमतीचे ॥ ५ ॥
तुळशीमधली माती आणुनि भुकी चहाची केली ।
रवाळ खाशी रांगोळीही साखर नामी नेली ॥ ६ ॥

कधीं हिरवीं रांठ उंबरें केळे अंजिर त्यांचे ।
कडुनिंबाच्या निंबोळयांचे आंबे गोड रसाचे ॥ ७ ॥
लिंबार्धें साक्षेपें सोलुनि तराजु केली त्यांची ।
चिंचोके बहु असतां संग्रहिं वाण काय पैशाची? ॥ ८ ॥
बाजाराची अशी तयारी सर्वपरी होतांच ।
झाले कोणी वाणी, कोणी गिऱ्हाईकही साच ॥ ९ ॥
दुकानदारी वसुल कराया मय्या छोटा झाला ।
तिरपी टोपी कानावरतीं सोटा हातीं आला ॥ १० ॥
खेळ चढे जैं भर रंगाला आलों परत घराला ।
मोठीं बाळें सर्व पळालीं रंगीं भंग जहाला! ॥ ११ ॥
खाशी संधी अशी लाधतां वेगें ती साधाया ।
सान बालकें सरसावुनियां सजलीं सर्व लुटाया ॥ १२ ॥
सर्वचि होउनि फेरीवालीं निघती माल विकाया ।
कोणी म्हणती दहींदूध घ्या कोणी भाजी घ्या या ॥ १३ ॥
एक बालिका निंबोळयांची शिरीं घेउनी पांटी ।
'आंबे घ्या हो! आंबे घ्या हो!' वदत फिरे त्या हाटीं ॥ १४ ॥
थांबवुनी तिज वदलों, 'दे मज आंबे पैशाचे कीं' ।
तिनें पसरतां कर त्यामधिं मीं चिमुट सोडिली लटकी ॥ १५ ॥
पळ न लावितां पोकळ ओंजळ ओतुनि माझे हातीं ।
'लक्के पैथे लक्के आंबे' वदली मज बाला ती ॥ १६ ॥
प्रसन्नवदनें जाय बालिका टाळया पिटित घरांत ।
खजील झालों मनीं विरमलों ठेलों थक्क पहात ॥ १७ ॥

---

# तरंग ४ था.

## १. *पतंगाचे बोल.

(वसंततिलका)

देवें पतंग चढला नाभिं उंच भारी ।
जेथें विहंगहि कदा नच घे भरारी ॥
प्रौढी स्वकीय मिरवोनि, मनांत डोले ।
गर्वे बघोनि तळिं काय पंतग बोले ॥ १ ॥
'प्रेमें कसे मजकडे जन हे पहाती ।
उड्डाण हें बघुनि विस्मित फार होती ॥
जातां घनानिकट मी मग काय यांना ।
वाटेल सत्य न कळे मज पाहतांना ॥ २ ॥
कैसें करूं जरिहि होइन मी स्वतंत्र ।
भेदोनि जाइन नभा सहजीं सुयंत्र ॥
देवा ! अहा ! मज कसें परतंत्र केलें ।
कैसे उपाय मम सर्व निरर्थ झाले ॥ ३ ॥
दोरा पहा मज कसा तळिं ओढतो हा ।
जाऊं न दे मज वरी करूं काय? हा! हा! ॥
मातें मुळीं न सहवे परतंत्रता ही ।
वाटे बरा निरय तो जरि ओखटा ही ' ॥ ४ ॥
दावावया स्वबळ तें मग तो पतंग ।
दोऱ्यास देइ हिसके हसडोनि अंग ॥
ऐसे करोनि मग ते सदुपाय नाना ।
तोडोनि रज्जु सुटला बहु दीनवाणा ! ॥ ५ ॥

---

* Paper Kite नामक एका इंग्रजी चुटक्याचे भाषांतर.

केले प्रयत्न बहु तैं गगनीं रिघाया ।
गेले परंतु सगळे तदुपाय वायां ॥
एकाकि आश्रय तदीय सुटोनि गेला ।
खालीं भराभर पळांत पतंग आला ॥ ६ ॥
होतां अशक्य निजभार सहावयातें ।
नेला महीतळिं तसा बहु दूर वातें ॥
गेले विचार जिरुनी मनिं बापुड्याचे ।
मिथ्याभिमान असणें नच योग्य साचें ॥ ७ ॥
हे मूढ ! पंख नसती तुजला पतंग ! ।
जाशील रज्जुविण केविं नभांत सांग? ॥
वाटे पतंगसम हा मम जीव देवा ! ।
प्रत्यक्ष हा करितसेचि तुझ्यासि हेवा ! ॥ ८ ॥
हा ! हा ! प्रभो ! विसरलों त्वदनुग्रहाला ।
नाहीं कधीं मनिं तुझा सुविचार केला ! ॥
रे ! मद्धितास्तव तुवां पथ काढिला जो ।
उल्लंघिला सतत त्यां मम चित्त लाजो ! ॥ ९ ॥
मिथ्याभिमान मनिं मीं धरिला सदा हो ।
अन्य स्थिती तशि मिळो मनिं इच्छिलें हो ॥
साहाय्यही तव कधीं न अपेक्षिलें हो ।
तेणें विपत्ति सहतों बहु मी अतां हो ॥ १० ॥

---

## २. सतार!*

(उपजाति.)

छेडीतसें मी समयीं प्रिये! या । सतार जी ही तुज रंजवाया ॥
ती पूर्वजन्मीं जलदेवता गे! । होती असें कीं वदती शुभांगे! ॥ १ ॥

---

* Sir Thomas Moore च्या एका चुटक्याचें भाषांतर.

तिनें समुद्रीं दिवसा बसोनी । स्वजीवितेशास सदा स्मरोनी ॥
मोदानुरागें मधुर स्वनांनीं । गावीत कांते! बहु गोड गाणीं ॥ २ ॥
रात्रीं तिनें त्या विमलोदकांत । सदा फिरावें रमणा पहात ॥
देखोनि तीरीं जलपूर्ण दृष्टी । व्हावें मनीं तो दिसतां न कष्टी ॥ ३ ॥
केलें वृथा प्रेम गमे तिनें कीं । त्याच्यावरी त्यांत नसोनि नेकी ॥
दुःखांत त्यानें तिज लोटियेलें । रडावयातें बहु लावियेलें ॥ ४ ॥
त्यातें तिनें अक्षय आठवावें । उच्च स्वरानें सखये! रडावें ॥
कपाळही भूवरि आपटावें । क्षणोक्षणीं मूर्छित गे पडावें! ॥ ५ ॥
अंतीं दृढप्रेम तिचें बघून । दयार्द्र झालें प्रभुचित्त तूर्ण ॥
केलें तयें त्या जलदेवतेला । सतार, ही काय अगाध लीला! ॥ ६ ॥
ऐसें तिचें तें पहिलें स्वरूप । जावोनि ये हें जरि काष्ठरूप ॥
गालीं तिच्या गे तरि तोचि राग । दिसे तसेंही मन सानुराग ॥ ७ ॥
स्कंधीं तिच्या गे सखये! प्रकीर्ण । जे केश होते मृदु हेमवर्ण ॥
सुतंतु झाले बघ ते सुयंत्र । ते जाणती मोहक गानमंत्र ॥ ८ ॥
गे! त्या दिसापासुनि आजवेरीं । सतार माझी दयिते! बिचारी ॥
सप्रेमशब्दीं विरहाकुला ती । विलापवाणी मिसळीत होती ॥ ९ ॥
मिश्रस्वनाचे परि त्याच बाले! । त्वां आजि हे दोन विभाग केले ॥
तैसें सतारीसहि शिक्षणास । दिलें, विशाला तव बुद्धि खास! ॥ १० ॥
कीं जोंवरी मी तव संनिधानीं । तिनें करावी अनुरागवाणी ॥
जातां परी मी बहु दूरदेशीं । तिनें करावें विरहस्वनाशीं ॥ ११ ॥

---

## ३. शरदिन्दु.*

पद ( चाल—आनंदी आनंद गडे...... )

रजनिरंजन राकेन्दु । गगनीं उदित कुमुदबंधु ॥ ध्रु० ॥
सुखद सुगंधित शीतलशी । अमृतवृष्टि हा करी शशी ॥
विगतताप वसुधा विमला । मुक्तपाप करि हृदयाला ॥

---

* या कवितेत 'राकेंदु' नामक एका हिंदी कवितेचा अनुवाद आहे.

निष्काम निर्मल नील नभ । शोभे सुंदर सरोनिभ ॥
कुमुदतारका । चारुचंद्रिका । मनोमोहिका ।
शीत स्वादु सुधासिंधु । राजहंस हा शरदिन्दु ॥ १ ॥

चंद्र न हा पारि मज गमतें । मदनछत्र सुंदर दिसतें ॥
पीयूषाचें पात्र नवें । प्रत्यूषा-बजिचि बरवें ॥
सृष्टिसुंदरीरूपाचा । आदर्शीच कीं शांतीचा ॥
दिगङ्गनांचा । हा खेळाचा । कंदुक साचा ।
अथवा प्राचीकर्कंधू-।-फल मानूं हा शरदिन्दु ॥ २ ॥

न कौमुदी हा शांतिरस । गळे नभांतुनि कीं सुरस ॥
इंदुगिरींतुनि सुरगंगा । वर्षतसे ही धवलांगा ॥
कीं मानूं हा विस्तार । ईशदयेचा सुखसार ॥
जे हर्षाचे । सुरेश्वराचे । गळती साचे ।
झरझर लोचनजलबिंदु । संचे त्यांचा हा सिंधु ॥ ३ ॥

रघुकुलदीप श्रीराम । गमे इंदु मज अभिराम ॥
तशी कौमुदी ही माता । श्रीसीता मिथिलेशसुता ॥
मंगळतारा प्रणयाचा । सतीसुमित्रासुत साचा ॥
भक्तिरसाचा । सोज्वलतेचा । बृहस्पतीचा ।
तारा दावि भरत बंधु । शत्रुघ्न हि भृगु धृतिसिंधु ॥ ४ ॥

द्रुपदसुताप्रिय पार्थाला । कृष्ण करी ज्या बोधाला ॥
विभूतियोगीं गीतेंत । कथितों अंशें तो येथ ॥
"नक्षत्रीं मी ग्रहराज । विलसें जो विधु सुखभाज ॥
वैभवशाली । प्रभावमाली । तेजें नटली ।
जी जी वस्तु अंशभूत । आहे ती मम जगतांत" ॥
शारदशोभा अभिरामा । वृत्ति पाहतां गतकामा ॥
नयनचपलता स्थिर झाली । दृष्टि सृष्टिशीं समरसली ॥
किरणजाळें लोचनमीन । धरि हा जालिक हिमकिरण ॥
अनुपम शांति मना मिळली । तनु तशी शीतल झाली ॥

अंगीं शक्ति नवी भरली । चिंता ही विलया गेली ॥
हृदयाचें नव । जें प्रेमोद्भव । फुललें अभिनव ।
सुम तें अर्पुनि जनबंधु । पूजितसें हा शरदिन्दु ॥ ६ ॥

---

## ४. राधाजीवन.*

पद ( चाल--भूपती खरे तें... ... )

**विषयसूत्रः**—भक्तमणिमालामेरु राधेस हिणविण्याकारितां तिच्या एका सखीनें तिला, 'काय ग ! तुला आज तो कृष्ण कुठे दिसला का ?' असें विचारिल्यावरून ती सखीस सांगते:—

सांपडे जिवींचा जिवलग जीवचि माझा ।
जो असे सखे या ब्रह्मांडांचा राजा ॥ ध्रु० ॥
गे खुळे ! कुठे तो कुठे म्हणुनि का पुससी ।
तव वेड काय हें काय वदूं गे तुजसी ? ॥
शोधिलीं मंदिरें गोकुलवृंदावनिंचीं ।
जीं मनुजकृतीच्या सीमा सर्वस्वाची ॥
परि तेथें नव्हता माझा पंचप्राण ।
सांगतें साच मी याच गळयाची आण ॥
नृपतिचे सुखप्रासाद, शोधिले ।
मंदिरें तेविं धनिकांचीं, हिंडल्यें ।
उपवनीं तसें मीं भारी, पाहिलें ।
मीं त्रिखंड केलें, केला गाजावाजा ।
तोम् तननननन हा केला सखये ! बाजा ! ॥ १ ॥
परि नीलनभींच्या दिव्य तारकांमाजीं ।
मज दिसे मूर्ति ती बिंबित झाली आजी ॥

---

* Mary Correly च्या 'Seek and ye shall find Him.' या चुटक्याचा ध्वनि या कवितेत आहे.

बघ तसें सखे या यमुनापुलिनावरतीं ।
   प्रतिसिकताकणिं मज दिसे तयाची मूर्ती ॥
या लतानिकुंजीं वसंतवंजुलकुंजीं ।
   या रसाल तरुच्या मंजुमंजरीगुंजीं ॥
      दलिंदलीं दिसे ती मूर्ती, बिंबली ।
      सुमिंसुमीं कशी तरि पाहीं, रंगली ।
      प्रतिरेणुमाजिं ही तैसी, रंजली ।
या श्यामल रात्रीं श्यामनभीं हा श्याम ।
   ही श्यामल यमुना श्याम जलीं विश्राम! ॥ २ ॥
पसरली मंजुला मधुरा मुरली वाणी ।
   मोहिनी मोहनीं घाली जी मोहूनी ॥
परि नव्हे नव्हे ती मुनिच्या वेदाध्ययनीं ।
   ती नव्हे नृपाच्या नीतिविवादामधुनी ॥
ती नव्हे स्वार्थपर गायकगानीं बाई! ।
   ती नव्हे तुझ्या या नूपुरशब्दाभिनयीं ॥
      वायुनें किसलय जेथें, हालती ।
      झुळुझुळू जलध्वनि जेथें, चालती ।
      कोकिला पंचमीं जेथें, कूजती ।
करि जिथे तसा अलि मंजुल मंजुल गुंजा ।
   त्या नादब्रह्मीं प्राण घुमे हा माझा ॥ ३ ॥
भासला जाहला स्पर्श सुखाचा मजला ।
   जो हर्षें करि तनु पुलकित दोलविलोला ॥
परि कुठे सांगत्यें न तो विलासस्थानीं ।
   तो नसे सुखाच्या राशी ज्याच्या भवनीं ॥
तो नसे जगाच्या आनंदोल्हासांत ।
   तो नसे मदोत्कट सुराभक्त गेहांत ॥
      परि जिथे आपदाजन्या, यातना ।

की जिथे तीव्र दुःखांच्या, वदना ।
कोसळे रडूं अंगोनी, कामना ।
बघ सखे ! तिथे तो प्राणविसांवा माझा ।
रंजल्या गांजल्या दीनां जो अधिराजा ॥ ४ ॥

लाधला तयाच्या प्रेमसुखाचा लाहो ।
जो संतत सखये ! असाचि वाटे राहो ॥
परि नव्हे तदा गे ! 'राधा ! राधा !' म्हणुनी ।
मज आर्जविलें हो मधुमधुरस्मित वचनीं ॥
जे दिनीं परी गे ! संशय मम घेवोनी ।
गांजिलें पतीनें मला धारकीं धरुनी ॥
बैसतां दूर एकांतीं, जाउनी ।
हतभगा बोट दुःखानें, लावुनी ।
रंगुनी तयाच्या प्रेमें, चिंतनीं ।
दाटुनी उसळला प्रेमांभोधी माझा ।
भेटला जिवींचा जिवलग माझा राजा ॥ ५ ॥

पाहिला गडे गे ! रूपसुधेचा सिंधु ।
जो भुलवी डुलवी नयनचकोरा इंदु ॥
कोंदला हृदीं जणुं जळिं तैलाचा बिंदु ।
कीं गमे मनोहर मनःकुमुदवनबंधु ॥
तो नसेचि केवळ दृश्य एक गे मातें ।
जो भरोनि उरला अवघ्या ब्रह्मांडातें ॥
संकटें नवनवीं येती, प्रतिदिनीं ।
तीं परी हितास्तव सारीं, साजणी ।
त्यांमधेंच दिसुनी नेमें, येउनी ।
तो धरी हृदयिं जो स्वजना राजा माझा ।
धावणीं धावतो दीन जनांच्या काजा ॥ ६ ॥

सांपडे रूपडें, आतां हृदयापाशीं ।
ठेवीन बांधुनी ऐसें दृढ भुजपाशीं ॥
लपवीन तयाला आंत आंत हृदयांत ।
नच कधींच लागे जिथे कुणाचा हात ॥
मजमधें संचरे वारें आनंदाचें ।
हें अवचित आजी अमोघ उत्साहाचें ॥
तुजपरी सपत्नी आल्या, किति जरी ।
खवळुनी असह्यावेशें, मजवरी ।
धावुनी प्राण हा न्याया, रिपुपरी ।
हारि ही कधिं न ये राधा पुरतें समजा ।
जों भाक्किरणीं तो उभा पाठिशीं माझ्या ॥ ७ ॥

## ५. *माझें फूल कुस्करलें !

साक्या.

जों न घेतली उडी रवीनें पश्चिमजलधीमाजीं ।
पूर्वसागरीं अवचित काढी वदन कोण हें आजी ? ॥ १ ॥
दिनमणि का हा आला पुनरपि उलट बुडी घेवोनी ।
सुरेंद्रभुवनीं पाजळिला का रत्नदीप हा कोणीं ? ॥ २ ॥
कां प्राचीचें कुंकुम दिसतें रम्य वर्तुलाकार ? ।
इंद्राणीचा पडे काय कीं कंठमणी साचार ? ॥ ३ ॥
निजरमणींसह खेळत असतां नभःप्रांगणीं नाकीं ? ।
देवेंद्रानें दिला झुगारुनि सुरत्नकंदुक हा कीं ? ॥ ४ ॥
पडे विहरतां मुक्तामणिमय अलाबु कां हें त्याचें ।
नभःसरीं का फुले रम्य हें पद्म सहस्रदलाचें ? ॥ ५ ॥
नील दुशाला स्वांगीं घेउनि निजली स्त्री मदनाची ।
सुरत्नमुक्ताखचित असे का गिरदि तिची ही साची ? ॥ ६ ॥

* Cowper कवीच्या ' Rose ' या कवितेचें प्रतिबिंब या कवितेंत आहे.

हंसवाहिनी सरस्वतीचा राजहंस हा ोहे।
गगनमानसीं; कीं रंभेचा सुधाकुंभ हा आहे? ॥ ७ ॥
नीलजवनिका मृदुल करीं कीं सारुनि रजनीकांत।
प्रसन्नदर्शनिं तप्त जगाला आणी शांति नितांत? ॥ ८ ॥
हृदयमनोहर नयनोत्सवकर नवनव नक्षत्रांहीं
नभ शोभे, हें बघतां चित्त न होई तृप्त कदाही ॥ ९ ॥
प्रवालकीटकनिर्मित किंवा सान थोरलीं .बेटें ।
गगनसमुद्रीं तरंगती हीं मन्मानिं ऐसें वाटे ॥ १० ॥
अथवा दीपस्तंभ उभविले संकटदर्शी का हे? ।
त्रास न व्हाया सुरनौकांना फिरतां ऐसें लाहें ॥ ११ ॥
कां जलकेली नभःस्थलीं या कारितां मातंगांचीं ।
हीं मदघूर्णित रक्तलोचनें चमचम करिती साचीं? ॥ १२ ॥
अमरपुरीच्या राजवीथिका विद्युद्रथ फिरवोनी।
दढतर करितां स्फुलिंग उडले दिसती ते का गगनीं? ॥ १३ ॥
कां हीं आर्यें नाट्याचार्यें मंगल परमात्म्यानें ।
नाट्यारंभीं रागें उधळलीं सुमनें आनंदानें? ॥ १४ ॥
कमलकोरकें जलीं विहरतां तोडुनि सुरललनांहीं ।
अन्योन्यांवर मुदें फेकिलीं तरंगती तीं का हीं? ॥ १५ ॥
कीं दैत्यांनीं अमरेंद्राचें मंदिर उध्वस्तोनी ।
लुटोनि रत्नें नेतां पडलीं त्यांतिल कांहिं गळोनी? ॥ १६ ॥
किंवा त्यांनीं दीर्घद्वेषें नंदनवन नाशोनी ।
कल्पतरूचीं पुष्पें हीं का टाकिलिं चुरगाळोनी ॥ १७ ॥
गगनींची ही अपूर्व शोभा कोणी प्रेमल माता ।
निजबाळांला दावित होती प्रेमें गातां गातां ॥ १८ ॥
एक विचारी निजमातेसी 'काय चंद्र हा खातो? ।
जातो कोठें? पळतो कां गे? नीज न का तो घेतो? ॥ १९ ॥

आई रागें भरेल म्हणुनी कां तो ऐसा धांवे ? ।
परी देव तो कशास त्यानें इतुकें तिजला भ्यावें ?' ॥ २० ॥
तदा तान्हुलें बालक बोले ' भूत लादली आई ! ।
चांदाला त्या, आम नतो मद थोला त्याला देई ' ॥ २१ ॥
ज्येष्ठ कन्यका तिची तदा त्या आनंदाच्या कालीं ।
स्फुंदस्फुंदत डोळे चोळित जडपदिं हळु हळु आली ॥ २२ ॥
वीची उठुनी तांडव करितां सागर उसळे जैसा ।
फुटुनि उमाळे तिचा प्रस्फुरे अंतःसिंधू तैसा ॥ २३ ॥
हात गळाले, अधरहि कांपे, मुखाब्ज झालें म्लान ।
तनू विगलिता कदलीपरि ती गळली स्कंधीं मान ॥ २४ ॥
हिमकालीं ती तुहिनपीडिता दिसते नलिनी जैशी ।
दुःखक्लिन्ना मधुगात्रा ती दिसे बालिका तैशी ! ॥ २५ ॥
पाहुनि तिजला रडतां ऐशी कळवळुनी ती माय ।
हृदयीं धरुनी प्रेमें कवळुनि पुसे जाहलें काय ? ॥ २६ ॥
' कोण बोललें, कुणीं मारिलें, कोणीं केलें काय ? ।
सांग सांग गे ! नको रडूं तूं पदर चिंब हा होय !' ॥ २७ ॥
रडत रडत ती वदे बालिका, ' देल्यानें त्या माझें ।
कुस्करुनी गे ! कसें टाकिलें फूल पहा हें ताजें ॥ २८ ॥
वेणीमध्यें घालायाला खुडुनी हें हौसेनें ।
तुझ्याकडे मी येतचि होत्यें घेउनि आनंदानें ॥ २९ ॥
अवचित येउनि तों दादानें घेउनि तें हिसकोनी ।
करुनि पांकळया वरी मारिलें मलाच रागावोनी ' ॥ ३० ॥
वदे तेधवां माय तिला ती, ' इतुक्यास्तव का गंगे !
इतुकें व्हावें तुला रडाया ? नवलचि वाटे मज गे ! ' ॥ ३१ ॥
मृदुल मनोहर अभिनव सुंदर एक पुष्प घेवोनी ।
खिन्नवदन ये बंधु तिचा तैं धांवत तिजमागोनी ॥ ३२ ॥

हृदय कालवे, शल्य सले जणुं, थर थर कांपे ओठ ।
लवे जीभ परि शब्द न उमटे होय सगद्गद कंठ ! ॥ ३३ ॥
तसाचि कष्टें वदला, 'घे हें फूल आपुलें ताई ! ।
शब्दबाण परि तुवां मारिला खोल शिरे तो हृदयीं !' ॥ ३४ ॥
बोलुनि ऐसें बाल तेधवां दूर उभा तो राहे ।
एकसारखा तिच्याकडे परि दुःखक्षोभें पाहे ॥ ३५ ॥
हसली रिझली प्रथमदर्शनीं फूल पहातां चित्तीं ।
परि बंधूची मुद्रा बघतां होई ओशाळी ती ॥ ३६ ॥
जवळ घेउनी बालेला त्या पुसे तेधवां माता ।
' मिळलें ना तव फूल तुला हें कष्टी कां गे आतां? ॥ ३७ ॥
तूंही कां रे ! खिन्न असा हा तंटा झाला गेला ।
दिलेंस ना तूं फूल तिचें तिज, आतां कां रागेला ?' ॥ ३८ ॥
वदे बाल तो ' फूल मोडिलें म्हणुनी मी अन्यायी ।
परि ही वदली निष्ठुर जें मज विसरुं कसें तें आई !' ॥ ३९ ॥
वात्सल्यें तैं उभय मुलांना जवळ घेउनी माय ।
वदे मुलीला, ' तुझाचि मज गे ! दिसतो बहु अन्याय ॥ ४० ॥
देवें दिधली सुंदर वाणी थोर कृपा ही त्याची ।
तिनें न ऐशीं दुखवावीं गे! हृदयें कधिं दुसऱ्यांचीं ॥ ४१ ॥
जा बाळांनो! शांत मनानें क्षणभर खेळा आतां ।
गोड गोड मग खाऊ देइन येणें सदनीं होतां ' ॥ ४२ ॥
हाय! हाय! किति दुसरीं सुमनें याहुनि नामी नामी ।
नकळत कैशीं चुरुन टाकितों अविचारानें आम्ही! ॥ ४३ ॥
दुःश्वासांनीं, दुःशब्दांनीं, दुष्कृतिनीं बहुसाळ ।
मनःसुमें किति मनुजांचीं हो! चुरडूं सांजसकाळ! ॥ ४४ ॥
मदांध निर्घृण मनास अमुच्या कशी कल्पना त्याची ।
व्हावी? हा! हा! मतंगजाला काय दया कमलांची! ॥ ४५ ॥

गेलें सुम तें मिळेल दुसरें, मनःसुमन जें गेलें ।
पुन्हा न येई जवळ कदाही गेलें! अक्षय गेलें! ॥ ४६ ॥

---

## ६. दुर्दिन![*]

पद ( चाल–अर्ध तनू वारुळीं बुडाली...... )

भर दिवसा अंधार किती हा गूढ गूढ हें गडे! ।
दिसेना कांहिंच मार्गे पुढें ॥ ध्रु० ॥
थंडी पडली कोण भयंकर कुडुकुडु रदनावली--।
करी कीं तार जिवा चालली ॥
वारा वाहे भण भण भारी तशांत पाउस झडे ।
कुणाचा शब्द न कानीं पडे ॥
या नम्र पुरातन आम्रतरूच्या गळीं ।
गुळवेल कशी ही पहा घट्ट बिलगली ।
पटपटा पडे पारि पुराण पत्रावली ।
भीषण वायुप्रतिलहरीला नवी चमत्कृति घडे ।
कुठे कीं सृष्टिसौम्यता दडे ॥ १ ॥
अपुलें जीवित असेंचि सखये! भयाण चोहींकडे ।
सुखाचें नांव न आम्हां गडे ॥
तमोनृपाचे सुभे असूं कीं वरुणाचेही तसे ।
अखंडित वृष्टि गृहीं होतसे ॥
अविरत वाहे वायु सर्वदा कोण आडवी तया ।
तयाची फार अम्हांवरि दया ॥
ही विचारमाला गतकाळाच्या गळीं ।
अद्यापि कशी गे! घट्ट पहा बिलगली ।
पारि तारुण्यांतिल आशा पत्रावली ।

---

* लॉंगफेलोच्या "Rainy day" या चुटक्याचा अनुवाद या पद्यांत आहे.

हळुहळु गळुनी विलीन होते सारी मार्गे पुढें ।
　　सदोदित हृदय परी धडधडे ॥ २ ॥
उदास होसी कशास दयिते! शांत होई मानसीं ।
　　नको गे व्यर्थ झुरूं तूं अशी ॥
तूं न एकली अभागिनी या अनंत विश्वोदरीं ।
　　किति तरी जीव पहा तुजपरी ॥
याच घनांच्या पलीकडे गे ! अजूनि निलांबरीं ।
　　प्रकाशे रवि जो तम संहरी ॥
　　ओहटी लागली दिसली जरि सागरीं ।
　　भरतिही चढतसे त्याच क्षणिं गे! तरी ।
　　वर्तते अशिच ही सखदुःखांची झरी ।
चेंडू रबरी भूवारिं पडतां उंशी घेउनी उडे ।
　　पतन हें उदयबीज रोकडें ॥ ३ ॥

---

## ७. एका* आसन्नमरण पक्ष्याचे उद्गार !

पद ( चाल--हरिची भगिनी म्हणे... )

वायुपरी मी पूर्वी होतों स्वैरविहारी स्वच्छंदी ।
वनीं नभीं कीं मंदिरसौधीं कुठे न होती मज बंदी ॥ ध्रु० ॥
मृदुल मनोहर मधुमधु सुंदर थबथब ज्यांतुनि सुरस गळे ।
डाळिंबीचीं सिताफळीचीं सदा भक्षिलीं रम्य फळें ॥
मेघमुक्त मधु मुक्ताप्रभ जे तुहिनबिंदु तें जळ प्यावें ।
खावें प्यावें सुखें फिरावें याहुनि अन्य न मज ठावें ॥
तरुताताच्या अंकावरतीं स्वस्थ यथारुचि पहुडावें ।
वनवेलींच्या मणिबंधीं कीं गुलगुल बोलत बैसावें ॥

---

* Cowper कवीच्या 'On a gold finch starved to death in his cage' या कवितेची अस्पष्ट छाया या कवितेंत आहे.

ऐन दुपारीं किंवा यांच्या हिंदोळ्यावरि बैसोनी ।
मुक्तकंठ मीं गंधर्वांसम गोड गोड गावीं गाणीं ॥
आकृति माझी काय वानुं रे ! डोळेभरु ही खरोखरी ।
रम्य पिसारा अनुपम माझा गोड असा मी सर्वपरी ॥
वनदेवींचा वनवेलींचा एकनिष्ठ मी भक्त भला ।
अपुल्यापरि मज केलें त्यांहीं, ताइत त्यांच्या गळयांतला ॥
दुःखाचें मज नांव न ठावें सदा असें मी आनंदी ।
वनीं नभीं कीं मंदिरसौधीं कुठे न होती मज बंदी ॥ १ ॥
आनंदाचें परम सुखाचें निधान होतों असा जरी ।
तरी न होती ठावी मजला महती त्याची खरी खरी ॥
कटुतेविण ना कळे माधुरी, विरहावांचुनि सहवास ।
जठरतृप्तिची काय कल्पना? जरी न घडला उपवास ॥
श्रीमंतीचें कौतुक कैचें? जरि न पाहिली विपन्नता ।
पारतंत्र्य दे जाणिव करुनी काय वस्तु ती स्वतंत्रता ॥
बोधायातें हें मज किंवा सृष्टिविषमता दावाया ।
आनंदाच्या शशिबिंबावरि दुर्भगभूर्चा ये छाया ॥
वृक्षस्कंधीं सेवित असतां ऊन कोंवळें सोनेरी ।
एकाएकीं अनपेक्षित मी सहज सांपडे तुझ्या करीं ॥
पारतंत्र्य, छे ! स्वातंत्र्याचें रूपांतर हें भलें बुरें ।
मानवलें मज बरें वाटलें कधीं कधीं मन जरी झुरे ॥
पुढें पुढें परि हेंही गेलें पूर्वस्मृतिही नच झाली ।
संवय शोभते बहीण सख्खी स्वभावास ही अशी भली ! ॥
कष्ट न करितां नियमित काळीं ऐता लोंदा मुखीं पडे ।
वाण न होती मला कशाची वाइट माझें काय घडे ? ॥
तुवां उबेचे पिंजऱ्याभोंती पडदे लावुनि परोपरी ।
लागाया नच थंडी मजला कष्ट घेतले किती तरी ॥

इळूच, न कळत, मऊ रेशमी फांस, साधुनी तूं संधी- ।
कंठी म्हणुनी कंठीं माझ्या घालुनि केली मज बंदी ।। २ ।।

प्रसंग पाहुनि गोड बोलुनी सैल दिखाऊ सरफांस ।
हांसत हांसत गोंजारित मज वट्ट कराया सजलास ।।
लाड कशाचे, कौतुक कैंचें, परिहास न हा उपहास-।
माझा केला उभा करोनी मायेचा नव आभास ।।
सांजसकाळीं वेळिंअवेळीं बळेंचि डिंवचुनि बोटांनीं।
शीळ घालुनी म्हणसी मजला गा गा गा सुंदर गाणीं ।।
चित्तीं नसतां रती रतिभरी, गाणें कैसें म्यां गावें ।
तृप्ति न होतां तव चित्ताची मजला त्वां मग अपटावें ।।
मला शिकविलें जें तें किंवा रुचेल तुज तें बोलावें ।
काढशील तूं त्यावांचोनी बाहेर न मीं मुखिं यावें ! ।।
तोचि पिसारा, तीच गोजिरी तनू, सूरही जरि तेच ।
अमूर्त चित्तीं पालट पडला तें न राहिलें परि तेंच ! ।।
गेलें गेलें चित्त उडालें जीव लागला झुरणीस ।
त्यांतचि मजला दों दिवसांचा पडे असा हा उपवास ! ।।
गोळा कंठीं प्राण जहाले त्राण न उरला मज अगदीं ।
पाणि फुकाचें तेंहि न दिधलें भला तूं हि रे ! स्वच्छंदी ! ।। ३ ।।

दुर्दैवाच्या तीव्र पावकें स्वर्गसुखाचा गोड झरा ।
अटला सारा एकाएकीं भोग ओढवे असा पुरा ।।
यक्षिणिची जणुं कांडी फिरली क्षणांत सर्वचि पालटलें ।
सर्व सुखांची होळी झाली रडूं कपाळीं या बसलें ।।
आनंदाच्या शैलावरुनी कडेलोट तूं हा केला।
मृत्यूवांचुनि कोण धावतो आतां माझ्या हांकेला ? ।।
दुःखाच्या या दरींत दुर्धर खळा ! दडपिलें त्वां मजला ।
अग्नीवरतीं मृदुल सुमांचा गुच्छ तुवां रे ! टाकियला ! ।।

शेवटची मी हृदय-विदारक एक फोडुनी किंकाळी ।
देत उसासे तनुपंजर हा त्यजीं पंजरीं मृतिकाळीं ॥
नको धडपडूं, नको नको तो घालूं वदनीं या कवळ ।
नको नको बा! जल पाजूं तें सुधा जरी ही हो गरळ ॥
सान जीव हा त्वरें उडे बघ जुमानितां नच तव बंदी ।
नको नको बा! नको वांचवूं सेवाया ही दुर्गंधी! ॥ ४ ॥
एकपरी परि भला मजवरी केला त्वां हा उपकार :
इहदुःखांचा शेवट झाला सर्व संपला व्यवहार ॥
शेवट झाला गोड खरोखर किती हितावह परिणामीं ।
कृपा निरुपमा तुझी म्हणोनी वास मिळे हा स्वर्धामीं ॥
कोणी निर्दय म्हणोत तुजला गणोत कोणी निर्दयता ।
सदय परी तूं मला वाटसी निर्दयता तव वत्सलता ॥
अपकृति करितां उपकृति घडली भूषण झालें तुज साजे ।
अपकृतिमाजीं उपकृतिचें बघ सुंदर कैसें बीज रुजे! ॥
खाया प्याया नच देण्याची जरी न घडती अशी दया ।
कारागृहिं, छे! स्वर्णपंजरीं भागचि होतें बसावया ॥
वाईटांतुनि कधीं चांगलें होतें म्हणती निष्पक्ष ।
उदाहरण हें ठळक तयाचें अनुभव आला मज पूर्ण ॥
दयारसाचा प्रेमळतेचा कसा न म्हणुं तुज अंभोधी ।
कृपा करूनी घरीं जावया दिधली मज तूं ही संधी! ॥ ५ ॥

---

## ८. शांतिनिधान.*

( फटका. )

निधान केवळ आनंदाचें मन माझें मज राज्य असे ।
ऐहिक विभवाहुनी श्रेष्ठ तें सौख्य त्यामधें मज गवसे ॥

---

*. 'Contentment' या इंग्रजी चुटक्याचें रूपांतर.

जग जें उपजवि मनुष्य पिकवी सुख तें सारें मला घरीं ।
बसल्या जागीं कष्ट न करितां प्राप्त होतसे परोपरी ॥
जें बहु मनुजांपाशीं असे । तें सारें मज हवें असे ॥
तरि मज मागूं देत नसे । मन्मन मानी असें असे ॥
संतोषाच्या आधारावरि सदा स्वस्थ मी असा असें ॥ १ ॥

आवश्यक जें अधिक त्याहुनी कांहिंच मजला नको असे ।
जुलमी सत्ता मला कुणाची सहन निखालस होत नसे ॥
ज्याची ज्याची उणीव सहसा मजला कांहीं पडत असे ।
तें तें सारें सहजासहजीं मन माझें मज पुरवितसे ॥
तुच्छ जया मन लेखितसे । मुळींच तें मज रुचत नसे ॥
जितुकें मन्मन आणितसे । तृप्त त्यांत मी सदा असें ॥
राजापरि मी सकलांवरतीं विजय असा हा मिळवितसें ॥ २ ॥

हृष्ट वरी परि मनिं हिरमुष्टी जनता बहुधा मला दिसे ।
बाह्यात्कारीं जरि कष्टी मी तरी अंतरीं तसा नसें ॥
उंचावरतीं जन जे कोणी काल पाहिले मीं बसले ।
दुर्दैवानें ते सारे परि आजि पाहतों तळिं आले ॥
तडफड धडपड करोनियां । संतत चिंता वाहुनियां ॥
घरीं आणिती मिळवुनियां । आय, न पुरवे तरी व्यया ॥
चिंतेचे हे गुंते कधिंही सहावया मन सिद्ध नसे ॥ ३ ॥

घडो कितीही हानि परांची मला न येई कधीं हंसें ।
परांस घडतां लाभ तसाही कुरकुर माझी मुळीं नसे ॥
कशीहि उसळो लाट जगाची तुच्छ न तिज मी मानितसें ।
ज्यानें व्हावें दुःख परांना तें मी हांसत साहितसें ॥
कशाहि शत्रुस भीत नसें । कुणीहि जन मज तुच्छ नसे ॥
मी नच विश्वाऽमित्र असें । परि मी विश्वामित्र असें ॥
मृत्यूसहि मी भीक न घालीं क्षितीच त्याची मला नसे ॥ ४ ॥

कितीहि संग्रहिं कित्येकांच्या वाण न त्यांची तरी सरे ।
अल्प कितीही जरि मजपाशीं मला होइ तें पुरे पुरे ॥
हपापलेले सदा सर्वदा दीन भिकारी जे असती ॥
अल्पतुष्ट मी धनिक खरोखर अपूर्व माझी श्रीमंती ॥
दीन मनेंही ते असती । धनिक खरा मी परि जगतीं ।
सदा उताणा कर त्यांचा । परी पालथा मम साचा ॥
उणीव त्यांना, कधीं नसे मज; ते झुरती, मी सुखी वसें ॥ ५ ॥
इच्छाशक्ती वश मज माझी मला कशाची आस नसे ।
गरजेहूनी अधिकास्तव मी कधींच भटकत फिरत नसें ॥
प्रशांत जीवन मला आवडे गिरिशिखरीं मी चढत नसें ।
भवार्णवींच्या घोर वादळीं जात नसें मी तटीं बसें ॥
जें न चिरंतन त्याकरितां । विविधपरींनीं ही जनता ॥
वृथा पाहुनी श्रम करितां । पुरे वाट हो मज हंसतां ॥
माझें मजला बरें दिसे हें, कारण मजला वाटतसे-।
शांत मनासम मुळींच दुसरें धन श्रेष्ठ या जगीं नसे ॥ ६ ॥

---

## ९. अंगाई.*

(चाल—बाळा जो जो रे.)

अंमळ अंगाई । घननीळा । करुं चल आपण बाळा! ।
कोमल बाहुयुगीं । गोपाळा । मार मिठी वेल्हाळा! ॥ ध्रु० ॥
मानेवरि मान । ठेविं अशी । कीं या गालासरशी-- ।
येउनि गाल तुझा । हृषिकेशी । मिळेल पापा मजसी ॥
कीं त्या आनंदीं । रंगोनी । जाऊं निद्राभुवनीं ।
जेथें दुःखाचें । कधिं कानीं । नांव न रथांगपाणी ॥

---

* Ella Wheeler Wilcox नामक कवयित्रीच्या Beautiful Land of Nod या कवितेचा अनुवाद.

एकचि रस जेथें । आनंद । नांदे ब्रह्मानंद ।
सेवूं स्वच्छंद । गोविंद । मधुकर जेविं मरंद ॥
या इहलोकींचा । निमिष तरी । विसर पडेल मुरारी ।
जेथ यशोदेची । भीति हरी । पीडा अपणा न करी ॥
तैसा अनयाचा । प्रेमाचा । केवळ विषयसुखाचा- ।
तो बघ ससेमिरा । पाठीचा । सुटेल माझ्या साचा ॥
जाऊं चल वेगें । हाकारूं । अपुलें अद्भुत तारूं ।
सोडूं अवजारें । वल्हि मारूं । निद्राभुवनीं उतरूं ॥
मीट तरी डोळे । कलिकाळा । भुवनैकप्रतिपाळा! ।
अंमळ अंगाई । घननीळा । करुं चल आपण बाळा ॥ १ ॥
ब्रह्मानंदाचा । ओनामा । हाचि असे विश्रामा ।
घेऊं चल पाठ । गुणधामा । माझ्या आत्मारामा ॥
तेथें तूं गुरुजी । हो माझा । जीवाचा या राजा ।
प्रेमाच्या काजा । अधोक्षजा । नलगे गाजावाजा ॥
पडलें काय तुला । हें कोडें । कीं हे आढेवेढे ।
उगीच मजसाठीं । सांग गडे । घेसी लाडें लाडें ॥
परि ही तव करणी । जिवघेणी । रडवी मजलागोनी ।
जिवलग शशिसाठीं । कैरविणी । रडते जेविं निदानीं ॥
स्फुंदन गायन तें । अभिरामा । माझ्या मेघश्यामा ।
रुचतें काय तुला । विश्रामा । वद वद पावननामा ॥
फोडुनि तुंबारा । बंधारा । हृदयाचा गाभारा ।
वर्षति जलधारा । सुखसारा । बघ बघ या सुकुमारा! ॥
हृदयाचीं दारें । सर्व खुलीं । अपाप पाहीं झालीं ।
अश्रूंचा दोर । धरुनि तळीं । उतरूं चल वनमाळी ॥
मंजुळ या नादीं । वेल्हाळा । सोडुनि अवघा चाळा ।
अंमळ अंगाई । घननीळा । करुं ये आपण बाळा ॥ २ ॥

---

## १०. सरिद्गायन.*

पद (चाल- बघुनि त्या भयंकर भूता ... ... )

"लघुरूपें कंदरकुहरीं निर्जन या गहनीं विपिनीं ।
बहु दूर वसें मी जरि त्या गर्जत्या निधीपासूनी ॥
तरि वाटे येई त्याचें स्फुंदन हें माझे कानीं ।
वाहतो गमे तो मातें ताररवें आक्रंदोनी ॥
हृदय हें जणूं कीं भासे वाहतें सागरा तैसें ।
'मं मं मा' ध्वनि काढोनी मातेस बाल तें जैसें ॥
आस हीच चित्तीं वागे तज्जलीं आजि पहुडोनी ।
भुजवलयीं निद्रा घ्यावी हृदयावरि शिर ठेवोनी ॥ १ ॥
"झांकुनी कान हे दोन्ही जरि घेत्यें डोळे मिटुनी ।
गंभीर गर्जना त्याची तरि येई ऐकूं कानीं ॥
क्रोधराशि लहरी त्याच्या धावुनी पूर्ण खवळोनी ।
आदळतां वप्रप्रांतीं दिसती त्या मजलागोनी ॥
धवलित हा फेस तयाचा शोभतो मुकुट रजताचा ।
चक्राकृति विहरे गगनीं संघ हा मुदा क्रौंचांचा ॥
मंद मंद सुखकर वाहे मारुत मधु मंथरगतिंनीं ।
नृत्य या तयासह करिती दिसती मज नौकारमणी" ॥ २ ॥

❀ ❀ ❀

परिसिलें न जों हें ऐसें सरितेचें मंजुळ गाणें ।
तळमळूं जीव हा लागे चित्तेंही त्यजिलें ठाणें ॥
हृदयातें भरतें आलें, बाष्पपूर वाहे नयनीं ।
प्रस्फुरे अधरही तैसा गहिंवरें कंठ दाटोनी ॥
उत्कंठित मन होवोनी प्रेमाब्धिकृष्णसंस्मरणीं ।
जाहलें लीन रंगोनी रसनाही रमली गानीं ॥

* Ella Wheeler Wilcox नामक कवयित्रीच्या 'When' या चुटक्याचे रूपांतर.

कधिं करुणासिंधो! बंधो! दर्शन बा निज देवोनी ।
करिशील दीन दासाला वद रे! वद धन्य निदानीं ॥ ३ ॥
चपलचित्तचकोरा माझ्या चारुचंद्र तूं बा! असती ।
कधिंच तें तुजकडे गेलें मधरसुधा प्राशायासी ॥
जीर्ण हें सदन मी त्यजुनी कधिं येइन तुझिया भवनीं ।
मृदु तुझ्या हृदयपर्यंकीं सुखशयन आपुलें करुनी–॥
कल्याणी सुखदा भद्रा घेईन शांत मी निद्रा ।
श्रीकृष्णा मोहकमुद्रा! हे मधुरा प्रेमसमुद्रा! ॥
परि विनति, न बुडवीं मजला वाटे कीं सखया! स्वमनीं-।
शर्करा न होतां स्वांगें सेवावी मोदें हंसुनी ॥ ४ ॥

---

## ११. वर्षागम.

( तुलसीरामायणावरून.)

आर्या.

संतागम स्वसदनीं पाहुनि डोले सहर्ष साधु जसा ।
सजलघनागम गगनीं बघतां नाचे सुखें मयूर तसा ॥ १ ॥
खलहृद्गगनोत्थित ती प्रीति क्षणजीविनी सदा जैशी ।
चंचल चपला चमकुनि पावे निमिषीं विराम ही तैशी ॥ २ ॥
दुर्जनदुरुत्तरें तीं शांत मनें सोशितात संत जसे ।
धारा पर्जन्याच्या भेदक तरि साहतात शैल तसे ॥ ३ ॥
किंचिद्धनागमानें दुर्जन होती मदांध ते जैसे ।
येतां पूर जराही ओढे प्रोद्दाम धांवती तैसे ॥ ४ ॥
मायामोहविमोहित जीव जसा मलिन पूर्ण भासतसे ।
निर्मल पर्जन्योदक पडतां भूवरि दिसे गढूळ तसें ॥ ५ ॥
सुगुण क्रमाक्रमानें संपादुनि सुजन होति पूर्ण जसे ।
हळुहळु मेळवुनी जळ होती जलपूर्ण हे तडाग तसे ॥ ६ ॥

पाखंडशब्दवादी होती सद्ग्रंथही निरर्थ जसे ।
होउनि भूमि तृणावृत गेले झांकूनि सर्व मार्ग तसे ॥ ७ ॥
सन्मार्गसाधकांच्या येती सुविचार मानसीं जैसे ।
फुटले प्रावृट्काळीं नूतन पल्लव तरूस हे तैसे ॥ ८ ॥
संपत्ति शोभवीते परोपकृतितत्परां नरां जैशी ।
आलीं पिकें म्हणोनी शोभे प्रियदर्शना मही तैशी ॥ ९ ॥
कामादिकां विकारां निवटी सुविचारवंत साधु जसा ।
कुंदा, हरळि, तृणेंही काढी क्षेत्रांमधून कृषिक तसा ॥ १० ॥

---

## १२. *अम्ही सात आहों !

दिंड्या.

पोर अल्लड कांहीं न जिला ठावें । दिसे ओठांतुनि दूध जिच्या धांवे ॥
चपळ भारी जणुं बालमृगी भावे । काय मृत्यूचें ज्ञान तिज असावें ? ॥१॥
आठ वर्षांची एक यवनकन्या । मार्गीं भेटे मज खेळतां सुधन्या ।
शिरीं होते मृदु कृष्ण कुरळ केश । निचळपण तें ठावें न तिला लेश !॥२॥
जरी मुद्रा साधीच पाणिदार । वस्त्र अंगीं साधें, न मलिन फार ।
दृष्टि मोहक रमणीय फार होती । मुग्ध सौंदर्यें लोभवी मला ती ! ॥ ३ ॥
'भाउबहिणी तव मिळुनि गडे! तुम्ही। किती आहां?' तिज पुसें तेधवां मी ॥
'किती आम्ही हो? सकल मिळुनि सात'। वदुनि ठेली साश्चर्य मज पहात ॥
'कुठे असती तीं सांग बये! मातें'। 'सात आम्ही हो' वदे बालिका ते ॥
'दोन सोलापुरिं असति विणायाला । दोन दर्यावर नाव हकायाला ॥ ५ ॥
एक माझी हो बहिण एक भाऊ । असति निजले कबरींत काय दाऊं ? ॥
माय माझी, मी-उभय मायलेकी-। जवळ त्यांच्या राहतों खोंपटीं कीं !'॥६॥
'दोन गेले गिरणींत विणायाला । दोन दर्यावर नांव हंकायाला ॥
तूंच म्हणसी हें तरिहि तुम्ही सांगें । सात कैशीं होणार कळेना गे' ! ॥ ७ ॥

---

* Wordsworth कवीच्या We are seven ह्या चुटक्याचे रूपांतर.

वदे पुनरपि ती, 'केविं कळेना हो! । मुली मुऽगे नी मिळुनि सात आहों॥
जाइखालीं कबरींत अम्हांपैकीं । दोन असती आतांच बोलल्यें कीं!' ॥८॥
'दुडुडु पळसी बोलसी गोड छान । बाइ माझे तूं म्हणुनि जीवमान ॥
दोन निजले कबरींत जरी साच । असां बाळे! मग मात्र तुम्ही पांच!' ९
'कबरि त्यांच्या पांढऱ्या मऊ खाशा! दिसति येथुनि त्या पहा छान कैशा।
असति दोन्ही लागून खोपटाला' । वदे मुद्रा गंभीर करुनि बाला ॥ १० ॥
'करीं त्यांचे मी नित्य नवे चोज । तिथे बसल्यें जाऊन रोज रोज ॥
तशीं नेमें गाऊन गोड गीतें । तयां उभयांना सतत ऐकवील्यें ॥ ११ ॥
सांज होतां जातांच सूर्य खालीं । तिथे दिवलिंत मी तेलवात घालीं ॥
तिन्हीसांजा मी बसुनि त्याच ठायीं । दूधभाकर आनंदभरें खाईं । ॥१२॥
माळ गुंफुनि गुरुवारिं चमेलीची । पुरविं घालुनि त्यां हौस मानसींची ॥
ऊद तेथें दररोज जाळिल्यें मी! आजवेरीं कधिं खंड न या नेमीं! ॥ १३ ॥
बहिण माझी फातिमा प्रथम मेली । अंथरूणाला होति वाहिलेली ॥
अंतिं अल्लानें दुःखमुक्त केली । त्यजुनि मग ती आम्हांस दूर गेली! ॥१४॥
म्हणुनि तिज या दर्ग्यांत ठेवियेलें । वरी थडगें हें छान बांधियेलें ।
भाउ महिबू मी मिळुनि उभय आम्ही-। कबरिभंवतीं खेळलों खेळ नामी!॥
पुढें आले जों दिवस पावसाचे । जुईजाईचीं फुलें फुलायाचे ॥
फातिमेच्या भेटीस महिबु जाई । तिचे शेजारीं निजुनि तेथ राही!' ॥१६॥
पुसें तिज मी तैं 'जरी स्वर्गलोकीं- । उभय गेलीं किति तुम्ही राहिलां कीं '॥
वदे बाला पलही न जाउं देतां । 'सात आम्ही किति किती सांगुं आतां'!
'दृश्य नयनां महिबू न फातिमा न । उभय मृत तीं; तीं नसति जीवमान ।
बये! गेलीं तीं देवमंदिराला । कुठुनि येथें गे! तुला दिसायाला? ॥ १८ ॥
असें वदलों मी कितिहि जरी तीतें । जलीं लेखन कीं गान वनीं हो तें ।
काहिं केल्या हेका न सोडि ती हो । वदे फिरुनी कीं 'अम्ही सात आहों'॥

## १३ वायसालाप.*

### आर्या.

'रे नीच कोकिला! तूं आवर अपुला कटूग्र कलकल तो।
स्वीकारीं मौन म्हणीं, जगतीं चलतीकडेचि कल कलतो ॥ १ ॥
'नूतनजलदद्युति मी श्यामलतनु काकराज आलों कीं।
नेणसि कां मज मूढा! सुंदरतम मीच आज या लोकीं ॥ २ ॥
'दशदिक्प्रांतीं आजीं गाण्याचा मदधिकार परपुष्टा!।
करिसी कुहूकुहू, का नाहीं तुज भीड लाज खगदुष्टा? ॥ ३ ॥
'मत्त शुका! स्वस्थ रहा, निजरवमद मजपुढें न पळ वाहीं।
गाईन आजि खग हो! गायनपटु सारिकाहि पळवा ही ॥ ४ ॥
'रे कीरा! किरकिर ही उत्सुक परिसावया न बघ कोणी।
जा! जा! जा! पळ येथुनि रडकें हें तोंड दूर घेवोनी ॥ ५ ॥
'वर्ण तुझा हिरवा हा दुःखद नेत्रां, दुरोनि जन नमिती।
रे कीरा! तुजलागीं, आतां हाला जनीं तुझ्या न मिती ॥ ६ ॥
'श्रीकृष्ण कृष्ण मीही, सांगे हें स्पष्ट बादरायण तो।
खगवंद्य मी' वदुनि हें जुळवी संबंध बादरायण तो ॥ ७ ॥
'रे दुष्ट राजहंसा! त्यज मुक्ता, भक्ष पंकजा-शेतधा।
वाहुनि नित्य विधीला झाली तव तनु विदीर्ण ही शतधा! ॥ ८ ॥
'मुक्ताफळ नित्य मुदें करिसि विदारण जरीहि रम्य सरीं।
मानीं न गर्व परि तूं पावसि कैसी मदीय सांग सरी? ॥ ९ ॥
'श्राद्धादिकीं मराला मुक्ताहुनि मधु तसे सुकोमल ते।
पृथुपिंड मी विदारीं, तव यश बा! सत्य आज बघ मळतें ॥ १० ॥
'रे नीलकंठ केकि! श्रमसी वाहुनि शिवात्मजा स्कंदा।
लज्जा नाहीं तरि का? पडलें मूढा! तुझ्या किण स्कंदा ॥ ११ ॥

---

* 'काककूजितम्' या संस्कृत खंडकाव्याच्या आधारानें प्रस्तुत कविता लिहिली आहे. १. दूर्वा. २. तांदुळाचे पिंड. ३. कार्तिकस्वामी.

'नाहीं लाज? नसो, तरि बघुनी मन्मृदु मनोज्ञ हे चरण ।
लववीं शीर्षहि, नच तरि होवो अपुलें इथेंचि आज रण ॥ १२ ॥
'कोणी न करी त्रिभुवनिं माझी समता समग्र खेचर हो! ।
वर्णाकृतींहिं सम जरि हयसाम्या का करील खेचर हो! ॥ १३ ॥
'मंगलदिनीं अशा या ठरलों कीं सर्वमान्य खगवर मी' ।
बोलुनि विपरीत असें करि तो शब्दप्रहार खगवर्मीं ॥ १४ ॥
'सिंहासनस्थ होतों आतां मी याच कोटरामाजीं ।
माना राज्ञी काकी बसली ही मत्समीप रामा जी ॥ १५ ॥
'सर्वाधिकार तुमचे झाले हो प्रतिनिविष्ठ आज पहा- ।
माझ्यांत, मीच म्हणुनी राजा' तो तैं करी असा जप हा ॥ १६ ॥
अविचारी मूर्ख तसा स्वरवें तो काक तेथ वटवटतो ।
कुनिरर्गलप्रलापें दणाणिला जों समग्र वट वट तो ॥ १७ ॥
ये तोंचि वायुवेगें मार्गें त्या श्येन एक अंतकसा ।
काका प्रहार करुनी मारी हा! जाहलाचि अंत कसा ॥ १८ ॥

---

# तरंग ५ वा

---

## १. महाजनवियोग.

[ ना. गोपाळ कृष्ण गोखले यांचा शोकजनक मृत्यु! ]

( चाल—भला जन्म हा तुला. )

अयि गोपाळा! स्वजनवत्सला । आत्मनिष्ठ मंगला ।
कसा ये वीट आमुचा तुला? ॥ ध्रृ० ॥
या जंजालीं चिंताजालीं जीवनकलहानलीं ।
त्यजुनियां जासी कवण्या स्थलीं? ॥
देवदानवीं परम भयंकर कलह पुन्हा मांडला ।
म्हणुनि का जासी स्वर्मंडला? ॥

चिरवियोग तव हा, सांग केविं सोसवे ?।
होईल कसें तुजमागें अमुचें कवे ! ।
हितगूज करावें आतां कोणासवें ? ।
कोण आमुचीं दुःखें आतां नृपकर्णीं प्रेमला ! ।
घालिल सांग सांग वत्सला ! ॥ १ ॥

दाद आमुच्या देशभूमिची भरतसचिवमंदिरीं ।
कोण वद लाविल वरचे वरी ? ॥
भारतसेवकमंडलमंदिर उदास तुजविण दिसे ।
जीवनाभावीं सर तें जसें ॥
जी अपूर्ण तव बा ! कार्यावलि राहिली ।
संपूर्ति तिची जो, करील बहु चांगली ।
मज असा दिसेना, संप्रति कोणी बली ।
जन्महेतु का तुजला अपुला सफल दिसे जाहला ।
म्हणुनि चिरविश्रम हा घेतला ? ॥ २ ॥

सार्थक झालें तव जन्माचें तूंच खरा जन्मसी ।
वाटतें विचार करितां मसी ॥
जग उफराटें नाथें कथिलें खोटें म्हणुं तें कसें ? ।
पदोपदिं अनुभव मज येतसे ॥
जनता म्हणते मृत तुज गणते न्याय काय हा असा ? ।
म्हणावें अंध कसें डोळसा ? ॥
हा प्रतिदिनिं नेमें कार्यभार सारुनी ।
जरि बुडे सागरीं तेजस्वी दिनमणी ।
हा निमे वसुमती वसंत शृंगारुनी ।
लतिकाराधाजीवन माधव मेला रविही भला ।
म्हणावें न कळे कैसें मला ! ॥ ३ ॥

वन्यसृष्टि ही कुसुमाभरणीं मंडित जोंवरि दिसे ।
गणावें वसंत मेला कसें ? ॥

जगज्जीवनाधार तरणि हा प्रकाश जरि देतसे ।
तया तरि मृत मी मानूं कसें? ॥
जोंवरी तुझी ती, दिव्यतमा वाग्झरी ।
घुमतसे सारखी, माझ्या श्रवणांतरीं ।
जोंवरी तुझ्या त्या, सती सुकृति सुंदरी ।
येती दिसती नयनांपुढती रात्रंदिन मंगला! ।
म्हणावें मृत वद कैसें तुला! ॥ ४ ॥
आशावादी आशारत तूं, आशा तव देवता ।
नव्हे, तूं आशामूर्ति स्वतां ॥
चिरंजीविनी वदती आशा मृत्यु न तिजला कधीं ।
सांगतो अनुभव योगी सुधी ॥
बा! सांग तुला मी, मृत मग मानूं कसें? ।
लागलें दिसे या, जनांस अवघ्या पिसें ।
कां करोनि घेती, न कळे ऐसें हंसें ।
आशा[1] साऱ्या दिसति जोंवरी मृत्यु न केव्हां तुला ।
रडे कां जनता न कळे मला! ॥ ५ ॥
जीवमान तूं परंतु आम्ही जीवन्मृत मज गमे ।
आमुचें स्वार्थी नित मन रमे ॥
असोनि आम्ही काय लाभ वद? नसोनि हानी नसे! ।
सुकार्यीं व्यत्यय अमुचा असे ॥
मग सांग कोण बा! तूं कीं आम्ही मृत? ।
जीवंत अजुनही, वदतों तुज निश्चित ।
हें रुचे न कोणा, निःस्पृह जरि मन्मत ।
'आप मरे पर डुब गयि दुनिया' कबीरवचिं या तुला ।
मानुं कां? मृत मी अजि मंगला? ॥ ६ ॥

---

१. आशा, पक्षी दिशा.

# तरंग ६ वा.

## १. हट्टी मुलाची दिवाळी !

( साक्या )

( दिवाळीसारख्या आनंदाचा सण नाही. पण तो कोणाला? ज्याला कमलावर अनंत हस्तांनी देतो आहे त्याला. इतरांचे तो दिवाळेच काढतो. मुलांच्याविरुद्ध दावे लावून खालीलसारख्या कैफियती कितीतरी ठिकाणी ऐकू येत असतील. )

**नसति बांगड्या करीं मुलींच्या सबंध महिना आज ।**
**लाज वाटते कोठें जाया; काय तयास इलाज? ॥ १ ॥**
**चटकचांदणी, छन्नकतारा, कापि केरवा, छंद ।**
**इतर मुलींच्या हातीं बघुनी रडती घेउनि छंद ॥ २ ॥**
**एक म्हणे मज भरीं बाहुटा, दुसरी मागे फेटा ।**
**तिसरी वदते फेटा नच परि गालीं गोड चपेटा ॥ ३ ॥**
**हासूं किंवा रडूं कळेना गप्प तेधवां झाल्यें ।**
**तों दाम्यानें 'मला फटाक्या' गाणें सुरु हें केलें ॥ ४ ॥**
**अवचित मागुनि चोर पावलीं नान्या मेला आला ।**
**'फटफट मारुनि पाठीवरि घे' वदे 'फटाके' त्याला ॥ ५ ॥**
**कोणी कांहीं कोणी कांहीं मागमागुनी मातें ।**
**करुनि सोडिलें सळो पळो कीं, नको राहणें येथें ॥ ६ ॥**
**नान्यानें या मला आज हो नको नकोसें केलें ।**
**रडकुंडीला जीव आणिला, वैतागुनि मी गेल्यें ॥ ७ ॥**
**शाळेंतुनि जों मुलगा आला घरीं घेउनी पाटी ।**
**'लाडु करंजी खाया दे मज' म्हणत लागला पाठी ॥ ८ ॥**
**'बाळ! करंज्या उद्यां करोनी देइन तुजला खाया' ।**
**नानापरिंनीं कथिलें ऐसें, कुठला परि समजाया! ॥ ९ ॥**
**गोड बोलल्यें, रागें भरल्यें, चवदावेंही रत्न-।**
**दिलें शेवटीं, परी न राहे; निष्फळ झाले यत्न ॥ १० ॥**

जवळ घेउनी गोंजरिलें बहु; तरीहि कांहीं केल्या ।
रडगाणें तें मुळीं सरेना युक्त्या विलया गेल्या ॥ ११ ॥
रडरडुनी बहु अकांत केला लाल जाहले डोळे ।
पाय थडाथड अपटित भूवरि गडबड गडबड लोळे! ॥ १२ ॥
संतापुनि मीं खूप मारिलें दुखूं लागला हात ।
चार बांगड्या वरी वाढल्या, नच हो परि तो शांत ॥ १३ ॥
निर्वाणींचा उपाय म्हणुनी तयास कोंडायातें— ।
लागें जों मी तों रामोशी लावी हात मुखातें ॥ १४ ॥
इतुक्यामध्यें गंगी हांसत मुरडुनि त्याचा कान ।
वदली त्याला, 'घेइं करंजी आतां बघ ही छान' ॥ १५ ॥
तोंचि तिकडुनी शांती वदली 'गंगे! अपुला नाना ।
कसा गातसे आज पहा हा घेई कैशा ताना ॥ १६ ॥
तबला बडवुनि गाण्याला या पहा आणित्यें रंग ।
तंबोऱ्याचा सूर धरीं तूं होउ न रंगीं भंग' ॥ १७ ॥
इतुकें वदुनी पोट पाठ जों बडवी नान्याची ती ।
गंगी बोले, 'थांब जराशी खुंटी धरूं दे हातीं' ॥ १८ ॥
बोलुनि ऐसें तिनें तयाचा धरिला दुसरा कान ।
पिळितां वदली 'पहा कसा हा सूर लागला छान ॥ १९ ॥
हट्टि मुलाला अशींच लागे करंजि खाया द्याया ।
पुरे जाहली किंवा नाहीं वद रे नानाराया' ॥ २० ॥
तोंचि वाजलें एकाएकीं पाउल धप्प जिन्यांत ।
इकुडचेंचि हें येणें गमुनी मुलें जाहलीं शांत ॥ २१ ॥

---

## २. सीमोल्लंघन.

विजयादशमीचा दिवस! साडेतीन मुहूर्तांतला मुहूर्त! पण 'सुरेश्वराच्या दरबारीं' एकाएकीं धुंदी माजून 'नभ मेघांनीं आक्रमिलें' व मुसळधार वृष्टि सुरू

झालं! आधीच मन उल्हसित त्यांत मग हा प्रकार! शिलगणास जावयाकरिता मित्रमंडळी बोलावूं लागलों असता त्यांस खालील उत्तर मिळाले.

**श्लोक**–( शार्दूलविक्रीडित. )

**प्रातःस्नान जरी सुखावह घडे आम्हां न तें आवडे ।**
**केव्हांही न करूं चुकून सहसा अत्यंत तें वावडें ॥**
**स्नानाचें सहजीं अतिक्रमण हें झालें न का पाहिं तें ।**
**सीमोल्लंघन आणखी वद सख्या! आतां उरे कोणतें? ॥ १ ॥**

**संध्या गोड चहा त्रिकाळ पिउनी आम्हांकडोनी घडे ।**
**चौथ्यांदाहि करूं निशीथसमयीं पाहूं न मागें पुढें ॥**
**तैशी रोज किती सुरा सरतसे नाहींच का ज्ञात तें ।**
**सीमोल्लंघन आणखी वद सख्या! आतां उरे कोणतें? ॥ २ ॥**

**ऐसे सुंदर सोमयाग घडती रात्रंदिनीं संप्रती ।**
**नेमानें पशुयज्ञही प्रतिदिनीं लक्षावधी ना मिती ॥**
**होमोनी खगमेषमांस जठरीं त्या शांतवूं अग्नितें ।**
**सीमोल्लंघन आणखी वद सख्या! आतां उरे कोणतें? ॥ ३ ॥**

**नेमें रम्य रसायनीक मधुर क्षारोदक प्राशन ।**
**तेवीं नागलतादलाशन असें वातांबुपर्णाशन ॥**
**ऐसें संप्रति आमुचे तप गड्या! आम्हां न का शोभतें? ।**
**सीमोल्लंघन आणखी वद सख्या! आतां उरे कोणतें? ॥ ४ ॥**

**तैसी तीव्र तमाखुही प्रतिपदीं ओढोनि धूम्राशन ।**
**आम्ही आदरितों जरी जळतसे काळीज रात्रंदिन ॥**
**ऐसें हें कारि अग्निहोत्र अमुच्या देदीप्य कांतीस तें ।**
**सीमोल्लंघन आणखी वद सख्या! आतां उरे कोणतें? ॥ ५ ॥**

**सोडोनी हरिपादपद्मभजना श्रीमत्तसंपूजन ।**
**केलें ताडन त्यांनिंही तारि करूं तत्पादसंवाहन ॥**
**आहे काय कुठे जगांत उपमा या स्वामिसद्भक्तितें ।**
**सीमोल्लंघन आणखी वद सख्या! आतां उरे कोणतें? ॥ ६ ॥**

झालें भोजन आज पोट भरुनी आतां उद्यांचें कसें ।
प्रेमें सुंदर वेदपाठ पढतों आम्ही सदा हे असे ॥
केले षड्रिपु मित्र आजि वहिलें सोडोनि सच्छील तें ।
सीमोल्लंघन आणखी वद सख्या! आतां उरे कोणतें? ॥ ७ ॥

ती 'शापादपि वा शरादपि' अशी तेजस्विनी विप्रता ।
जिव्हेनें अजि दाखवूं चरचरा बोलोनियां तत्त्वतां ॥
आम्ही आज करूं तिचेंहि सहजीं स्वातंत्र्य निःसीम तें ।
सीमोल्लंघन आणखी वद सख्या! आतां उरे कोणतें? ॥ ८ ॥

स्वाऱ्या आम्हि करोनि दूर परकी लोकांवरी निर्भय ।
आणूं 'फूट' लुटोनि जूट करुनी दारिद्र्यही सामय ॥
दंभाची नव दुदुभी दुमदुमे कीर्ती जगीं गाजते ।
सीमोल्लंघन आणखी वद सख्या! आतां उरे कोणतें? ॥ ९ ॥

कर्तृत्वादि समस्त चोर पळुनी जाऊनि देशांतरा ।
नांदे आळस पूर्ण आज सदनीं जो जीविंचा सोयरा ॥
आचारव्यवहारमुक्त! उरली कोठेंहि सीमा न ते ।
सीमोल्लंघन आणखी वद सख्या! आतां उरे कोणतें? ॥ १० ॥

वाचा, पाठ करा, करा मननही हे श्लोक ऐसे दहा ।
चित्ता स्वास्थ्य सहर्ष लाभ घडुनी जाईल सारा दहा ॥
आशाक्लेश भयादिसर्व विलया निःशेष जाईल तें ।
सीमोल्लंघन आणखी वद सख्या! आतां उरे कोणतें? ॥ ११ ॥

---

## ३. अर्धचंद्र!

**विषयसूत्रः**-एकदां एक गरीब ब्राह्मण एका राजाकडे जाऊन कांहीं संभावना मागत असतां राजाने त्यास अर्धचंद्र दिला. त्या वेळी त्या समाधानी ब्राह्मणानें त्यास खालील उत्तर दिलेः—

पद ( चाल-हरिची भगिनी म्हणे सुभद्रा ... )

कोणी भंगड, कोणी शंभो, कोणी पशुपति मला म्हणे ।
परंतु राजन् गौण सर्व हीं, साभिप्राय न, विशेषणें ॥ ध्रु० ॥
अपूर्ण होतों आजवरी मी, पदव्या नव्हत्या साधार ।
कलियुगकर्णा! कृपाबळें तव शंकर झालों साचार ॥
नसे प्रियेच्या अंगावरतीं फुटका मणिही कांचेचा ।
नांव कशाला तरी रुप्याचें? विटाळ आम्हां सोन्याचा! ॥
दुर्घट दुर्गा चंडचंडिका खाष्ट ह्माळसा लंकेची-।
भली पार्वती म्हणती तिजला नामावलिही अशी तिची ॥
सदाशिवापरि, ऐक नृपाळा! दोनचि असती मज बाळें।
नांवांनींही एकचि अगदीं किति मौजेचा योग जुळे ॥
हातीं पायीं शक्ति न अगदीं भला नगारा पोटाचा ।
'लंबोदर' हें नांव ठेविलें, ज्येष्ठ बाळ तो हा अमुचा ॥
कार्तिकमासीं जन्म पावलें बाळक दुसरें जें तान्हें ।
नांव ठेविलें म्हणुनि कार्तिक्या आम्हीं त्याचें हौसेनें ॥
शंख होतसे सदा मंदिरीं भूक लागतां बाळांना ।
एकापेक्षां एक मनोहर घेती तानावरि ताना! ॥
श्वशुर आमुचे 'दक्ष' माद्धिता प्रिया धाडिली माहेरा ।
असा आसरा मज सासरचा उत्तम भारी असे खरा ॥
'गृहं तु गृहिणीहीनम्' ऐसें कांताराहुनि नीच असे ।
'श्मशान' ऐसी संज्ञा त्याला माझ्या मतिनें बरी दिसे ॥
'श्मशानवासी शंभु' म्हणुनि मी येथवरी नच पडे उणें ।
सावधान हें पुढील परिसा, शंभु कसा मी अन्यगुणें ॥ १ ॥
श्मश्रु वाढली, स्नेहहीन या जटा बांधिल्या शिरावरी ।
विपन्न मनुजा स्नेहि न कोणी, स्नेह कोठचें येइ घरीं ॥
'चारनेत्र' तूं तसा नसें मी 'त्रिनेत्र' ठरलों सहज असा ।
किंवा दृष्टि न चांग म्हणोनी 'विरूपाक्ष' मी हो सहसा ॥

अशाश्वताचा संग्रह कैंचा? कवडिहि नाहीं घरिं अमुच्या ।
परि कवडीस्तव रडतां रडतां कवडया झाल्या डोळयांच्या ॥
भूतिच नसतां विभूति कैंची पांडुरता जी देहिं वसे ।
भस्मविलेपनकार्य करितसे, उणीव त्याची गमत नसे ॥
भिक्षेसाठीं हिंडत असतां भरदिवसां मी उन्हांतुनी ।
घर्मजलाचे, छे! गंगेचे बिंदु स्त्रवती जटांतुनी ॥
लाज जनाची तशी मनाची गिळुनि टाकिली म्यां सारी ।
जननिंदेचें गरल पचविलें मुळीं न वमतां बाहेरी ॥
चिंतादहनीं सदैव जळतां अस्थिचर्म तें मात्र उरे ।
कंठीं शोभे अस्थिमालिका मोजुनि घ्यावे मणी पुरे ॥
रुद्राक्षांची गरज नसे मज जरी स्वयें मी रुद्राक्ष ।
मांस न देहीं मुळींच माझ्या ही न तयाची का साक्ष? ॥
सर्वपरींनीं असा जरीही आहे राजन् शंकर मी ।
कैलासाधिप पूर्ण व्हावया एकचि होती गोष्ट कमी ॥
मौलीं नव्हता 'अर्धचंद्र' तो प्रियभक्ता त्वां भावानें ।
दिधला मजला, चिरायु होई, ईशकृपेनें नसो उणें ॥ २ ॥

---

## ४. विशल्यवैभव !

**पद (चालः—आनंदी आनंद गडे ... )**

पुण्यास रास्त्यांच्या पेठेंत ताडीच्या बंगल्यासमोर एक सुंदर बाग होती. परंतु तेथें बंगला बांधण्याच्या हेतूने ती बाग मोडून तोडून टाकिली. अशा प्रकारें सर्व फुलझाडांचा नाश होऊन ती धुळींत पडली असतां एकच एक फूल आलेल्या एका गुलाबास वायुलहरीबरोबर स्वच्छंदाने वागतांना पाहून खालील विचार साहजिक-पणेंच मनांत उद्भवले.

हास गुलाबा! हास मुदा । असाचि डोलत नाच सदा ॥ ध्रु० ॥
नको वांकुनी बघूं तळीं । नको बघूं वा वरी मुळीं ॥
असो प्रफुल्लित तुझी कळी । स्थळीं आज या तूंचि बळी ॥

अपुल्यापुरतें । बध तूं नुसतें । भलतें सलतें ।
नको बघूं तूं नको कदा ॥ १ ॥
काळपुरुष हा नर माळी । कठोर घेउनि करिं कुदळी ॥
जरी खणोनी निर्दाळी । पुष्पवाटिका ही सगळी ॥
तेजोहीना । गंधविहीना । स्वरूपदीना ।
झाली तरि तुज ती सुखदा ॥ २ ॥
हरळी शेला वनभूचा । फाडी, फाडो तो साचा ॥
वसंतजीवन मोतीया । गेला, जावो तो विलया ॥
तुटे मोगरा । तुटो, सोयरा- । तव तो न खरा ।
सुतक न सोयर तुजसि कदा ॥ ३ ॥
तुटे ताटवा कुंदांचा । तुटो; तुला नच लाभाचा ॥
गेला चांफा हा विलया । जावो आणिक तो निरया ॥
मधुर मालती । जुई रेवती । जाइ शेवती ।
जाती जाउत, नच हितदा ॥ ४ ॥
निस्तरु धरणी ही होवो । विलया अवघें जग जावो ॥
मरोत तरु हे या लतिका । नयनमोहिका अलोलिका ॥
तुजला त्यांच्या । सुखदुःखांचा । स्पर्श न साचा-।
लेश; कशा मग खेद मुधा ॥ ५ ॥
काय बोलसी? 'कोणाला । दावूं माझ्या या लीला ॥
निस्तरुवनिं या एकाकी । होऊं कैसा तरी सुखी?' ॥
हा नव मालिक[1] । लाविल आणिक । सुमतरु मोहक ।
तूंच तयांचा मग दादा ॥ ६ ॥
काय बोलसी? 'त्यामाजीं । महति न राहिल लव माझी ॥
परोपरीची मग निंदा । करोनि हंसतिल खदाखदा ॥
निजकुलघातक । बंधुद्रोहक । निंदाव्यंजक ।
म्हणातिल ऐसें मजसि सदा' ॥ ७ ॥

---

१ माळी.

करोत निंदा कितिहि कुणी । विषाद त्याचा मुळिं न गणीं ।
समज सर्व तीं मनिं कुतरीं । पिशीं भुंकती शशीवरी ॥
जोंवरि सुखरत । तनु ही विलसत । असे सुरक्षित ।
विलासरत तूं ऐस सदा ॥ ८ ॥
गाननिपुण या भ्रमरततीं । जमतिल सखया! तुजभंवतीं ॥
मधुरतिनें तव वैभव रे । गातिल संतत बघ सारे ॥
परि बा विनती । एक करीं ती । जगदीशाप्रति ।
कीं त्या दुर्भद भूषणसा[१] । न मिळो तुजसी भाट कदा ॥ ९ ॥

---

## ५. क्षयी चंद्रास—

(दिंड्या)

काय चंद्रा ! अधिकार तुला श्रेष्ठ । दिला देवें तो गाजवीं यथेष्ट ॥
तुझें वैभव नव दिपवि लोचनांतें । कसा हेवा वाटे न मानवातें ? ॥ १ ॥
निळा मंदिल बांधुनी उत्तमांगीं । रत्नभूषा घालुनी योग्य जागीं ॥
तारकांचा शिरपेंच खोंविलास । साच शोभे हा तुजसि सद्विलास ॥ २ ॥
धवल मेघांच्या थोर रथालागीं । पवनहरिणा जुंपुनी लागवेगीं ! ॥
यदा निघसी संचार करायाला । नभीं; वाटे प्रत्यक्ष ईश आला ! ॥ ३ ॥
वसनभांडारें चारुचंद्रिकेचीं । मुक्त हस्तें वांटोनि भूलतांची ॥
हांस करिसी परिपूर्ण अहा ! इंदो । सार्थ गमतें अभिधान सुधासिंधो ! ॥४॥
परी चंद्रा ! मम मलिन मानसांत। उदित शंका ती करीं भस्मसात ॥
तुला साक्षाद्वा तुझ्या कुटुंबीयां । काय सौख्यें लाधलीं ? सांग राया ! ॥५॥
प्रियेसंगें हितगूज करायासी । कधीं मिळतो एकांत काय तूसी ॥
कधीं आनंदें शुद्ध मनें सांग । प्रणयचर्चा केलीस तिशीं सांग ? ॥ ६ ॥
वस्त्रपात्रींभूषणीं उणें नाहीं । रोहिणीतें अत्यल्प जरी कांहीं ॥
दयितवदनींचे प्रेममधुर शब्द । मिळति ऐकाया तिज न अब्द अब्द ! ॥७॥

---

१. श्रीशिवाजीमहाराजांचे पदरी एक निःस्पृह व बाणेदार असा भाट होता.

'अतां स्वारी येईल मंदिरातें । तीस कांहीं लागेल फराळातें' ॥
वदुनि आनंदें करुनि मधु पदार्थ । तिनें ठेवावे सिद्ध कीं त्वदर्थ ॥ ८ ॥
'आज वर्षाचा प्रथम दिवस बाई । उद्यां आली अक्षय्य तृतीया ही ॥
पुजूं सावित्री आजि जोडप्यानें । परम मोदें; घेतिलें मन्मनानें ॥ ९ ॥
'नारळांचीं नारळीपूर्णिमेतें । करूं पक्वान्नें असें मनीं येतें ॥
परी बाई ! तिकडील मानसातें । काय रुचतें कळणार कसें मातें ? ॥१०॥
'तसें येत्या श्रावणीसोमवारीं । मुदा वंदाया शिवद शंभुगौरी ॥
गमे जावें कैलासिं उभयतांहीं । परी इतुकी मी भाग्यवती नाहीं ! ॥११॥
'निकट ठेली हेरंबचतुर्थी ही । परी देहाची होत लाहिलाही ! ॥
किती जनता ही दुष्ट अधम बाई । 'वदन' 'बोले तिकडील बघूं नाहीं' १२
'जणूं आम्हीं कापिले काय त्यांचे । बाग मोठाले केळिनारळींचे ॥
परी त्याचें वाटे न इथें कांहीं । सेव्यसेवक सारखे नवल नाहीं ! ॥ १३ ॥
'गोष्ट नवलाची गमे परी मोठी । जनीं बाहेरी कुलुप पडे ओठीं ॥
गृहीं येतां अवतार नृसिंहाचा । भोग सर्वस्वीं आमुचाच साचा ! ॥ १४ ॥
'असे पुरुषांच्या सर्व सणांमाजीं । श्रेष्ठ दसरा; जुंपुनी रथा वाजी–॥
स्वारि सीमोल्लंघना जावयातें । अतां घेउनि येईल सुवर्णातें ॥ १५ ॥
'बुद्धिनीरांजन भक्तिभाजनांत । पूगि शुचिता, कर्पूर भाव त्यांत ॥
ज्ञानदीपा लावोनि आरतीतें । शेस भरण्यातें क्षणीं सिद्ध होत्यें ॥१६॥
'भाउबीजेला वन्संनाच येथें । अणा; ऐसा येतांचि हट्ट घेत्यें ॥
बरें म्हणजे होईल जरा बाई । हात सोडवणुक दिवस मला कांहीं ॥ १७ ॥
'सूर्य भावोजी मकरिं जावयाचे । कोंद म्हणुनी मी तीळ साखरेचे ॥
करुनि आतां ठेवित्यें क्षणीं साचे । गृहीं येतां होईल मागण्याचें' ॥ १८ ॥
असें बोलोनी प्रत्यहींच कांहीं । करी मधुरार्थे सतत रोहिणी ही ॥
परी त्याचें सुखदुःख तुला इंदो ! । कांहिं नाहीं ना ? हाय ! दीनबंधो ! १९
गृहा सोडावें भल्या सुप्रभातीं । परी परतावें सदा प्रदोपान्तीं ॥
चार चावावे चबर चबर घास । वेळ नाहीं चव तुला पहायास ! ॥२०॥

जणूं खाणावळ गृहीं घातलीसे । तसें वर्तन तव होय मला भासे ॥
दोन वेळा तूं मात्र भोजनातें । गृहीं येसी, हेंच ना गृह्य नातें ? ॥ २१ ॥
पूर्व सोडोनी पश्चिमेस जावें । पुन्हा प्राचीतें परत तूर्ण यावें ॥
जशी खो खो बाळकें खेळतांना । स्पर्श करिती खुंटास धावतांना ॥२२॥
तेलियाचा वृष एक पथें जैसा । मात्र जाणें; दुसरे न मुळीं तैसा !॥
जेविं अथवा रथवाह धावतांना । पुढिल मार्गाविण अन्य कीं बघेना !॥२३॥
तेविं चंद्रा! तूं जरी वियद्देशीं । नित्य फिरसी पथ एक जाणतोसी ॥
गमे रसिकां रमणीय नभःश्री ही । कदा काळीं त्वां नसे पाहिलीही ॥२४॥
काय मौजेची दिसे वियद्गंगा । केविं तेथें त्या अप्सरा शुभांगा ॥
प्रणयरंगें करितात जलक्रीडा । सर्व सोडोनी विनय मनोव्रीडा !॥२५॥
नसति तारे हे, परी भूषणें हीं । जलक्रीडेस्तव देवयोषितांहीं ॥
स्वदेहींचीं उतरोनि ठेवियेलीं । गमे कोणा पाहतां अशा वेळीं ॥ २६ ॥
परी चंद्रा! तुज हेंहि पाहुनीयां । काय तळमळ होई न मानसीं या ॥
काय केला उपदेश शुकाचार्यें । काय अथवा बोधिलें भीष्मरायें ॥२७॥
कधीं चंद्रा! घेवोनि अपत्यांसी। कडे खांदीं; खेळसी काय त्यांशीं? ॥
कधीं त्यांना खेळणीं आवडीचीं। दिलीं? केली का हौस पूर्ण त्यांची? ॥२८॥
कधीं अपुल्या लाडक्या बुधा लागीं । बहु प्रेमें घेवोनि अंकभागीं ॥
कधीं घेसी का मधुर चुंबनातें । मृदुल हस्तें चिवडूनि कपोलातें? ॥ २९ ॥
कसा त्यांचा लागेल लळा सांग । जरी वर्तन तव नसे सानुराग! ॥
कसें त्यांनीं तुजजवळ बोल! यावें ? । कसें तुजलागीं तात ओळखावें? ॥३०॥
मधुर शब्दीं जो कोणि बालकांशीं । नित्य वागे बा! तोचि आप्त त्यांशीं ॥
पिता नेणे जरि मुळीं स्वीयकर्म । कसा पुत्रें पाळिजे पुत्रधर्म? ॥ ३१ ॥
भला चंद्रा! तूं एकनिष्ठ दास । स्वामिकार्या निजदेह वाहिलास ॥
निदानींचा क्षयरोग तुला झाला । तरी घेसी क्षणही न विसांव्याला ॥३२॥
भला स्वामीही तुला लाधलासे । दयामाया लवही न तया भासे ॥
सेवकांना आपुल्या राबवावें । दिसे त्याला हें मात्र पूर्ण ठावें! ॥ ३३ ॥

बरें वाईट जरि होय तुला कांहीं । तया त्याचें शुभ अशुभ मुळीं नाहीं! ॥
दुजा कोणी येईल तुझ्या जागीं । भरवाहक तुज सारिखा अभागी! ॥३४॥
दयित दयितेतें तेविं अपत्यातें : मात्र मुकशिल तूं फार मना खातें! ॥
कार्य कोणाचें कधिंच कुणासाठीं । खचित राहेना अशी ही रहाटी ॥३५॥
कठिण सेवा ही विधो! जयासाठीं । करुनि करितोसी नित्य पायपीटी ॥
कुटुंबाला त्या सुख न जरा लाधे । साध्य चंद्रा! कोणतें सांग साधे? ॥३६॥
उदरभरणास्तव जरी अशी सेवा । करिसि मानूं तूं अगा चंद्रदेवा! ॥
परी पोटाला पोटभरी खाया । वेळ लाधेना तुला इंदुराया! ॥ ३७ ॥
तुला सेवेची संवय जाहलीसे । तुझ्या चित्ता सर्वस्व तेंच भासे ॥
सुराभक्तातें जेंवि सुराधारा । एक भासे ती मात्र सुधासारा ॥ ३८ ॥
भला सेवेचा घालुनियां पाठ । दिला आर्यां जाहला पूर्णपाठ! ॥
कधीं त्याचें विस्मरण घडेना कीं। तुझी उपकृति ही कोण कशी झांकी? ॥
अशी सेवेची रीत महाबाहो! । तुझी तुजला लखलाभ विधो राहो! ॥
दास्य करण्याची हौस पूर्ण आतां । गुरो! झाली ठेवितों पदीं माथा !॥४०॥

---

## ६. हे डाग कसे निघतील?

( आर्या. )

'बहु माजलीस गमतें, फुटले का? बोल गे तुझे नयन।
बसली का तव वाचा? उरला का तिळभरी तसा नय न? ॥१॥
'बघसी पुनः पुन्हा कां धीटपणें वळवुनी स्व वदनातें?।
गे! तूं स्नुषा, श्वशुर मी, ठेविसि का हें असेंचि वद नातें? ॥२॥
'बकसम धवल पटा या पाडुनि हे डाग कोणि वद नास-।
केला खुळे! असा हा, आतां कां लपवितेस वदनास? ॥ ३ ॥
'हासिसि पाहुनि पदतळिं मातेची आणिलीस शिके[1] कायी?।
डाग न निघतील गमे; चोळुनियां लावितांहि शिककायी ॥ ४ ॥

---

१. शिकवण

'कधिं का निघेल शाई आला जरि ो ! तुझा पितामह ती ? ।
गेलें कोरें धोतर वायां बघ जाहली कशी माती ॥ ५ ॥
'लावुनि जरी रिठे या धुतलें बहु घासुनीहि शतदा गे ! ।
स्वच्छ न होइल कधिं हें चिरलें जरि काढुनीहि शत धागे ॥६॥
'पाडीन डाग असला तव तनुतें मी, तुझ्या पित्यालाही–।
नच भीं, आला पति तव दूर करिन ग ! तथापि त्यालाही ॥ ७ ॥
'पतिच्या जोरावरि तूं माझा घोरापराध हा केला ।
भोग तरी फळ, बघतों, देतो तव कोण साद हांकेला' ॥ ८ ॥
असतों बधिर बरें, तरि परिसवलें मज न वृद्ध वदला जें ।
दुर्वच उच्चाराया न लवे रसना, मदीय मन लाजे ॥ ९ ॥
संतप्त चित्त झालें दाटुनि काहुर मनीं विचारांचें ।
सामावतां न हृदयीं आलें बाहेर रूपिं शब्दाचे ॥ १० ॥
जन्मावधि दुष्कृत्यें करुनी जे डाग पाडिले विपुल ।
स्वचरितपटास जरठा ! निघति न जरि देव पातले सकल ॥११॥
वरिलें जिला विवाहीं वाहुनि देवासमक्ष तूं आण ।
धर्मन्यायें तिजसी वर्तन केलेंस का ? मनीं आण ॥ १२ ॥
बघुनी परवनितेला तव मनिं उठला असेल मदनाहि[1] ।
फुंफाटत गमतें परि जिरला बा ! तो अझूनि मद नाहीं ॥ १३ ॥
जातां द्वारावरुनी सुंदर ललना स्वपापि नयनांहीं ।
बघसी धांवत जाउनि मुरडुनि हा परि पशो ! न नय पाहीं ।१४
नूपुररव रुणझुणतां कर्णीं, वदला असेंचि असशील ।
'उपभोग्या सुभगा ही ' सुंदर ना हें तुझें असें शील ? ॥ १५ ॥
पत्नीद्रोहापेक्षां होतें बरवें न सांग का मरण ।
जरि पावतासि, परि तें केविं रुचे ज्या रुचेचि काम-रण ? ॥१६॥
एवं देहें जरि नच चित्तें नयनें वचें जनीं चारें ।
केलें दुराचरण जें गणती व्यभिचार तोहि नीचा रे ! ॥ १७ ॥

---

१. मदनरूपी सर्प.

यास्तव बुधजन गारे वदती परदार[1] दार नरकाचें ।
बघती न त्याकडे ते; ध्याया तन्नाम साधु नर कांचे ॥ १८ ॥
व्यभिचार कलंक असा हा बा ! त्वां लाविला यदा चारिता ।
झाला वज्रलिखित तो होउनि तव पुण्यघट तईंच रिता ॥ १९ ॥
अन्यायानें हरुनी परधन जरि बहु दुरांप[2] गा वृद्धा ! ।
जें पाप जोडिलें त्वां शक्य हराया न आपगा[3] वृद्धा ॥ २० ॥
त्वां नाडिलें असेलचि भोळया दुबळया भणंग बायांस ।
पैशापैशास्तवही, उपमा जगतीं नसेल बा त्यास ॥ २१ ॥
त्याच धनानें घालुनि पुत्रकरीं कंठिं वलय कंठे वा ।
मोदें भूषविलें त्वां, पापाचा जोडिलास परि ठेवा ! ॥ २२ ॥
निज तृष्णा पुरवाया जें धन तूं मिळविलेंस नरडीस–।
दाबुनि दीनांच्या, तें अंतीं आणील काय न रडीस ? ॥ २३ ॥
तें धन वेंचुनि तूं जें मंदिर नव उभविलेंस जीवास–।
व्हाया सुख, परि तें तुज देइल नरकांत अंतिं जी ! वास ॥ २४ ॥
ऐसें विषसम परधन सुजन मनीं ज्यास मानिती वमन–।
प्राशूनि माजलासी थरथर कांपे अहा ! अतीव मन ॥ २५ ॥
परवित्तविषाचे त्या चारितपटा पाडिलेस जे काळे ।
ते डाग आज निघतिल काय तुला भक्षितांहि त्या काळें ? ॥ २६ ॥
झालें तव जनन जिथे दिधलें त्या सौख्य काय देशाला ? ।
दाविलि निज स्नुषेला फुकटचि बोलांत कायदे–शाला ! ॥ २७ ॥
फिटति न उपकृति कधिंही देशाच्या स्वीय तेविं जननीच्या ।
नेणुनि परि हें, केल्या दुष्कृति संतत कितीक जन-नींचा ! ॥ २८ ॥
दुःखार्त मातृभूतें झिजविलि तूं तनु कधीं न राखाया ।
जगलास भार व्हाया तीस, तसा काळ कीं नरा ! खाया ॥ २९ ॥
कार्यकुशल पुरुष किती गेले कृति करुनि, चित्त कालवतें ।
गालिप्रदानें परि ती जीभ तुझी चुरुचुरू बका ! लवते ॥ ३० ॥

१. परस्त्री. २. मिळावयास कठीण. ३. गंगा.

झालें न काय त्यांचें सफल तरी मायदेशिं या जनन।
पाहें विचार करुनी, वानिल वद कोण ऐशियां जन न? ॥३१॥
स्वोन्नतिसाठीं देउनि भलभलत्या श्रीयुतांस[1] थापाही।
लांगूलचालनातें केलें असशील तूं तथा पाहीं ॥ ३२ ॥
निजदेशबंधुघातहि करुनी स्वार्थार्थे लाविला वशिला।
परि तन्नयनजलाचे पडले बहु डाग रे! तुझ्या शीला ॥ ३३ ॥
ते डाग काय मूढा! दिसति न तुज जाहलासि लोंचट का?।
दिसती सुजना परि ते, पोळे तच्चित्त बसुनियां चटका ॥ ३४ ॥
भूजननी-नयनजलें सिंचित जें तव चरित्रअंबर[2] तें-
होइल विमल न कधिंही एकपरी तळिं पडेल अंबरें[3] तें ॥ ३५ ॥
ज्या धर्मीं ब्रह्मयानें उपजाविलें तुज परंतु बहुधा त्या-।
धर्मा न पाळिलें कीं, लावियला त्वां कलंक बहु धात्या ॥ ३६ ॥
श्येनातें धर्मास्तव काढुनि दिधलें स्वमांस शिबिरायें।
अडका न दिला त्वां परि अतिथिप्रति तो जरी अगारा ये ॥३७॥
नसतील मान्य तुजला गोष्टी ज्या बहुत जून राहूत।
शिवजें[4] स्वतनू केली यवनक्रोधानलीं नरा! हूत ॥ ३८ ॥
धर्माच्छादन घेउनि केलें अनुचित सदैव आचरण।
बकसम नेत्र मिटोनी, तपोमिषें दुखविशी उगा चरण ॥ ३९ ॥
धर्माडंबर मिरवुनि केले जे घोर तूं सदा चार।
होतील तापदायी कोण तयांना वद सदाचार? ॥ ४० ॥
डाग अधर्माचे जे पडले तव चारितवस्त्रि गा राया।
निघति न; शक्य न कोणी सरितेचा प्रबल ओघ वाराया ॥ ४१ ॥
यावज्जन्म कदाचित् सत्याशीं बा! असेल तव दावा।
सज्जन कथिती परि कीं स्वप्नींही अनृत शब्द न वदावा ॥ ४२ ॥
रुचला असेल संतत असत्यपंकीं तुझ्या मना वास।
लावील कां न तो मग डाग नरा सांग सत्य नांवास? ॥ ४३ ॥

---

१. श्रीमंतांस. २. चरित्ररूपी वस्त्र ३. आकाश. ४. संभाजीनें.

क्षुद्रहि हित साधण्या केलें मूढा! अनेकदां कपट ।
त्यजुनी सत्पथ, तेणें परि हो कृष्ण त्वदीय चरितपट ॥ ४४ ॥
कितिदां अवगणिलें तूं अपुल्या मातेस तेविं जनकातें ।
घडला न दोष का हा ? वद न तुला निंदितील जन कां ते ?
वाढविलें तुजसि जिनें सतत रजाचा करूनियां गज रे !
केलें जतन परोपारे रक्षिति जन जेविं मृदुलसे गजरे ॥ ४६ ॥
मूढा! त्या जननीची नित्य करावीस का अवज्ञा ते ? ।
देतील मान तुजला काय अशानें जगांतरीं ज्ञाते ? ॥ ४७ ॥
मानिति मान्य प्रियही विबुध पितरभक्त पुण्डरीकातें ।
विमलोदकस्थ जैसें गणिती मतिमान्य पुण्डरीकातें ॥ ४८ ॥
नमुनि तया जन आधीं देती बहु मान विठ्ठलाहूनी ।
मिळवी मान असा का होतां नर धनिक वित्त लाहूनी ? ॥ ४९ ॥
मोहुनि जनमन कपटें मिळविति जनयोषिताहि पैसा कीं ।
मिळतो मान तयां का, ठेविति कुणि का तदीय पैं साकी ? ॥ ५० ॥
होता मानित शिव नृप धरुनी आदृति मनीं शिवा जीस ।
आशीर्वादें यश त्या मातेच्या लाधलें शिवाजीस ॥ ५१ ॥
शुद्धाशुद्ध विचारा यास्तव करुनी सदैव जनकाऽशीं ।
भक्त्यादरपूर्वक ते गणिति स्वमनांत सुज्ञ जन काशी ॥ ५२ ॥
बोलत असें मनाशिंच आलों मी परत तेधवां सदनीं ।
विसरेन काय कधिं तरि ? बसले जे शब्द जाउनी स्वमनीं ॥ ५३ ॥

---

# तरंग ७ वा

## १. तूंही भिकारीच !

आर्या.

दिल्लीसमीप पूर्वीं निर्जन गहनाटवींत उटजांत ।
होता यतिवर कोणी धर्मात्मा ईशभक्त विख्यात ॥ १ ॥

अनुकूल सर्व होतें शांतीच्या त्या निकेतनामाजीं ।
खिन्न परी तो चित्तीं न कळे त्या दुःख कोणतें भाजी ॥ २ ॥
हिमकालशीत वारी तापुनि बहु मंद मंद तो तपन ।
उष्ण हराया मारुत वीजी त्या होउनी स्वयें व्यजन ॥ ३ ॥
पळते पुत्र गिरीचे घडविति त्या मधुरशीतजलपान ।
वृक्षलता आनंदें देति तया स्वादु रम्य फलदान ॥ ४ ॥
शय्या मृदुल धरित्री दिग्वसनें रम्य पांघरायाला ।
होतें कुटुंब ऐसें सिद्ध सदा साह्य त्या करायाला ॥ ५ ॥
गर्भश्रीमंती ही निरुपम पाहोनि साधुरायाची ।
मात्सर्यानें व्हावी विचलित बुद्धीहि खास धनदाची! ॥ ६ ॥
येती बहुजन तेथें संतत त्या संतदर्शनाला हो! ।
इच्छूनि कीं घडावा सत्संगाचा पवित्र हा लाहो ॥ ७ ॥
भगवन्नामश्रवणा निष्कामत्वें असंख्य जन येती ।
येती तसेचि कोणी वांच्छा कांहीं धरोनियां चित्तीं ॥ ८ ॥
कोणी आस धनाची विद्येची मुक्तिची धरुनि कोणी ।
कांतेच्छेनें कोणी छिद्रान्वेषण करावया कोणी ॥ ९ ॥
'अपुल्या करीं घडावा आदरसत्कार आगतांचा या' ।
वाटे असें निरंतर साधूच्या परम शांत त्या हृदया ॥ १० ॥
अभ्यागतसुस्वागतचिंता ही त्या सदैव जाळितसे ।
करितो काय परी तो संग्रहिं त्याच्या कपर्दिकाहि नसे ॥ ११ ॥
शरदीं गगनीं जैसे उठती घन बहु परी लया जाती ।
तेवीं दीनमनोरथ उपजति जैसे तसेचि मावळती ॥ १२ ॥
केला विचार अंतीं त्यानें सकरुण नृपाकडे जावें ।
सादर शुद्ध मनानें स्वांतींचें शल्य हें निवेदावें ॥ १३ ॥
आला विचार ऐसा नैःस्पृह्यें परि तया न मानवला ।
झालें दुःख अमितही सहसा जणुं दंश वृश्चिकें केला ॥ १४ ॥

'जा' कथिलें एक मनें 'नच जाई बा!' सर्वेचि दुसऱ्यानें ।
'जा' कथि पुनरपि पहिलें 'अवमान कशा' दुजें 'स्वहातानें' १५
झालें मनिं तुमुल बहू निर्णय कांहीं परंतु होईना ।
जावें वा नच जावें, काय करावें तयासि समजेना ॥ १६ ॥
भ्रुकुटीस भाल भेटे पावे दृष्टी सर्वेचि संकोच ।
निमिषीं अर्धोन्मीलित, निमिषीं पावे विकास तैशीच ॥ १७ ॥
अंगुष्ठतर्जनींनीं हनु चोळी नेत्र घेउनी मिटुनी ।
दाबुनि चाळे क्षणभर चोळी शिर, अधर चावुनी रदनीं ॥ १८ ॥
गगनीं सदनीं देहीं क्षणैक दृष्टि स्वकीय फिरवोनी ।
सोडी दीर्घ उसासे स्वस्तिकवत् हृदयिं हस्त ठेवोनी ॥ १९ ॥
जावें उटजांतोनी थांबुनि मध्यें क्षणैक परतावें ।
यावें गृहीं बसावें विचार करुनी पुन्हा परत जावें ॥ २० ॥
आंदोलनीं अशा या झाला निश्चय तया महात्म्याचा ।
मानापमान सारा सोडुनि दिल्लीपुरीस जायाचा ॥ २१ ॥
जडपदिं उटज त्यजुनी गेला तो साधुराय मानधन ।
भेटुनि सम्राटातें आणाया लाभल्यास कांहिं धन ॥ २२ ॥
जातां प्रासादीं तो गेला भूपाळ संनिधानिं मुनि ।
नृप पाहतां तयाला खुणवि बसाया मृगाजिनीं नमुनी ॥ २३ ॥
एकाग्रमानसानें होता भूपाल अर्चनीं निरत ।
देवायतनीं अपुल्या सादर करुणाघनासि आळवित ॥ २४ ॥
'काला! कालातीता! कालक्रीडा! करालकरवदना!।
कमनीया! करुणेशा! कारुण्यास्पदजनीं करीं करुणा ॥ २५ ॥
'सम्राडधीश बा तूं पुत्र तुझा वंदितो तुला भावें ।
कीं त्वत्कृपाप्रसादें याहुनि मज अधिक वित्त लाभावें ॥ २६ ॥
'दे मज ऐश्वर्य विभो! अतुल करीं बालकामनापूर्ती ।
वाढो कीर्ति दिगंतीं श्रवणीं पडो ही मदीय आर्तोर्ती ॥ २७ ॥

परिसुनि सम्राटाचें ईशोपासन निघे त्वारित जाया।
तो साधु तों वदे नृप 'आला भो! कोठुनी अगारा या?' ॥२८॥
अपुला आगमहेतू कथिला त्यानें करोनि मधु हास।
वदला नृपति तदा त्या 'जातां कां? पुरवितों बसा आस'॥२९॥
निःस्पृह साधु वदे तो 'तूंही बा! मजसमान याचक रे।
जो तूं स्वयेंचि पसरिसि कर, इतरां देशि काय त्याच करें?॥३०॥
जो तूं स्वयें भिकारी, त्या तुजला मागुं मी तरी काय!।
दात्यांच्या दात्यातें आळवितां श्रेय कीं बहुत होय!' ॥ ३१ ॥

---

## २. बुद्धिः कर्मानुसारिणी।

(आर्या)

पुण्यसरित्कावेरी-तीरीं भारी विशाल एक पुरी।
नामें 'जलस्थला' ती होती अमरावती जणूं दुसरी ॥ १ ॥
होता तेथें कोणी एक द्विज देवदत्त या नांवें।
त्याचें चरित्र थोडें कोडें ह्यां आजि योजिलें गावें ॥ २ ॥
द्विज तो जन्मदरिद्री साक्षाद्दारिद्र्यमूर्ति अवतरली।
अवलोकाया जनता स्वकृपाच्छत्रास्थिता महीवरली ॥ ३ ॥
न मिळे खाया पुरतें, गृह तेवीं धड न तें निवाऱ्यातें।
पात्र न एकहि धडकें, फडकेंहि न नीट पांघरायातें ॥ ४ ॥
होती चिलांपिलांची पांटी पदरीं तशांतही मोठी।
अन्नासाठीं दाटी करुनी जो तो परस्परां लोटी ॥ ५ ॥
तो तुष्ट हृष्ट लोकीं, गृहिं परि कष्टी नितान्त खिन्नान्त।
हा! शांति! शांति कैंची बाळें क्षुत्क्रान्त बघुनि भ्रादांत ॥ ६ ॥
सांजसकाळीं झोळी स्वगळीं लोळीच जेविं घंटेची।
बांधुनि मिरवी फिरवी कधिं कधिं परि त्या न कांहिं लाभेची ।७।
'न कळे गति काय पुढें' रात्रंदिन हीच काळजी वाहे।
व्याळी विशाळ काळी जी जणुं विक्राळ काळ जीवा हे ॥ ८ ॥

चिंता चिता उभयतां केवळ बिंदुस्वरूपभिन्ना त्या ।
तरिही चिता बरी ती चिंता साक्षाद्भयंकरा कृत्या ! ॥ ९ ॥
जाळी चिता मृतांना चिंता जाळी परी जिता जीव ।
ही यमसहोदरी कीं, शब्द जणों तिज न ठाउका 'कींव' ॥ १० ॥
रडतां मुलें उपाशीं त्यांशीं दुःखें धरोनि करपाशीं ।
न्हाणी अश्रुजलानं अविरत कवटाळुनी स्वहृदयाशीं ॥ ११ ॥
कोपाविर्भावानें त्यानें कधिं काधिं तयांशिं दापावें ।
कोपावें, चोपावें, केव्हां केव्हां स्वतांस शापावें ॥ १२ ॥
केव्हां शून्य मनानें दैवाचे चालले असे खेळ ।
अवलोकावे त्यानें वदुनी ' दिसतो असाच हा मेळ ' ॥ १३ ॥
निंदावें काळातें, बाळांतें कधिं कधीं स्वदैवातें ।
लोकांतें, भूपातें, किंवा केव्हां दयाळु देवातें ॥ १४ ॥
परमावधि ही झाली कालीं त्या दुःखसहनशक्तीची ।
दुर्दैवदावदहनीं होळी हो तत्समग्र शांतीची ! ॥ १५ ॥
होतां विचार मृत, तें साध्वी तद्दार शांति नाय सती ।
दुर्वृत्ता दुश्चेष्टा कारित उठे हंसत तेधवां कुमती ॥ १६ ॥
बंधनविमुक्त होतां, आला अविचार घोर बाहेर ।
जातां पिता दडपता जेविं पळे व्रात्य बाळ कीं स्वैर ॥ १७ ॥
आलिंगी अविलंबें जों न तिचें करुनि तो करग्रहण ।
शुभ सावधान बोले क्रोध स्वकरा मुर्दे उभारून ॥ १८ ॥
द्विजहृद्रंगीं ऐशी स्वमनोलज्जाच होमुनी लज्जा ।
पूर्ति स्वयंवराची केली लवही न मांडितां कज्जा ॥ १९ ॥
होतां विवाह ऐसा कुमति तया तों कवेंत कवटाळी ।
व्हावें जें तें मिळतां ध्यायाला कोणि काय कवि टाळी ? ॥ २० ॥
विप्र वदे स्वमनीं तें देवा दैवा न होय जें कर्म ।
साधुनि तें या घटिके, नच लटिकें, मी वरीन बहु शर्म ॥ २१ ॥

जन्मायत्त जयें मज वंचियलें सूड त्यांचि दैवाचा ।
घेतों तयास वंचुनि; विफला माझी न आजि हो वाचा! ॥ २२ ॥
बाळ न इंगळ दिसती, गमती मज मूर्तिमंत हे काळ ।
आतां न पाहवे हें, पडो मस्तकीं तुटोनि आभाळ ॥ २३ ॥
दहनीं सदन समर्पुनि करितों मी सर्व राखरांगोळी ।
होवो सर्वांचि माझी, दुर्दैवाची सदैन्य या होळी! ॥ २४ ॥
आले विचार यापरि किति तरि; गेले परंतु मावळुनी, ।
धरि तरु बहुत फळें शिरिं जाती त्यांतिल किती परी गळुनी २५
आजवरी कोणाला नाहीं आलें स्मशानवैराग्य ? ।
नाथ तुका व्हायाचें पारि सर्वां लाधलें न सद्भाग्य॥ २६ ॥
बसुनी विमानयानीं फिरतां श्रीचंद्रमौलि सभवानी ।
लोकस्थिति निरखाया, सहज तदा पातले तया स्थानीं ॥ २७ ॥
पाहुनि विपन्न विप्रस्थिति जगदंबा अतीव कळवळली ।
युक्तचि तृषार्त चातक बघुनी कादंबिनी जरी द्रवली !॥ २८ ॥
बोले गद्गदुनी ती, "अपुला मज हा न खेळ पाहवतो!।
कालवतो जीव विभो! सुतछल मातेस काय साहवतो ? ॥ २९ ॥
अपुल्या कृपाप्रसादें याचें हें दैवदैन्यवारण हो।
पशुपति शक्त नसे का माराया मत्त राजवारण हो ?" ॥ ३० ॥
'देवि! न उक्त' वदे शिव 'बोल तुझे हे न लागती गोड ।
देतां द्रव्य तयाला नच तें लाधेल, हट्ट हा सोड ॥ ३१ ॥
आम्हां न काय माया ? काय दयाकोश सर्व तुजपाशीं ?।
अज्ञानमूल ही तव माया गे! शोध खोल हृदयाशीं ॥ ३२ ॥
दैवाधीन प्राणी तुजला हें किति पुनःपुनः सांगूं।
दावूं मौज तुला; चल, भलतें वेड्यापरी नको मागूं' ॥ ३३ ॥
त्या समयीं श्रीगिरिजावचपंकजबद्ध त्या मिलिंदानें।
द्याया निजवाक्प्रत्यय कौतुक रचिलें अपूर्व विंदानें ॥ ३४ ॥

असतां नगरीं हिंडत झोळी लावूनि विप्र काखेला ।
ब्रह्मांडचालकें त्या केला आरंभ आपुल्या खेळा ॥ ३५ ॥
पृथ्वीमूल्य विविधशीं रत्नें सौवर्णभूषणें तेवीं–।
घालोनि एक पिशवी विप्रपथीं तो हळूच शिव ठेवी ॥ ३६ ॥
जों जों दिव्यनिधानानिकट तया विप्र लागला याया।
कर्मानुसारिणी मति लागे तों तों तयास चकवाया॥ ३७॥
द्विजमनिं विचार आला, 'अंधस्थिति केविं चालतां होते ? ।
अनुमान कासया पारि, अनुभव घेऊनि पाहुं या हो ! तें' ॥३८॥
येतां विचार चित्तीं नेत्रद्वय घेउनी तयें मिटुनी।
चाले स्खलितगतीनें पडतां झडतांहि साहि तो हंसुनी ॥ ३९ ॥
गेला विप्र असा तो दुर्भग लंघोनि वित्तराशि महा ।
सिद्धान्त केविं चुकतो 'बुद्धिः कर्मानुसारिणी' च अहा ! ॥४०॥
गेला विप्र कफल्लक, माय उमा मात्र होय ओशाळी।
हासे व्याजें भोळा, गिरिजा चरणांत मान तों घाली ! ॥ ४१ ॥

---

## ३. चिलयाकंडन !

(डोळ्यांवाटे एक टिपूसहा न काढतां मंगलगाते म्हणून चिलयास कांड, असे यतीने सांगितल्यावरून सत्त्वधीर चांगुणा चिलयाचा शिरच्छेद करून त्याला उखळात घालून कांडीत असतांनाः––)

( **चाल**–बाळा ! जो जो रेः–)

वंदुनि जगदंबे । अविलंबे । ममकुलदैवत अंबे ।
तैसें श्रीसांबा । आरंभा । पदनतसौख्यकदंबा ।
घाणा बाळाचा । चिलयाचा । जीवींच्या जीवाचा ।
घालुनि उखळांत । मी हंसत । हरिखें गाणें गात ।
कांडण कांडीत्यें । सारीत्यें । तृप्त यतीला करित्यें ।
क्षणभरि हे हृदया । अविकार्या । सोडीं अवघी माया ।
होइं न गोहृदय । प्रेममय । नको मोकलूं धाय ।

होई बा ! दगड । अविमूढ । थांबो अवघी धडधड ।
माझ्या डोळीयां । पक्षीयां । तुम्हि तारि ऐका सदया ! ।
आले उसळून । धांवून । जलकण हृदयांतून ।
होउनियां धोंडा । तो कोंडा । अश्रुजलाचा लोंढा ।
आला बाहेरी । थैंब जरी । जाइल यनिची स्वारी ।
जागुनि सत्त्वाला । धैर्याला । भीक मला ही घाला !
आतां हे हाता । हो पुढता । घाव बसूं दे पुरता ।
म्हणती तुज मृदुल । कवि कमल । दावी पारि ती भूल ।
पावुं नको कंपा । अनुकंपा । त्यज मी झाल्यें शंपा ।
रसने रसचतुरे । कलमधुरे । 'शिव शिव' वद गे सुगिरे ! ।
कार्णी हलकल्लोळ । अळुमाळ । वाहो रसकल्लोळ ।
बुडुं दे त्यामाजीं । गे आजी । समन इंद्रियें माझीं ।
एक गदारोळी । 'शशिमौली' । चालविं तूं या वेळीं ॥ १ ॥

---

## ४. चिलयाचा धांवा.

[ चिलयास हाक मार म्हणजे तो येईल, असें यतीने सागितल्यावरून चांगुणा सद्गदित कंठाने म्हणते:— ]

( चालः—आई थोर तुझे उपकार . . ... .. .. )

जासि कुठे बहु दूर । चिलया ॥ ध्रु० ॥
तुरुतुरु येई भुरुभुरु येई घुमवित पदिं घुंगूर ॥ १ ॥
हांसत येई नाचत येई काढित 'खुळखुळ' सूर ॥ २ ॥
हांक न ये का माझी कानीं कोठें रमासि निसूर ॥ ३ ॥
अतिथि न जेवी येसि न जरि तूं सत्त्व हरी हा क्रूर ॥ ४ ॥
निपुत्रिकेचें मुख न बघावें 'नीति' वदे 'महशूर' ॥ ५ ॥
पाहुं कुठे तुज शोधुं कुठे तुज लागे बहु हुरहूर ॥ ६ ॥
गहिंवर दाटे शब्द न उमटे प्रेमें भरला ऊर ॥ ७ ॥
जागुनि सत्त्वा लाज राखिं ये होउं नको निष्ठूर ॥ ८ ॥

मार गळा मिठे ये ये धांवत वारि झणीं काहूर ॥ ९ ॥
अंकीं घेत्यें कडिये घेत्यें नाहीं टाकित दूर ॥ १० ॥
सवंगडि येती तुजला पुसती झाले चित्तिं चुकूर ॥ ११ ॥
अंत किती तरि बघसी ये ये कंठ करी घुरघूर ॥ १२ ॥

---

# तरंग ८ वा.

## १. युधिष्ठिरद्रौपदीसंवाद.

(आर्या)

एके सायंकाळीं द्रुपदसुता प्रार्थि काय धर्मातें ।
'रिपुची अशी उपेक्षा लांच्छन लावी न का स्वधर्मातें ॥ १ ॥
केली विटंबना मम आरिनें पारिषदिं, वधा सुयोधन तो ।
अन्यें स्वस्त्री छळितां पाही जो होय का सु-योधन तो? ॥ २ ॥
विनवी परोपरींनीं निजकांता ती 'सया! दया नच का? ।
लाक्षासदनींची भो पतिराय! कराचि याद[1], या न चुका[2]' ॥ ३ ॥
सस्मित धर्म वदे तैं, 'चावे श्वा जरि तयासि का प्रमदे? ।
चावावें आपणही, वाणी तव ही मला बहु श्रम दे ॥ ४ ॥
अन्यायी नसतांना शिक्षा केली स्वतां सुता तातें ।
होईल काय समुचित, मारी जारि बाल तो स्वतातातें ॥ ५ ॥
किंवा पति वनितेला मारी व्यर्थचि जरी न अपराधी ।
उलटचि का जारि मारी ती स्त्री स्वधवा करोनि अपरा धी ॥ ६ ॥
नेम 'जशास तसें' हा पाळूं वदतील सर्व, भी मातें—।
वाटे, न चले जग, मग होईल स्थिति अपूर्व भीमा ते ॥ ७ ॥
शांति, क्षमा, दया हीं सुज्ञांचीं भूषणें जगीं असती ।
दावावा सुपथ धवा स्त्रीनें, शोभे तुला न गी[3] अ-सती[4]' ॥ ८ ॥

---

१. आठवण. २. फसू नका. ३. वाणी. ४. वाईट (वाणीचें विशेषण).

वसते क्षमा जयाच्या चित्तीं साक्षाद्रमापती वसती–।
कांतो तेथें मोदें, थोर खरें भाग्य तें अतीव सती!' ॥ ९ ॥
बोध न तिज हा रुचला बोले ती द्रौपदी तदा त्यातें ।
'दान कुपात्रीं करणें योग्यचि का मज कथा सुदात्यातें ॥ १० ॥
आज्ञापर सच्छात्रा[1] त्यजुनी जो मूर्ख शिष्य त्या शिकवी–।
विद्या, तो गुरु मूढ न ? कोण जगीं तरि वदेल त्यासि कवी ?॥ ११॥
दुष्ट कुपुत्रा जरि धन दे त्यजुनी सुज्ञशा पिता तनया ।
तुकवील मान कोणी नयज्ञ का या अशाहि तातनया ॥ १२ ॥
राज्योपभोग देउनि हा! हा! हरि दुष्टवृंद संरक्षी ।
वणवण सज्जनगण परि फिरुनी अन्नार्थ मृत्तिका भक्षी ! ॥१३॥
सोसेल केविं पतिजी? सज्जनविहगा स्वपक्षपातन[2] हें ।
प्रभुच्या न्यायी राज्यीं सांगा का सत्य पक्षपात न हे ?' ॥ १४ ॥
धर्म वदे तैं तिजला, 'सुज्ञे कुविचार हे प्रभूविषयीं ।
चित्तीं कधिं नाणावे, काढिति या उक्ति मात्र जन विषयी ॥ १५ ॥
बुद्धि अपक्का अपुली, हेतु हरीचे म्हणोनि ना कळती ।
हृदयें अज्ञजनांचीं स्वैरगती धांवताति नाकळती ॥ १६ ॥
धर्म क्षमाचि अपुला कांते ! तो गे ! कदा न सोडावा ।
ईशकृपेनें ऐसा विचार तव तो कधीं नसो डावा ॥ १७ ॥
निजधर्मा पाळावें, लाभेच्छा धरुनि कोणतें कर्म--।
न करावें सुजनांहीं; चित्तांतरि तरिच पाविजे शर्म ॥ १८ ॥
करणें जें कर्म तया धर्मासम लेखुनी मनीं आर्ये !।
देवो फल वा नच हरि, साधावें कर्म तें सदा आर्यें' ॥ १९ ॥

---

## २. मार्कंडेयोपदेश.

(आर्या)

गिरिवर सुगंधमादनिं असतां पांडव, मृकंडुनंदन तो ।
आला, येतां सदनीं साधू, जो मूर्ख मानि नंदे[3] न तो ॥ १ ॥

---

१. चांगल्या विद्यार्थ्यास. २. आपले पंख तोडणे. ३. आनंद.

सन्मानुनि धर्म दे दे बोधसुधा हे सुजाण ! पाजीव ।
भवसागर-परतीरा उतरो हे अज्ञ जाण पां जीव ॥ २ ॥
मुनिवर सहर्ष बोले तत्पर परमेश-भक्त-पद-नमनीं ।
नित्य असावें धर्मा ! द्यावें कधिं मीपणासि पद[1] न मनीं ॥ ३ ॥
प्रेम करीं दीनजनीं, सत्य वदें, स्वमन सज्जनां ! कर्षीं ।
सन्मानाया तुजला स्वर्गीं होतील सज्ज नाकर्षी[2] ॥ ४ ॥
त्यज गर्वा, विनत रहा, धर्मा ! म्यां तुजसि काय सांगावें ? ।
अशनीं शयनीं पानीं भगवद्यशगुण निशीं दिसां गावे ॥ ५ ॥
पाळीं प्रजा सुतासम, हरिसद्भक्तां सदैव वानावें ।
लावीं चित्त सदंघ्रीं, कोरीं हृदयीं तदीय वा नांवें ॥ ६ ॥
अज्ञानजन्य पापा जाळीं स्वसुवर्तनें यदा राही ।
वारिल निजप्रतापें पतिव्रता बा ! त्वदीय दारा ही ॥ ७ ॥
अंतःकरणिं असावी निर्मलता सत्य जाण ती आर्या ! ।
नसतां चित्तीं शुद्धी तव त्याचें फलहि[3] जाणती आर्या ॥ ८ ॥
जरि नच चित्त सुनिर्मल व्यर्थ पहा जपतपादि साधन तें ।
सुज्ञें म्हणुनि करावा मिळवाया यत्न विमलताधन तें ॥ ९ ॥
जरि कटुलाबु[4] वरुनी पयादिपंचामृतेंहि सारविला ।
अंतरिचें कटुपण वद जाइल का शर्करीं तसा रांविला ॥ १० ॥
गरलधरा सर्पातें प्राशविली नित्य दूध साखरही ।
जाइ न विष, शुद्ध न हो, तीर्थीं प्रक्षाळितां तसा खरही ॥ ११ ॥
वक्र श्वापुच्छाचि का घालुनि नलिकेंत सरलता पावे ? ।
मलिनमनें मोक्षास्तव उपवासें व्यर्थ काय तापावें ? ॥ १२ ॥
वद विष्ठा टाकिल का सूकर जरि षड्सान्न वोगरलें ।
गंगोदकीं मिसळतां त्यागावें का कटुत्व हो ! गरलें ? ॥ १३ ॥

---

१. स्थल. २. देवर्षि. ३. कर्णास पाहून द्रौपदीचे मनांत एकदां कांहीं पापविचार आला होता, त्यास अनुलक्षून वरील ओळींची रचना आहे. ४. कडू भोपळा.

काया, वच, मन यांहीं जो न करी पापयुक्त आचरण ।
तापस तोचि गणावा, दुखविति बगळे जलीं न का चरण? ॥१४॥
योग न साधे कधिंही मलिन मनें व्यर्थ देहदंडन तें ।
अघ न जळे येणें परि करिती ढोंगी स्वपक्षमंडन ते ॥ १५ ॥
यज्ञाहुनि धर्माचें पुण्य बहुत जाण खचित हा नियम ।
'धर्मस्य गतिस्त्वरिता' नेणो कधिं बा! करील हानि यम ॥१६॥
अन्योपकार पुण्यचि परपीडन पाप सांगि विश्वास ।
भागवतीं व्यास, धरीं या स्वपितामहगिरेंत विश्वास ॥ १७ ॥

---

## ३. हितोपदेश.

(आर्या)

[ सुहृद् कवि काणिं यांजकडून चिरंजीवाच्या व्रतबधाम येण्याबद्दल निमंत्रण-पत्रिका आली होती तीस उत्तर म्हणून खालील कविता लिहिली होती.]

साष्टांग प्रणति असो भो विष्णो! ही त्वदीय पदकमला ।
तव पत्र पावलें बा! वाटे जणुं लाधलेंचि पदक मला ॥ १ ॥
येतां पत्र करीं तव झालों प्रमुदित अतीव मी मित्रा!
वाचुनि विकसित झालें मन, जैसें पद्म पाहतां मित्रा ॥ २ ॥
आर्यादूती धाडुनि धरुनि स्मृति या जनासि बाहाया ।
केला आदर बहुतचि नसतांना सत्य पात्र बा! हा या ॥ ३ ॥
लोटुनि बहुविध कार्यें दूर सख्या! त्वत्सुतोपनयना मीं ।
यावें नियमित दिनिं तव धामीं हा सर्वथैव नय नामी ॥ ४ ॥
परि नच उपाय कांहीं, नाहीं आरोग्य सत्य मज्जनका ।
ना तरि घेतों नच तव सौख्यद दर्शनजलांत मज्जन का? ॥ ५ ॥
दोष क्षमा करावा शुद्धमनें हीच याचना करितों ।
कळतां सत्य ज्ञाता क्षमा करायास काय नाकरितो? ॥ ६ ॥
श्रीहरिकृपाप्रसादें, लाभो शुभकार्यिं सिद्धि या अतुला ।
आहे लोभ; असों दे वृद्धि तशी, अंतिं हीच विनति तुला ॥ ७ ॥

अंतर्गत पत्र दुजें ऐइं हस्तीं त्वदीय तनयाच्या।
प्रेमानें लिहियेल्या ओळी ग्यां ज्यांत चार सुनयाच्या ॥ ८ ॥

चिरंजीव रामचंद्र यासः—

'मित्रसुता रघुनाथा! 'आयुष्मन् भव' असा मदीयांशी[1]।
जाणे हा जन तुजला, परि वाटे जाणसी न तूं याशीं ॥ ९ ॥
येत्या भृगुवासरिं बा! होइल तव मौंज जाण विप्रकरीं।
होशिल सहर्ष चित्तीं क्रिडतां बहु मित्रबंधुच्या प्रकरीं[2] ॥ १० ॥
नाहीं ज्ञात तुला परि, तूं जें नव कार्य आजि शिरिं धरिलें।
सांगेन तें कधीं तरि, नलगे आतां प्रसंगिं या पाहिले ॥ ११ ॥
झाला व्रतबंध तुझा, कळलें परि सांग त्यांत तुज काय?।
विद्यादेवीपदिं बा! जनकें दृढ बांधिला तुझा काय ॥ १२ ॥
बहु विद्वान् तात तुझा करिल तुला सर्व शास्त्रिं बा प्राज्ञ।
भाषाविद्गणिती वा इतिहासीं प्राज्ञ कीं खगोलज्ञ ॥ १३ ॥
राहो परि संप्रति तें सोडिव या सातकलमि गणितास।
टाकूं नको; प्रयत्नें करिं बा! नातरि विचार तातास ॥ १४ ॥
सौंदर्य सुस्वभावीं मिळिव; तसा दे वजा सुमैत्रींत।
मत्सर सारा बाळा! होशिल बहु मान्य जाण जगतींत ॥ १५ ॥
विमल मनें प्रेमाला गुण; मग दे भाग कालभाज्याला।
उद्योगभाजकानें; करितां हें तरि उणें न सुयशाला ॥ १६ ॥
काढुनि लघुतमभाजक परनिंदेचा, मिळीव मानातें।
सुविचाराचा करिं घन; तुजशीं जोडील साच मा नातें ॥ १७ ॥
शांतिक्षमादयेचीं नीतीचीं सोडवीं समीकरणें।
छेदुनि आलस्यातें आनंदें हीं करीं उदाहरणें ॥ १८ ॥

---

१. माझा आशीर्वाद. २. समुदायांत.

# ४. कन्योपदेशिका.

( आर्या )

[ सुहृद् कवि काळे याजकडून भगिनीच्या विवाहास आगत्यपूर्वक येण्याबद्दल निमंत्रणपत्रिका आली होती तीस उत्तर म्हणून प्रस्तुत कविता लिहिली होती. ]

**विनयप्रेमें करितों भो विष्णो ! प्रेमशांतिसद[1]! नमना ।**
**तव पत्र पावतांची केलें मोदें स्वकीय सदन मना ॥ १ ॥**
**सकलांसह आजवरि क्षेम असें श्रीहरिप्रसादानें ।**
**तव पत्रदीप मित्रा ! ममचिंतातिमिर तूर्ण सादा[2] ने ॥ २ ॥**
**नव्हतों येथें* यास्तव घडलें कडुसीं[3] न जाण आगमन ।**
**नातरि आलों असतों न गणो माझा त्वदीय आग[4] मन ॥ ३ ॥**
**गेलों होतों द्याया प्रत्यब्दिक भेट लोकमित्रास[5] ।**
**प्रेमें मज प्रतीक्षी जो जेविं हिमार्त लोक मित्रास ॥ ४ ॥**
**तनुगात्रा त्रासविती मार्गश्रम जेविं भूभृता पवि तो ।**
**सुफल प्रवासकारण घडतां सौख्या तदीय ताप वितो ॥ ५ ॥**
**अस्तु; त्वद्भगिनीचा वृतपति मज बहुत धन्यसा गमला ।**
**परि लग्नसोहळा बा ! झाला ना ? अकलि[6] सांग सांग मला ॥६॥**
**तात्त्विकदृष्टया बघतां परिणयसद्धेतु तो अ-सामान्य ।**
**गणती वधूवरांतें श्रीश्रीधरशींच, तो असा मान्य ॥ ७ ॥**
**जें ब्रह्म एक पूर्वीं[1]** होई तें द्विविध लीलया लोकीं ।**
**द्वैताद्वैतास्तव परि विफल झगडती अनेक या लोकीं ॥ ८ ॥**
**ऐसें बाह्यीं द्विविधा स्त्रीनरसें ब्रह्म मित्र ! जें होतें**
**जायापतीस्वरूपें एक पुन्हा अंतरंगिं बा ! होतें ॥ ९ ॥**
**मामा मामी काका काकू हें सर्वही असें नातें ।**
**उपजे विवाह होतां नातरि तज्जन्मही असेना तें ॥ १० ॥**

---

१. प्रेम व शांति यांच्या आश्रयस्थाना ! २. शेवटास. * खेड गांवी. ३ कडूस नांवाच्या गांवी. ४. अपराध. ५. लोकमित्र मासिकास. ६. भांडणतंट्याशिवाय.

अंतरपट मधला तो निघुनी पडतां वधूवरां गांठी ।
संतुष्ट वृत्ति होती संदेहाच्या सुटोनियां गांठी ॥ ११ ॥
मौन सुटे, शब्द तुटे, चैतन्याची सरूपता पसरे ।
'मी' 'तूं' 'तो' 'हा' सारा प्राधान्यें भ्रांतिजन्य ताप सरे १२
अनुपम सौख्याचा हा ठेवा सकलां न लाभतो पाहीं ।
मिळतो त्यास खरा परि चित्तीं जाणीव ज्यांचिया राही ॥ १३ ॥
एक्या सरींच वसती भेक मधुप जरि परंतु लाभे कीं ।
मधु भृंगा; भक्षी परि कर्दम टाकोनि उत्पला भेकी ॥ १४ ॥
केवळ विषयसुखास्तव गणती चित्तीं विवाह जन विषयी ।
तच्चित्ता शिवतीना सुंदर हे नव विचार त्याविषयीं ॥१५॥
उपरी कथित सख्या ! या धरुनी चित्तीं विवाहहेतूतें ।
करितां सौख्यद होई, नच बेडीसा कळोचि हें तूतें ॥ १६ ॥
अल्पोपदेश करितों तव भगिनीतें जरी न पंडित मी ।
मम धर्मा पाळाया; वात न का दे प्रकाश गाढ तमीं ? ॥ १७ ॥
शिक्षित नसली जरि ती तूंच तिला पत्रमर्म सांगावें ।
करुनी पठन तिनें हें प्रेमलचित्तें निशीं दिसां गावें ॥ १८ ॥
अष्ट गुणी पुत्र तुला सौभाग्यासहित भगिनि लाहोत ! ।
देशोदयकार्यातें साधुनि ते ' धन्य धन्य ' म्हणवोत ॥ १९ ॥
उभयकुलोद्धारक हो; पतिदेवीं धरुनि शुद्ध भाव सती ! ।
नांदें सुखें पतीसह जेविं रवीसह तदीय भा[1] वसती ॥ २० ॥
गुरुजनशुश्रूषापर असुनी ध्यावें रमेशपदकमला ।
लीनमनें करितां हें सदन तुझें निज करील पद कमला[2] ॥ २१ ॥
संतुष्ट वृत्ति ठेवीं दार्ष्ट नसावें तुझें कदा वदन ।
हीनस्थितिही होते सुकृतिजनां काय नाकदा वद न ? ॥ २२ ॥
कांताज्ञा पाळ सदा न धरीं कधिं भूषणार्थ हव्यास ।
कुलशीलवान्सतींचें पति हें भूषण कथी इह[3] व्यास ॥ २३ ॥

---

१. कांति. २. लक्ष्मी. ३. या लोकां.

श्वश्रूश्वशुरां मानीं पितरांसम गे! त्वदीय पदनमनीं ।
दक्ष रहा शुचि चित्तें; देई कधिं मत्सरास पद न मनीं ॥ २४ ॥
सर्वांशीं मायेनें वागें, मायाच जाण माया वी ।
मायावी वर्तन तें त्यज जरि वाटे गृहांत मां यावी ॥ २५ ॥
जावा, नणदा यांशीं प्रेमें भागिनीसमान वागावें ।
कीं त्यांनीं तुजलागीं लक्ष्मीपरि मानुनी सदा गावें ॥ २६ ॥
निजबंधुसे मुली गे! नच रिपुसे स्वीय देवरां मानीं ।
याच गुणें सीतेतें गणिलें बहु धन्य देव रामांनीं ॥ २७ ॥
धनवैभवां न भुलतां स्वसुतांसम तूं स्वसेवकां मानीं ।
श्रमती फार बिचारे नानाविधशा सदैव कामांनीं ॥ २८ ॥
मधुर सदा बोलावें सुविचारातें कदा न सोडावें ।
खाद्य न चोरावें तें, वर्तन डावें कधीं नसों द्यावें ॥ २९ ॥
पतिकोपीं विनत रहा, होवो नच धी त्वदीय विषमा ते ।
शांति गमे एक क्षम जाळाया कोपरूप विष मातें ॥ ३० ॥
कर्मीं कुचर नसावें संपवुनी सर्व गृह्य कृत्यांतें ।
तुष्ट करीं सासूतें न वदो तुजला 'असह्य कृत्या' ते ॥ ३१ ॥
आज्ञेविण परसदनीं नच जावें गे बये! कु-लक्षण तें ।
असतां परी रिकामी वेंचीं नवशिक्षणीं कुलक्षण[2] ते ॥ ३२ ॥
असतां श्वश्रूसदनीं सेवीं मित बोलणें मिताहार ।
प्रत्युत्तरें न वडिलां दे; नच ऊनत्व सेवितां हार ॥ ३३ ॥
पतिहित जें तेंच तुझें यास्तव तें साधण्यांत दक्ष रहा ।
एक्या चित्तें करितां भव जरि भासेल सौख्यद क्षर हा ॥ ३४ ॥
ईक्षितें[3] खाद्यास्तव तूं विनति नको कधिंहि भाकुं लाचार-।
होउनि, योग्य न तुज गे! देतील हीनत्व हे कुला चार[4] ॥ ३५ ॥
कटुक जरी वरपांगीं परिणामीं गोड बोध हा भासे ।
करितां जेविं अनावृत अवगुंठित चित्स्वरूप आभासें ॥ ३६ ॥

---

१. लक्ष्मी. २. सर्व क्षण. ३. पाहिलेल्या. ४. ढंग.

अप्रिय परि पथ्य असें दुर्लभ वच अंतिं तेंचि कामातें ।
येई; यास्तव सेवीं हितद गमे तें न सांग का मातें ? ॥ ३७ ॥
नलिनीस भृंग किंवा विमला गिरिजेस जेविं शंकर तो ।
तव पति होवो प्रिय तुज तत्पदिं तव चित्तही विशंक रतो ॥३८॥
सीता श्रीरामासह किंवा लक्ष्मी जशी सकंसारी ।
वसली तैशी वसुनी होई तूं भागिनि! धन्य संसारीं ॥ ३९ ॥

---

## ५. नीतिसुधा.*

( आर्या )

ब्राह्ममूहूर्तिं उठावें, तेजःप्रद तेंहि, आळस त्यागीं ।
प्रातःप्रबुद्ध कमलीं लक्ष्मी करिते प्रवेश सत्या गी ॥ १ ॥
प्रातःस्नान करावें पूत करि तनु करूनि पाप रितें ।
स्नानेंच शक्र हरवी वृत्रवधजपाप जाणपां परि तें ॥ २ ॥
कार्यारंभीं प्रत्यहिं पूजीं हर जो करी सदा शिव रे! ।
आशीर्वादें त्याच्या श्वेत[2] न हो मृत कदा कृतांतकरें ॥ ३ ॥
श्राद्धादिक विधिकर्मे श्रद्धेनें शास्त्रयुक्त नित्य करीं ।
भीष्में भूवरि दिधले पिंड न परि मागतांहि पितरकरीं ॥ ४ ॥
उत्तरपश्चिमदिशिं वा न निजावें शिर करूनियां, क्रम हा ।
पाळीं, शय्याविधि तो चुकतां दितिगर्भ छेदि शक्र पहा ॥ ५ ॥
प्रक्षाळुनि करपद तूं करिं जपपूजादि पंचयज्ञांतें ।
पदशौचविहीन नलीं शिरला कलि सांगती महाज्ञाते ॥ ६ ॥
अपरात्रीं एकाकी न फिरावें नियम हा असे नामी ।
मांडव्या शूलिं दिलें वदतां तो चोरही असें ना मी ॥ ७ ॥
निरुपाधिक ऐस भवीं धरिं न मनीं रति, ममत्व अवजनक ।
निर्लेप जेविं उदकीं पद्म तसा राज्यिं राहिला जनक ॥ ८ ॥

---

१. वाणी. २. एक ऋषिपुत्र. * 'क्षेमेन्द्र' कर्वाच्या 'चारुचर्ये'वरून.

निर्गुण मनुजापुढती लघुता सद्गुणपरास येते जी![1] ।
दर्पण सन्मुख धरितां थोर जरी सानही दिसे तेजी– ॥ ९ ॥
महदाश्रय करिं यास्तव नीचांची कधिं तसी न सेवा ही ।
मदिरानामा पावे शौंडिकें[2] निजकरिं जरी पया वाही ॥ १० ॥
श्रीमदमत्त स्वामी येई कामा न, दीनही नतसा– ।
येतो वेळीं; तृष्णा कूप जसा हरि नदीनही न तसा ॥ ११ ॥
'कर्तव्य मी न सोडीं प्राणांतींही ' करीं असा नियम ।
न करीं दुष्कर्म तसें आला जरि सासि[3] दंडपाणि यम ॥ १२ ॥
स्त्रीधनभोग अधम तो, बंधुश्री गौण ती न भोगावी ।
मध्यम जनकार्जित ही स्वार्जित धनकीर्ति काय भो! गावी! ॥१३ ॥
आश्रय भूपति विबुधां, स्त्रीतें पति, वृक्ष तेविं लतिकेतें ।
माणिक अनर्घ्य जरिही स्वर्णजडावाविना न खुलतें तें ॥ १४ ॥
वाटे मज तृण बरवें उपकारा जो करी न त्यापरिस ।
कारण तें पशुभीरू रक्षी झाला जरीहि निजनाश ॥ १५ ॥
रणशूरधीर योद्धे बुधजन रमणी मनोज्ञ बहुधा त्या ।
पावति आदर जगतीं वानिति जन तन्निमित्त बहु धात्या ॥ १६ ॥
धर्माग्निभूपतस्कर चौघे हे बंधु वित्तदायाद ।
ज्येष्ठावमान करितां कोपति अग्न्यादि बंधु धरिं याद[4] ॥ १७ ॥
वाग्देवीवरदबुधा अपमानी जो मनांत आनंदी ।
होऊनि, त्यास जगतीं गणती खुरशृंगहीनसा नंदी ॥ १८ ॥
नयपथगामी मनुजा करिती द्विजपशु सहाय गा! मी तें ।
वर्णूं काय? सहोदर देखिल सोडी विमार्गगामीतें ॥ १९ ॥
कोणाचें काय उद्यां होइल मनुजा कळे न यास्तव तीं ।
कार्यें आज उद्यांचीं करुनी बुधजन रमाप्रिया स्तवती ॥ २० ॥
व्यापार बा! करावा असतां धन विपुल पाळुनी धर्म ।
नसतां विपुल परी तें प्रेमानंदें करीं कृषीकर्म ॥ २१ ॥

---

१. घोडा. २. कलाल. (दारू तयार करणारा.) ३. तरवार घेऊन. ४. आठवण.

नसतां कांहीं संग्रहिं कोणाचें कांहिं कामकाज वळीं ।
अथवा भिक्षा बरवी नसतां एकहि कपर्दिका जवळी ॥ २२ ॥
मूढत्व न बुधिं वसतें, हरिसेवारत जनीं न पापार्शी--।
थारा, अभाविकां परि बांधी यम धरुनि जाण पां पार्शी ॥ २३ ॥
मौनपरानिकट नरा कलह न राहे, तसाचि जो जागा ।
राहे जगीं निरंतर, हृदयीं त्याच्या भया नसे जागा ॥ २४ ॥
प्रत्यहिं मना विचारीं पशुसम दुष्कर्म आज तव करिं तें ।
घडलें, सुजनासमही कर्म तसें जें अघक्षया करितें ॥ २५ ॥
विद्याविनयद गुरुची सेवा लाभद गमे नरा! मातें ।
विश्वामित्रें अस्त्रें [१]हृष्टमनें का दिलीं न रामातें? ॥ २६ ॥
नश्वर निज देह नरा! त्याचा यास्तव धरीं न विश्वास ।
शिबिरघुपंड्वादिक नृप झाले मृत विदित गोष्ट विश्वास ॥ २७ ॥
बव्हशन कधीं न करीं, त्यानें नर रुग्ण मंदरुचि होतो ।
प्राशुनि बहु घृत यज्ञीं हुतभुक् झाला न काय जड हो! तो ?॥२८॥
मित्रातें बंधूतें रक्षीं विपदीं करूनि जें विहित ॥
कृष्णें सुदामजीचें केलें देउनि सुवर्ण जेविं हित ॥ २९ ॥
पुनरपि जन्मजरा जरि नेच्छिसि सावध रहा तरी बहुत ॥
सुज्ञें विदुरें केलें ज्ञानानलिं जन्ममरणबीज हुत ॥ ३० ॥
स्वार्जित धन स्वहस्तें वेंचावें कथिति सुज्ञ, न नवेंच ।
वातापी [२]व्यसु होता अन्यें केला तदीय धन-वेंच ॥ ३१ ॥




१. आनंदित मनानें. २. मृत.

## 'अनंततनयां'च्या इतर काव्यकृतींसंबंधीं लोक काय बोलतात ?

**श्रीशारदादूतिका** ( पूर्वार्ध ) किंमत १ आणा, ट हं. ०॥.

**नामदार. ना. म. समर्थः**—काव्यरचनेंत स्वारस्य व सौंदर्य आहे व कविता मार्मिक असून बाष्कळ नाहीं. **उषाः**—काव्य-वर्णन बहारीचें व स्तुत्य आहे. मयूराच्या केका व कालिदासानें मेघदूत ही दोन्ही काव्यें एकाच काव्यांत ग्रथित केलेलीं पहावयाची इच्छा असणारांनीं हें अवश्य वाचावें.

**श्रीशारदादूतिका** ( उत्तरार्ध ) किंमत २ आणे ट. हं. ०॥.

**मुमुक्षुः**—रसपरिपोष चांगला साधला आहे. **मराठा मासिकः**—उज्वल प्रतिभा, कर्णमधुर शब्दरचना, नवीन कल्पना व मनोहर प्रसंग इत्यादि गुणांनी हें काव्य लेखकाच्या कीर्तींत भर टाकील यांत शंका नाहीं.

**महाराष्ट्रगीता** ( मूळासहित ) कि. ०१०. व्ही. पी. नें ०१२.

**उषाः**—अनंततनयांच्या गीतादर्श कविता खरोखर रसाळ असून नित्यपठनाच्या लायक आहेत. **मुमुक्षुः**—अनंततनयांच्या वाणींत सुबोधपणा व प्रेम आहे. वक्तृत्वाचा अस्खलित प्रवाह आहे. **केसरीः**—लेखकांनीं वृत्तांची बऱ्याच कुशलतेनें निवड केली आहे. दिंडी, आर्या व पृथ्वी या वृत्तांतील कविता विशेष सरस असून त्यांत प्रसादही आढळून येतो.

**झोंपाळ्यावरची गीता** ( कविश्रेष्ठ मयूराच्या प्रसिद्ध सीतागीताच्या चालीवर. ):—सदर कविता मुलांमुलींना दोघांनाही एक अपूर्व मेवा झाली आहे. मुलांस अभंगांप्रमाणें म्हणतां येऊन मुलींना झोंपाळ्यावर बसून म्हणण्यास फारच छान आहे. ( लवकरच छापून निघेल. )

**भट आणि मंडळी.**

४९७, बुधवार-पेठ, पुणें शहर.